# समर्थ रामदासांची साहित्य सृष्टी

## सुनिल चिंचोलकर




महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई

प्रथमावृत्ती : ऑगस्ट २००९

प्रकाशक :
सचिव,
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ,
रवींद्र नाट्य मंदिर इमारत, २ रा मजला,
१७२, मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय मार्ग,
प्रभादेवी, मुंबई-४०० ०२५



मुद्रक :
प्रमोद भोगटे,
स्नेहेश प्रिंटर्स,
३२०-ए, शाह अँड नाहर इंड. इस्टेट अ-१,
धनराज मिल आवार, सीताराम जाधव मार्ग,
लोअर परळ, मुंबई-१३. (दूरध्वनी : २४९४ ५६१५)

किंमत : रु. ६०/-



# निवेदन

महाराष्ट्राच्या संत महामंडळामध्ये श्री समर्थ रामदासस्वामींचे स्थान अतिशय महत्त्वाचे आहे. अध्यात्म्याबरोबरच त्यांनी सामान्य माणसांच्या जीवनाचा, प्रपंचाचा आणि जगण्यातील प्रयोजनाचा साकल्याने विचार केला. त्या विचारांचा परिपोष त्यांनी आपल्या वाणीच्या व लेखणीच्या द्वारे केला. त्यांचा सर्वत्र संचार असे. त्यामुळे सर्वसामान्य जनांच्या सुखदु:खाची त्यांना जाणीव होती. म्हणून बृहन्महाराष्ट्रामध्ये श्री समर्थांची भक्ती करणारे अभिजन आणि बहुजन सारख्याच प्रमाणात आढळतात. श्री समर्थांचे साहित्य विपुल आहे. त्या साहित्यामध्ये राजकारण, समाजकारण, संगीत, गायन वादन, नृत्य सारख्या ललितकला, शिवाय राज्यशास्त्र, व्यवस्थापन, वास्तुशास्त्र, मानसशास्त्र, आरोग्य आदि अनेक विषयांचा समावेश आपणांस आढळून येतो. श्री समर्थांची प्रज्ञा आणि प्रतिभा अलौकिक होती. त्यांच्या चरित्रातील वैशिष्ट्यांचा विचार आजवर विविध लेखकांनी आपआपल्या परीने केलेला आहे. परंतु श्री समर्थांची साहित्य सृष्टी हे एक मराठी वाङ्मयातील अनुपम सौंदर्याचे स्थळ आहे. त्याचा स्वतंत्रपणे विचार व्हावा व त्यांच्या साहित्यिक प्रतिभेचे दर्शन वाचकांना घडावे या हेतूने महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाने श्री रामदास स्वामींच्या चतुर्थ जन्मशताब्दीच्या निमित्ताने एक विशेष ग्रंथ प्रकाशित करावयाचे योजिले व तो ग्रंथ सिद्ध करण्याचे कार्य समर्थ भक्त व श्री रामदासांच्या चरित्राचे व तत्त्वज्ञानाचे व्यासंगी अभ्यासक श्री. सुनिल चिंचोलकर यांच्याकडे सोपविले. त्यांनी अतिशय परिश्रमाने समर्थ रामदासांची साहित्य सृष्टी हा प्रस्तुत ग्रंथ मंडळाला अल्पावधीत लिहून दिला.

आजवर श्री समर्थ रामदासांच्या साहित्याचा जो विचार झाला त्यामध्ये श्री. सुनिल चिंचोलकरांच्या या पुस्तकाने वैशिष्ट्यपूर्ण भर पडेल यात शंका नाही. श्री समर्थ रामदासांच्या चतुर्थ जन्मशताब्दी निमित्ताने त्यांच्या साहित्यिक प्रतिभेवरील हा ग्रंथ वाचकांना आवडेल अशी आशा आहे.

**मधु मंगेश कर्णिक**
अध्यक्ष,
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ

मुंबई

# अनुक्रमणिका

# समर्थ चरित्राची रूपरेषा

आपल्या महाराष्ट्राच्या भूमीला संत परंपरेचे फार मोठे वरदान लाभले आहे. विशेष म्हणजे मराठी संतांनी केवळ चमत्कार केले नाहीत तर त्यांनी चिरंतन असे आध्यात्मिक विचारधन पाठीमागे ठेवले. हजारो वर्षे मराठी माणूस या विचारांच्या प्रकाशात जीवनाची यशस्वी वाटचाल करीत राहील. आद्यतम कवी मुकुंदराजांचा विवेकसिंधू, संत शिरोमणी ज्ञानेश्वरांची ज्ञानेश्वरी, संत नामदेव आणि संत तुकाराम यांचे हजारो अभंग, समर्थ रामदासांचा दासबोध, संत एकनाथ महाराजांचे भागवत हे सारे ग्रंथ म्हणजे महाराष्ट्राची खरी संपदा आहे. संत चोखामेळा, संत गोरा कुंभार, संत नरहरी सोनार, संत कान्होपात्रा, संत मुक्ताबाई आदी संतांनी देखील या विचारधनात मौलिक भर घातली. महाराष्ट्रातील संतांचे वैशिष्ट्य म्हणजे त्यांनी केवळ भाबडेपणा किंवा अंधश्रद्धा यांना कधीही खत-पाणी घातले नाही. त्यांनी मराठी माणसाचे ज्ञानचक्षू उघडले. त्याची विचारशक्ती जागी केली. या सर्व संतांनी शास्त्रशुद्ध परिभाषेत आध्यात्मिक विचार दिले. प्रस्तुत ग्रंथात आपण समर्थ रामदासांच्या समग्र साहित्याचा परामर्श घेणार आहोत. त्यांच्या वाङ्मयाकडे वळण्यापूर्वी प्रथम त्यांच्या चरित्राची रुपरेषा बघू.

### पवित्र कुळात जन्म

'शुद्ध बीजापोटी फळे रसाळ गोमटी' असे तुकाराम महाराज म्हणतात. त्यानुसार समर्थ रामदासांचा जन्म ज्या ठोसर घराण्यात झाला ते अत्यंत पवित्र कूळ होते. या ठोसर घराण्यात बावीस पिढ्या अखंडपणे रामाची उपासना चालत आलेली होती. ज्या जांब गावात समर्थांचा जन्म झाला तिथे आजही ठोसर घराण्याचे राम मंदीर पाहायला मिळते. समर्थांचे वडील सूर्याजीपंत हे फार मोठे सूर्योपासक होते. त्यांना प्रत्यक्ष सूर्यनारायणाचे दर्शन झाले होते. समर्थांची आई

राणूबाई हिला देखील सूर्यदेवांनी दर्शन दिले होते. समर्थांचे थोरले भाऊ गंगाधरपंत यांना देखील प्रभू रामचंद्रांचे दर्शन झाले होते. सूर्याजीपंत, गंगाधरपंत आणि समर्थ या तिघांना रामचंद्राचा अनुग्रह प्राप्त झाला होता. यावरून या कुळाचा आध्यात्मिक अधिकार काय होता हे ध्यानात येते. समर्थांचे मामा भानजी गोसावी बोधलापूरकर हे उत्तम कीर्तनकार होते. संत एकनाथ महाराज त्यांचे गुरू जनार्दन स्वामी यांच्या पुण्यतिथी महोत्सवात भानजी गोसावी यांची कीर्तनं ठेवीत असत. संत एकनाथ महाराज आणि समर्थ रामदास यांच्यात नातेसंबंध होता. समर्थांची आई राणूबाई आणि नाथांची पत्नी गिरीजाबाई या दोघी मावसबहिणी होत्या. याचा अर्थ या ठोसर घराण्याची परंपरा अत्यंत थोर होती.

## समर्थांचे मुलखावेगळे ध्येय

समर्थांना ही पवित्र परंपरा लाभली असली तरी ती अध्यात्मापुरती सीमित होती. त्याला देशभक्तीची अथवा राष्ट्रकार्याची जोड नव्हती. लहानपणापासूनच विश्वाची चिंता लागलेल्या समर्थांना आपले जीवन केवळ भगवद्भक्तीसाठी समर्पित करायचे नव्हते. त्यांना वैयक्तिक जीवनात प्रपंच आणि परमार्थ यांचा समन्वय साधायचा नव्हता. त्यांना देशसेवा आणि देवसेवा याचा एक मानदंड प्रस्थापित करायचा होता. मळलेल्या वाटेने जाण्यासाठी समर्थांचा जन्म नव्हता. आपल्या जीवनात समाजाचे दुःख दूर करण्याची क्षमता त्यांना संपादन करायची होती. हे बळ त्यांना उपासनेतून प्राप्त होणार होते. त्यासाठी कठोर तपस्या करावी लागणार होती. त्यांच्या या सर्व योजनांना घरातून कोणताही पाठिंबा मिळाला नसता. आपल्या मुलाचे लौकिक जीवन चार-चौघांसारखेच असावे असे कोणत्याही आई-वडिलांना वाटणार.

समर्थांनी तर विवाह करावयाचा नाही हे बालपणीच ठरविले होते. कठोर साधना करून भगवंताची प्राप्ती करून घ्यावयाची आणि त्याच्या आशीर्वादाने लोकांची दुःख दूर करण्याचा प्रामाणिकपणे प्रयत्न करायचा हा त्यांचा संकल्प होता. तो यावनी आक्रमणाचा काळ होता. समर्थांचा मार्ग काट्याकुट्यांनी भरलेला होता. कोणत्याही आई-वडिलांनी आपल्या मुलाला या मार्गाने जाऊ दिले नसते. समर्थांचे ध्येय साध्य होण्याच्या दृष्टीने अवघड तर होतेच पण त्यांच्या जीवितालाही धोका होता. पण ते ध्येयवादाने झपाटलेले होते. हे कोडे कायमचे सोडविण्यासाठी त्यांनी गृहत्याग केला. बोहोल्यावरून मुलगा पळून जाणे ही घटना जगाच्या इतिहासात प्रथमच घडत होती. म्हणून कवीवर्य मोरोपंत म्हणतात-

द्विज सावधान ऐसे विवाह मंगली सर्वत्र म्हणती।
ते येक रामदासे ऐकिले त्या सदा असो प्रणती।।

समर्थांचे थोरले बंधू गंगाधर यांनी तो प्रसंग मोठ्या कुशलतेने हाताळला. जांब जवळील अंबड गावच्या देशमुखांच्या बीजवर मुलाशी समर्थांच्या नियोजित वधूचे लग्न त्यांनी लावून दिले. मोठ्या संकटातून त्या वधूची सुटका झाली.

## टाकळीतील तपश्चर्या

संसारातील सुख-दु:खांची सरासरी काढता हा सारा संसार असार आहे हेच साऱ्या संसाराचे सार आहे असा सारासार विचार करून समर्थांनी घरदार सोडले. 'देवाच्या सख्यत्वासाठी। पडाव्या जिवलगांसी तुटी। सर्व अर्पावे सेवटी। प्राण तोही वेचावा।।' हा विचार समर्थ जगत होते. नासिकला बारा वर्षे राहून त्यांनी एकांतात कठोर साधना केली. समर्थांचे अद्वितीयत्व आणि असामान्यत्व त्यांच्या प्रत्येक कृतीतून दिसून येते. त्यांनी साधना सुरू करताना कोणत्याही व्यक्त गुरूकडून अनुग्रह घेतला नाही. प्रभू रामचंद्रांना गुरू मानून त्यांनी गायत्री पुरश्चरण आणि रामनामाचा त्रयोदशाक्षरी मंत्र यांची उपासना सुरू केली. रोज पहाटे ३ वाजता समर्थ उठत असत. चार वाजेपर्यंत स्नान-संध्या वगैरे आन्हिक उरकत असत. त्यानंतर दोन तास सूर्यनमस्कार घालीत असत. सकाळी ६ ते ८ गोदावरी आणि नंदिनी या नद्यांच्या संगमात उभे राहून ते दोन तास गायत्री मंत्राचा जप करीत. लोकांची वर्दळ सुरू झाली म्हणजे ते टाकळी येथील गुहेत जाऊन बसत. त्यावेळी एखादा शेतकरी त्यांना तांब्याभर दूध आणून देई. दूध घेतल्यावर माध्यान्हीपर्यंत समर्थ रामनामाच्या त्रयोदशाक्षरी मंत्राचा जप करीत असत. मग पंचवटीत पाच घरी मधुकरी मागत असत. दुपारी काळाराम मंदिरात काही थोर आचार्यांची प्रवचनं होत असत. समर्थांनी मोठ्या श्रद्धेने आणि प्रेमाने हृदयाच्या संपुटात ते सारे साठवावे. त्याकाळी नासिकमध्ये मोठे-मोठे विद्वान आचार्य राहात असत. त्यांच्या सहवासात समर्थांनी उपनिषदे, ब्रह्मसूत्र, भगवद्‌गीता, रामायण, महाभारत, योगवासिष्ठ, पंचदशी अशा मौलिक ग्रंथांचा अभ्यास केला. समर्थांच्या हस्ताक्षरात वयाच्या पंधराव्या वर्षी लिहून काढलेल्या वाल्मिकी रामायणाच्या मूळ संहितेची पाने आजही धुळे येथील 'समर्थ वाग्देवता मंदीर' या संस्थेत पाहायला मिळतात.

## समर्थांच्या दिनचर्येतील संतुलन

समर्थांच्या नासिकमधील दिनचर्येत एक सुंदर संतुलन पाहायला मिळते.

त्यात नुसते जप आणि ध्यान यांना स्थान नव्हते तर व्यायाम आणि ग्रंथांचे अध्ययन याचासुद्धा समावेश होता. समर्थ एकांगी आणि एककल्ली कधीच नव्हते. पुढे त्यांच्या संपूर्ण शिकवणुकीत मानवी जीवनाच्या सर्व अंगांना कसा स्पर्श झाला होता ते आपण यथाक्रम पाहाणार आहोतच. पण ही दिनचर्या पाहाताना स्वामी विवेकानंदांचे शिक्षणाबद्दलचे एक मत आठवते. स्वामीजी म्हणत- 'मन मनगट आणि मेंदू यांच्या संतुलित विकासाला मी शिक्षण असे म्हणतो.' व्यायामाद्वारे समर्थ आपले मनगट मजबूत करत होते. जप आणि ध्यान यांच्याद्वारे ते आपल्या मनाची मशागत करीत होते तर श्रवण साधना आणि विविध ग्रंथांच्या अध्ययनाद्वारे आपली बुद्धी बलशाली करीत होते. मनाला आणि बुद्धीला स्थिरता येण्यासाठी ध्यान, प्राणायाम, योगासने यांचा अभ्यास आवश्यक आहे. समर्थांच्या दिनचर्येत युवाशक्तीच्या विकासाची आधारभूत जीवनमूल्ये आपल्याला आढळतात. आश्चर्याची गोष्ट म्हणजे अशा प्रकारची दिनचर्या सतत बारा वर्ष सुरू होती. त्यामुळे समर्थांचे शारीरिक, मानसिक आणि बौद्धिक आरोग्य किती निकोप आणि निरामय झाले असेल याची आपण कल्पना करू शकतो.

## पहिला शिष्य, पहिला मठ, पहिला मठपती, पहिला मारुती

समर्थांच्या जीवनात नासिकचे स्थान मोठे महत्त्वाचे ठरते. रामचंद्रांच्या चरणस्पर्शाने पुनीत झालेली ही भूमी त्यांनी निवासासाठी निवडली. भगवान शंकराच्या जटेतून बाहेर पडलेली गोदावरी त्यांनी तपश्चर्येसाठी निवडली. करूणाष्टके, एकवीस समासी, आत्माराम या मौलिक ग्रंथांचा जन्म नासिकमध्ये झाला. तंजावरला सरस्वती महालात व्यंकोजीराजे भोसलेंचे जे दप्तर उपलब्ध आहे त्यानुसार समर्थांच्या नासिकच्या मुक्कामात शहाजी महाराज त्यांना भेटले होते असे दिसते. भावी आयुष्यात समर्थांनी सुमारे चौदाशे शिष्यांना अनुग्रह दिला. अकराशे मठ स्थापन केले. हजाराहून जास्त मारुती मंदिरं उभी केली. पण या नासिक नगरीचे भाग्य असे की समर्थांचा टाकळीचा पहिला मठ नाशकातील. उद्धव हे नाशिकच्या मठाचे पहिले मठपती ठरले. योगायोगाने ते समर्थांचे पहिले शिष्य देखील होते. तर टाकळीचा मारुती हा समर्थांनी स्थापन केलेला पहिला मारुती होय. समर्थांच्या या सगळ्या स्मृती इतिहासाने आजही जतन करून ठेवल्या आहेत.

समर्थ म्हणतात-

'सामर्थ्य आहे चळवळीचे। जो जो करील तयाचे।

परंतु तेथे भगवंताचे। अधिष्ठान पाहिजे।।'

समर्थांनी नासिकमधील वास्तव्यात आधी उपासनेद्वारा भगवंताचे अधिष्ठान प्राप्त करून घेतले. त्यांना प्रत्यक्ष रामचंद्रांचा कार्यासाठी आदेश मिळाला. आणि मग प्रत्यक्ष कार्याला प्रारंभ केला. मनाने काहीतरी कार्य करीत राहणे अथवा गप्प बसवत नाही, म्हणून एखादी चळवळ उभी करणे समर्थांना अपेक्षित नाही. आज चारशे वर्षानंतर त्यांचे विचार सर्वांना तारक ठरतात. याचे कारण 'राघवाचा वर पावलो सत्वर। जनाचा उद्धार करावया।' ही रामप्रभूंची प्रेरणाच होय. पुढे त्यांच्या हातून जे महान राष्ट्रकार्य झाले त्याचे श्रेय त्यांनी रामरायालाच दिले. प्रभु रामचंद्र हा समर्थांचा श्वास होता. त्यांची करुणाष्टके रामभक्तीने ओतप्रोत भरलेली आहेत. भक्तीच्या या अधिष्ठानामुळे ते अत्यंत निर्भयपणे भारतभर संचार करू शकले. ज्या काळात मूर्ती फोडल्या जात होत्या किंवा मंदिरे पाडली जात होती, त्या काळात त्यांनी हजारो मंदिरे उभी केली, ती रामकृपेमुळेच. भक्तीची ही बैठक पक्की केली म्हणजे मनात कुठेही द्वेष भावना असत नाही.

## समर्थांचे भारतभ्रमण

टाकळी येथे आपला शिष्य उद्धव याच्यावर मठाची जबाबदारी सोपवून समर्थांनी भारतभ्रमणाला प्रारंभ केला. त्यांची ही पदयात्रा सन १६३२ ते सन १६४४ अशी बारा वर्षे चालली होती. भारतातील विविध तीर्थक्षेत्रांचे दर्शन घ्यावे, तेथील अधिष्ठात्री देवतेला उपासना करून आवाहन करावे आणि धर्मसंस्थापनेच्या कार्यासाठी त्या त्या देवतेचे आशिर्वाद घ्यावेत या हेतूने समर्थ देशाटन करीत होते. परिस्थिती इतकी बिकट होती की भगवंताच्या कृपेखेरीज आपल्याला यश मिळणार नाही अशी त्यांची धारणा होती. तीर्थाटनाच्या निमित्ताने भारतभ्रमण करताना देशस्थितीचे अनुशीलन करावे असाही त्यांचा मानस होता. ज्या समाजाची आपल्याला सेवा करायची आहे त्या समाजाची नेमकी मानसिकता जाणून घ्यावी, त्या समाजाला झालेला नेमका रोग समजावून घ्यावा आणि मग भगवंताच्या कृपेने त्यावर उपाय शोधावा असेही त्यांच्या मनात होते.

भारतभ्रमणात एक गोष्ट समर्थांच्या लक्षात आली की, राष्ट्राला रजोगुणाची गरज आहे. अध्यात्माच्या नावाखाली लोक अत्यंत तमोगुणी झालेले आहेत. आपली निष्क्रियता लपविण्यासाठी अनेकांनी परमार्थाचा मुखवटा धारण केला आहे. ते काही खरे वैराग्य नव्हते. संसाराचे मिथ्यत्व लक्षात आल्यावर संसार गळून पडतो. पण संसार नीट करता येत नाही म्हणून संसार सोडून पळून जाणे

यात दांभिकता आहे. समर्थांनी या सीमारेषा अचूकपणे ओळखल्या. काही मंडळी वेदांतामागे लपून आपल्या आळशीपणाला खत-पाणी घालत होते. तेव्हा भाकरीची भ्रांत असताना वेदांत सांगणे धादांत खोटे आहे हे समर्थांनी भ्रांतचित्त समाजाला निर्भ्रांत अंतःकरणाने सांगितले. अनेकांचे संसार उद्ध्वस्त झाले होते. काहीजणांच्या तरण्या-ताठ्या मुली यवनांनी पळवून नेल्या होत्या. या सर्व अन्यायाविरूद्ध लढा देण्याऐवजी भगवी वस्त्रे परिधान करून गोसावी होणे लोक पसंत करत होते. अशा पलायनवाद्यांना समर्थांनी नेटका प्रपंच करायला सांगितला. एका स्फूट कवितेत ते परखडपणे विचारतात-

'अन्न पाहिजे आपणाला। अन्न पाहिजे स्त्रियेला।
अन्न पाहिजे लेकुराला।
मग कष्ट करूनी मेळवावे की जोगी होऊन जावे?
द्रव्य पाहिजे लग्नाला। द्रव्य पाहिजे घराला।
द्रव्य पाहिजे प्रपंचाला।
मग कष्ट करूनी मेळवावे की जोगी होऊन जावे?'

हिंदू धर्मामध्ये धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष हे चार पुरूषार्थ सांगितले आहेत. अर्थ आणि काम हे दोन पुरूषार्थ ज्याने व्यवस्थित संपादिले आहेत तोच मोक्षाचा अधिकारी होतो. संन्यास आश्रमाच्या आधी गृहस्थाश्रम सांगितला आहे तो एवढ्यासाठीच. ब्रह्मचर्य, गृहस्थ आणि वानप्रस्थ हे तीन आश्रम डावलून एकदम चतुर्थ आश्रमात प्रवेश करणे समर्थांना मान्य नव्हते. ज्ञानेश्वर, मुक्ताबाई, विवेकानंद, शंकराचार्य हे महापुरूष अपवादभूत आहेत. सामान्य माणसाने क्रमशः आश्रम धर्माचे पालन करून धर्म मार्गाने वासना तृप्ती करून घ्यावी. प्रपंच जर नेटका केला तर त्याचे आकर्षण आपोआप कमी होते हे मौलिक सूत्र समर्थ सांगतात. म्हणून समर्थांच्या शिष्य परंपरेत दिवाकर गोसावी, दत्तात्रय गोसावी, दिनकर गोसावी, गिरीधरस्वामी, सतीबाई शहापूरकर हे सारे शिष्य गृहस्थाश्रमी होते. देह ठेवताना आपल्या गादीवर समर्थांनी दिवाकर गोसावी या गृहस्थ भक्ताची नियुक्ती केली.

## शिखांच्या धर्मगुरूंची भेट

हिमालयापासून कन्याकुमारीपर्यंत भारतभर समर्थ पायी हिंडले. 'गाव तिथे मारुती' हे त्यांचे सूत्र होते. मारुती मंदिराबद्दल समर्थ एवढे लोकप्रिय आहेत की एखाद्या गावात स्थापन केलेले मारुती मंदीर केव्हापासूनचे आहे हे ठाऊक नसल्यास गावातील मंडळी 'हा मारुती रामदास स्वामींनी स्थापन केलेला आहे'

असे बिनधास्त सांगतात. त्या काळात ही हनुमान मंदिरे म्हणजे जणू व्यायामशाळाच होत्या. अनेक तरूण मुले हनुमंताच्या साक्षीने व्यायाम करीत असत. याखेरीज वेगवेगळ्या ग्रंथांचा अभ्यास तिथे होत असे. उत्तरेत काशी, मथुरा, वृंदावन, अयोध्या तर दक्षिणेत तंजावर, रामेश्वर, तिरूपती या विविध ठिकाणी समर्थांनी स्थापन केलेले मारुती आढळतात. याबाबतीत प्रसिद्ध इतिहास संशोधक सेतू माधवराव पगडी यांनी सांगितलेली आठवण मोठी मौलिक आहे. ते श्रीलंकेला गेले असताना तिथे त्यांना समर्थांनी स्थापन केलेला मारुती पाहायला मिळाला. आश्चर्याची गोष्ट म्हणजे तेथील पुजाऱ्याला मराठी भाषा समजत नसली तरी 'सत्राणे उड्डाणे हुंकार वदनी' ही समर्थांनी रचलेली मारुतीची आरती येत होती.

समर्थ श्रीनगरला गेले असताना त्यांची भेट शिखांचे सहावे धर्मगुरू गुरू हरगोविंद यांच्याशी झाली. त्यावेळी हरगोविंद यांनी एक हजार सैन्याची खडी फौज बरोबर ठेवली होती. ते स्वत: कमरेला दोन-दोन तलवारी बाळगत असत. डॉक्टर अशोक कामत यांनी शिखांचा त्रिखंडात्मक इतिहास लिहिला असून त्यातील दुसऱ्या खंडात समर्थांच्या या भेटीचा उल्लेख आहे. समर्थांनी हरगोविंद यांचेकडून सशस्त्र क्रांतीची प्रेरणा घेतली असा उल्लेख हरगोविंद यांच्या चरित्रात आहे. एवढेच नव्हे तर गुरू हरगोविंदांबरोबर समर्थ अमृतसरला आले होते, आणि सुवर्णमंदिरात दोन महिने राहिले होते, अशी ऐतिहासिक नोंद शिखांच्या इतिहासात आहे. यानंतर स्वत: समर्थ तलवार बाळगू लागले. मात्र त्यांची तलवार कुबडीमध्ये लपवून ठेवलेली असे. त्याला सांप्रदायिक भाषेत गुप्ती असा शब्द आहे. अशा प्रकारची एक गुप्ती सज्जनगडावर आजही पाहायला मिळते. या संदर्भात आचार्य गोपालदास यांची कथा मोठी मौलिक आहे.

समर्थ जयपूरला गेले असताना तिथे त्यांनी मठ स्थापन करून आचार्य गोपालदास यांची मठपती म्हणून नियुक्ती केली. या आचार्य गोपालदासांनी जिझिया कर भरला नाही म्हणून औरंगजेबने त्यांना अटक केली होती. त्यावेळी आपल्या कुबडीतील तलवार स्वत:च्या छातीत खूपसून घेऊन आचार्य गोपालदासांनी आत्मसमर्पण केल्याची नोंद आहे. आजही हा मठ पंचखंडपीठ म्हणून ओळखला जातो. आचार्य धर्मेंद्र महाराज या मठाचे विद्यमान मठपती आहेत.

## संत तुकाराम महाराजांची भेट

समर्थांच्या भारत भ्रमणाचे वैशिष्ट्य म्हणजे समर्थांनी त्या काळातील विविध संप्रदायातील अनेक सत्पुरुषांच्या गाठीभेटी घेतल्या. हैद्राबादला केशवस्वामी, वडगावला जयराम स्वामी, पाटगावचे मौनीबाबा, ब्रह्मनाळचे आनंदमूर्ती, निगडीचे

रंगनाथ स्वामी, चिंचवडचे मोरया देव या विविध सत्पुरूषांना ते भेटले. या सर्वांशी चांगले संबंध प्रस्थापित करून समर्थांनी सांप्रदायिक सद्भाव निर्माण केला. संत मोरया देव यांच्याकडून त्यांना तुकाराम महाराजांविषयी समजले म्हणून ते देहू गावात आले. तिथे त्यांनी तुकाराम महाराजांची भेट घेतली. दोघा संतांनी परस्परांना वंदन करून एकमेकांची स्तुती करणारे अभंग लिहिले. तुकाराम महाराजांबरोबर समर्थ आळंदी आणि पंढरपूर येथे देखील गेले. आजही पंढरपूरला समर्थांनी स्थापन केलेला मारुती विठ्ठल मंदिराच्या ओवरीत पाहायला मिळतो. छत्रपती शिवाजी महाराजांना तुकाराम महाराजांनीच समर्थांकडे पाठविले अशी सज्जनगडावरील सांप्रदायिक मंडळींची श्रद्धा आहे. त्यासाठी 'राया छत्रपती ऐकावे वचन' या तुकाराम महाराज विरचित अभंगाचा संदर्भ दिला जातो. डॉक्टर अशोक कामत यांनी संपादित केलेल्या संत तुकाराम महाराजांच्या गाथेत हा अभंग दिला आहे. शिवाजी महाराज तुकाराम महाराजांना देखील गुरू मानीत होते. तुकाराम महाराजांच्या कीर्तनाचा खोलवर ठसा शिवछत्रपतींच्या अंतःकरणावर होता अशी वारकरी मंडळींची श्रद्धा आहे. बाबा महाराज सातारकर यांनी एका प्रवचनात सांगितले- 'समर्थ रामदास आणि संत तुकाराम हे शिवाजी महाराजांचे दोन डोळे होते ही गोष्ट आपल्याला विसरून चालणार नाही.' एवढे मात्र खरे की छत्रपती शिवाजी महाराज, समर्थ रामदास आणि संत तुकाराम हे तीनही महापुरुष एकाच काळात अवतीर्ण झाले. प्राचार्य शिवाजीराव भोसले म्हणतात- 'हे तीनही महापुरुष सातारा आणि पुणे या जोडलेल्या जिल्ह्यांमध्ये वावरत असल्यामुळे ते परस्परांना नक्कीच भेटले असणार. त्यांच्यातील जिव्हाळ्याच्या संबंधाच्या पाऊलखुणा त्यांच्या ग्रंथात पाहायला मिळतात.' एकंदरीत समर्थांचे हे भारत भ्रमण राष्ट्रचिंतनाच्या दृष्टीने फार महत्त्वाचे ठरले. या भ्रमणाचे पडसाद त्यांच्या साहित्यात जागोजागी आढळतात.

## समर्थांची मातृभक्ती

समर्थांनी विवाह मंडपातून पलायन केल्यावर नासिकला बारा वर्ष टाकळी येथे तपःश्चर्या केली. त्यानंतर बारा वर्ष भारतभ्रमण केले. भारतभ्रमणाच्या शेवटी ते जांबमध्ये आले आणि चोवीस वर्षानंतर त्यांनी आपल्या मातेची भेट घेतली. समर्थ वैराग्यशाली होते पण तुसडे नव्हते. त्यांनी दोन महिने जांबेत राहून आपल्या मातेला 'कपिलगीता' हा ग्रंथ समजावून सांगितला. या ग्रंथावरील त्यांची प्रवचने ऐकण्यासाठी ग्रामस्थ मंडळी मोठ्या श्रद्धेने येऊन बसत. समर्थ मातेचा प्रेमळ आशीर्वाद आणि ग्रामस्थांचा सद्भावपूर्ण निरोप घेऊन राष्ट्रकार्यासाठी बाहेर

पडले. १६५५ साली शिवथर घळीत ते दासबोध लिहीत असताना आई खूप आजारी असल्याची सूचना देवीने स्वप्नात त्यांना दिली. त्यामुळे मातेच्या अंतकाळी समर्थ जांबेत उपस्थित राहू शकले. त्या माऊलीने रामनाम घेत आपल्या नारायणाच्या मांडीवर डोके ठेवून शांतपणे देह ठेवला. विवाह मंडपातून पलायन करताना समर्थांनी मातेची प्रतारणा केली असेल पण त्या पाठीमागे विश्वाची चिंता होती. मात्र विश्वाची काळजी करत असताना त्यांनी मातेकडे दुर्लक्ष केले नाही. त्या माऊलीने मोठ्या समाधानाने जगाचा निरोप घेतला. पंढरपूरहून आपल्या मातेला लिहिलेल्या पत्रात समर्थांनी तिचा किती गौरव केला ते पुढे आपण पाहाणार आहोतच.

## ११ मारुतींची स्थापना

समर्थांनी हनुमंताची नेमकी किती मंदिरे स्थापन केली हे सांगणे कठीण आहे. पण या विविध मारुती मंदिरापेक्षा त्यांनी स्थापन केलेले अकरा मारुती खूपच लोकप्रिय ठरले. आजही अष्टविनायकाच्या यात्रेप्रमाणे समर्थ स्थापित अकरा मारुतींची यात्रा लोक करतात. त्या अकरा मारुतींचा असा वेगळा उल्लेख का केला जातो याचे ठोस कारण सांप्रदायिक कागदपत्रात कुठेही सापडत नाही. या अकरा मारुतींचे नेमके वेगळेपण काय आहे तेही सांगता येत नाही. शिवराज्याभिषेक समयी समर्थांनी रचलेल्या 'आनंदवनभुवनी' या काव्यात एक गूढ ओवी आहे-

'अक्रा अक्रा बहु अक्रा। काय अक्रा कळेचिना।
गुप्त ते गुप्त जाणावे। आनंदवनभुवनी।।'

या ओवीचा संबंध या अकरा मारुतींशी तर नानाही? संत वेणाबाईंनी या अकरा मारुतींवर स्वतंत्र अभंग लिहिला असून त्यात त्यांनी त्या गावांची नावे पुढीलप्रमाणे दिली आहेत. मसूर, उंब्रज, शहापूर, माजगाव, शिंगणवाडी, मनपाडळे, बहे-बोरगाव, बत्तीस शिराळा, चाफळ, पारगाव. वेणाबाईंनी देखील नेमक्या याच अकरा मारुतींवरती का लिहिले याचा बोध अभंग वाचल्यानंतर होत नाही या अकरा मारुतींचे महत्त्व समर्थांनीच गुप्त ठेवले हे खरे. आश्चर्याची गोष्ट म्हणजे १६७८ सालच्या विजयादशमीला शिवाजी महाराजांनी चाफळ मठाला जे दान दिले त्यात या अकरा मारुतींना जमिनी इनाम दिल्या आहेत. राजकीय दृष्ट्या अकरा मारुतींचे महत्त्व असल्यास त्याचे संशोधन होणे गरजेचे आहे.

## चाफळात राममंदीर

समर्थांनी भारतभर भ्रमण केले. अनेक मठ स्थापन केले. पण समर्थ संप्रदायाच्या चळवळीचे मुख्यालय म्हणून चाफळची निवड केली. या मुख्यालयात मुख्य देवाची प्रतिष्ठापना व्हावी म्हणून राममंदीर उभे केले. समर्थांनी हनुमंताची अनेक मंदिरे निर्माण केली होती. पण ही सारी मंदिरे खूप छोटी होती. रामाचे भव्य मंदीर बांधावे असे त्यांच्या मनात होते. आश्चर्याची गोष्ट म्हणजे श्रमदानातून हे मंदीर समर्थांनी उभे केले. 'जय जय श्रीराम जय हरी श्रीराम' असे म्हणत मजूरवर्ग एकमेकांना पाट्या देत होते. 'जय श्रीराम' म्हणत बेलदार दगड फोडत होते. उत्साहाचे नवे वारे चाफळ खोऱ्यात वाहू लागले. याचवेळी समर्थांनी मनाच्या श्लोकांची रचना केली. मंदिरासाठी लागणारे द्रव्य आणि धान्य भिक्षेतून जमा करावयाचे होते. भिक्षा मागताना शिष्यांनी प्रत्येक घराच्या दारापुढे उभे राहून मोठ्यांदा मनाचे श्लोक म्हणावेत असे ठरले होते. अत्यंत प्रतिकूल परिस्थितीत समर्थांनी चाफळला रामाचे भव्य मंदीर उभे केले. आश्चर्य म्हणजे आदिलशहाकडे चाकरीला असलेले काही हिंदू सरदार धर्माभिमानी होते. त्यांनी चाफळच्या मंदिराला जमिनी इनाम दिल्याने आदिलशहाचा या कामी विरोध होऊ शकला नाही. शिवाय समर्थांनी कुराणाचा तसेच सुफी संप्रदायाचा अभ्यास केलेला होता. त्यांच्याकडे कोणतीही धर्मांधता नाही या गोष्टीची नोंद यवन अधिकाऱ्यांनी घेतली असणार याबद्दल शंका नाही. एकंदरीत मोठ्या कुशलतेने समर्थ आपल्या कार्याचे जाळे विणत होते. चाफळ हे समर्थांचे प्रधान केंद्र ठरले. त्यांचे महत्त्वाचे शिष्य चाफळात येऊन राहू लागले. अकरा मारुतीपैकी चार मारुती चाफळ परिसरात आहेत. अवघ्या तीन-साडेतीन मैलाच्या परिसरात समर्थांनी हनुमंताची चार मंदिरे का उभी करावीत हे अनाकलनीय आहे. समर्थ संप्रदायाच्या कागदपत्रात अशी नोंद आहे की चाफळच्या राममंदिराची कीर्ति ऐकून शिवाजी महाराज त्यांना भेटायला चाफळला आले.

## शिवसमर्थ भेटीचा वाद

छत्रपती शिवाजी आणि समर्थ रामदास यांची भेट नेमकी केव्हा झाली याबद्दल विविध विचारप्रवाह अस्तित्वात आहेत. सांप्रदायिक कागदपत्रानुसार ही भेट १६४९ साली झाली असे सांगितले जाते. त्यासाठी हनुमंतस्वामींच्या बखरीचा संदर्भ दिला जातो. प्रसिद्ध इतिहास संशोधक कै. ग. ह. खरे यांच्या मते ही भेट शिवथर घळीत १६५२ साली झाली. यासाठी त्यांनी समर्थांच्या

सहवासातील गिरीधरस्वामींनी लिहिलेल्या 'समर्थ प्रताप' या ग्रंथाचा आधार दिला आहे. नागपूरचे प्रसिद्ध शिव-कथाकार श्री. विजयराव देशमुख यांनी 'शककर्ते शिवराय' या आपल्या ग्रंथात ही भेट १६५८ साली झाली असे म्हटले आहे. त्यासाठी त्यांनी 'भास्कर गोसावी' यांनी चाफळ मठाला पाठवलेल्या पत्राचा संदर्भ दिला आहे. 'श्रीमंत बाबासाहेब पुरंदरे' आणि प्रसिद्ध इतिहास संशोधक 'सेतूमाधव पगडी' यांच्या मते ही भेट बऱ्याच उशीरा म्हणजे १६७२ साली झाली. त्यासाठी त्यांनी 'विठ्ठल गोसावी' यांनी 'दिवाकर गोसावी' यांना लिहिलेल्या पत्राचा संदर्भ दिला आहे.

अलिकडे छत्रपती शिवाजी आणि समर्थ रामदास यांची भेटच झाली नव्हती असे म्हणणारा एक विचारप्रवाह निर्माण झाला आहे. परंतु ग. ह. खरे, दत्तो वामन पोतदार, सेतूमाधवराव पगडी या अभ्यासकांचा अधिकार लक्षात घेता हा नवीन विचार त्यांच्यापुढे टिकत नाही. सेतूमाधवराव पगडी यांनी तर 'समर्थ प्रताप' या ग्रंथाच्या आधारे १६७२ ते १६७६ या चार वर्षात शिव-समर्थांच्या झालेल्या सात-आठ भेटींचे ठोस पुरावे दिले आहेत. त्यामुळे भेट झालीच नाही हा विचार वस्तुस्थितीला सोडून वाटतो. केव्हा भेट झाली यावरून मतभेद असल्याने काही बिघडत नाही. इतिहासाच्या अध्ययनात मतभेद हे जिवंतपणाचे लक्षण समजले जाते. याबाबतीत प्राचार्य शिवाजीराव भोसले यांचे निरोगी आणि निकोप विचार मला महत्त्वाचे वाटतात. प्राचार्य भोसले म्हणतात- समर्थ हे सागरासारखे व्यापक होते. शिवछत्रपतींना हिमालयाची उंची लाभली होती. हे दोघेही महापुरूष आपापल्या क्षेत्रात एवढे मोठे होते की त्यांचे मोठेपण सिद्ध करण्यासाठी भेटीचा आधार घेण्याची गरज नाही. त्या दोघांचे कार्य एकमेकांना पूरक होते ही वस्तुस्थिती नाकारण्याचेही कारण नाही.'

## शिवथर घळीत दासबोधाचे लेखन

श्रीमद् दासबोध हा समर्थ संप्रदायाचा प्रधान ग्रंथ आहे. या ग्रंथाचे लेखन १६५२ ते १६५४ आणि १६५६ ते १६६० या काळात समर्थांनी शिवथर घळीत राहून केले. रामदास स्वामी सांगत असत आणि कल्याणस्वामी लिहीत असत असा स्पष्ट उल्लेख दिवाकर गोसावी यांच्या पत्रात आहे. समर्थांची जी महत्त्वाची तीर्थक्षेत्रे आहेत त्यामध्ये शिवथर घळीचे एक वेगळे महत्त्व आहे. सज्जनगड, चाफळ, चंद्रगिरी, हेळवाक येथील घळींमध्ये देखील समर्थांचा निवास झाला, पण ग्रंथराज दासबोधाच्या लेखनामुळे शिवथर घळीला वेगळे महत्त्व प्राप्त झाले. समर्थ शिवथर घळीला 'सुंदरमठ' असे संबोधितात. भोवतालच्या प्रसन्न आणि

मनोहारी निसर्गामुळे 'सुंदरमठ' ही पदवीच जणू या मठाला मिळाली.

आश्चर्याची गोष्ट म्हणजे शिवथर घळीत समर्थ जिथे राहात तिथून अवघ्या दोन फर्लांग अंतरावर चंद्रराव मोरे यांचा वाडा आहे. १६५६ साली समर्थ पुन्हा घळीत आले. त्याचवेळी रायगडावर शिवाजी महाराजांनी चंद्रराव मोरेंना ठार मारले. तसेच १० नोव्हेंबर १६५९ला महाराजांनी प्रतापगडावर अफझलखानास मारले. १६६०च्या जानेवारी अखेर समर्थांनी शिवथर घळ सोडली. प्रतापगड आणि रायगड हे दोन्ही किल्ले शिवथर घळीपासून जवळ आहेत. १६७४ साली महाराजांना रायगडावर राज्याभिषेक झाला त्यावेळी देखील समर्थ शिवथर घळीतच होते. यावरून शिवथर घळ हे समर्थांच्या राजकीय हालचालींचे गुप्त केंद्र होते असे दिसते. एरवी एवढ्या निर्जन आणि घनदाट अरण्यात समर्थांनी एवढी वर्ष का राहावे ते कळत नाही. रायगड, प्रतापगड आणि सिंहगड या शिवछत्रपतींच्या तीनही किल्ल्यांवर समर्थांनी स्थापन केलेली मारुती मंदिरे आहेत.

## शेकडो मठ-हजारो महंत

समर्थांनी जी महान संघटना उभी केली त्याचे श्रेय त्यांच्या भटकंतीला द्यावे लागेल. भिक्षेच्या निमित्ताने समर्थ सतत हिंडत होते. प्रवासात माणसे हेरत होते. जागोजागी मठ स्थापन करून तिथे मठपतीला कार्याची दीक्षा देत होते. आश्चर्याची गोष्ट म्हणजे समर्थांचे बहुसंख्य मठपती १० ते २० या वयोगटातले होते. १०व्या वर्षी उद्धवस्वामींना टाकळीचे मठपती बनवले. त्याच वयाच्या दत्तात्रय गोसावींना शिरगाव मठाचे प्रमुख केले. १२व्या वर्षी आक्काबाईंना चाफळ मठाचे कारभारी नेमले. १३व्या वर्षी भीमस्वामींवर तंजावर मठाची जबाबदारी सोपविली. दिवाकर गोसावी १०व्या वर्षी महाबळेश्वरचे मठपती झाले. गिरीधरस्वामी १५व्या वर्षापासून समर्थांच्या सहवासात होते. समर्थ संप्रदायातील भिक्षा हे पैसे गोळा करण्याचे साधन नव्हते तर माणसे मिळविण्याचा मार्ग होता. समर्थांच्या शब्दात सांगावयाचे झाल्यास-

'कुग्रामे अथवा नगरे। पाहावी घरांची घरे।
भिक्षामिसे लहान थोरे। परिक्षून सोडावी।।
जयास भिक्षेचा अभ्यास। तयास वाटेना परदेश।
जिकडे तिकडे स्वदेश। भुवनत्रयी।।
काही भिक्षा आहे म्हणावे। अल्पसंतोषी असावे।
बहुत आणिता घ्यावे। मुष्टी येक।।'

स्वामी विवेकानंद म्हणतात- 'भिक्षेच्या द्वारे समर्थांनी लोकांना प्रवासाची सवय लावली. त्यातून त्याकाळी राष्ट्रीय एकात्मता निर्माण झाली.' समर्थ संप्रदायातील महत्त्वाचे जे मोहरे आहेत ते सारे भिक्षेतून मिळालेले आहेत. कल्याणस्वामी, दत्तात्रयस्वामी, वेणास्वामी, आक्काबाई, भीमस्वामी, सतीबाई ही सर्व मंडळी भिक्षेतून मिळालेली आहेत. या सर्वांनी पुढे आपले सर्व आयुष्य समर्थ संप्रदायासाठी समर्पित केले आहे.

## प्रसंगी अखंडीत वाचीत जावे

समर्थांना नुसती माणसांची गर्दी जमवायची नव्हती. त्यांना त्यांच्यावर संस्कार करायचे होते. 'बहुत लोक मेळवावे। येक विचारे भरावे।' हे त्यांच्या कार्याचे सूत्र होते. म्हणून त्यांनी आपल्या शिष्यांना अभ्यास करायला लावला. त्या काळात शिक्षणाचा एवढा प्रचार झालेला नव्हता. साक्षरतेचे प्रमाण अत्यल्प होते. म्हणून समर्थांनी आपल्या शिष्यांना साक्षर बनवले. त्यांच्याकडून नाना ग्रंथ लिहून घेतले. सुमारे शंभराहून अधिक कीर्तनकार आणि प्रवचनकार समर्थांनी तयार केले. या लोकांना जागोजागी संचार करून प्रचार करायला सांगितला. धर्माला आलेली अवकळा दूर करण्यासाठी समर्थांनी आपल्या यंत्रणेचा अत्यंत प्रभावी वापर केला. त्यांचा प्रत्येक मठ म्हणजे छोटेखानी ग्रंथालय असलेले सुसज्ज विद्यालय होते तर त्यांचा प्रत्येक मठपती हे चालते-बोलते विद्यापीठ होते.

समर्थ संप्रदायातील अध्ययनाच्या खुणा आजही धुळे येथील समर्थ वाग्देवता मंदिरात पाहायला मिळतात. समर्थांच्या शिष्याने लिहून काढलेली सुमारे साडेचार हजार हस्तलिखित बाडं आजही धुळ्यात पाहायला मिळतात. समर्थ शिष्यांची हजारो हस्तलिखिते तंजावर येथील सरस्वती महालात आढळतात. या हस्तलिखित बाडामध्ये ज्योतिषशास्त्र, खगोलशास्त्र, गणित, वनस्पतीशास्त्र, आरोग्यशास्त्र तसेच विविध संप्रदायातील ग्रंथांचा समावेश आहे. समर्थांच्या शिष्यांनी तुकाराम महाराजांच्या समग्र गाथेच्या ३५० नकला केलेल्या आज उपलब्ध आहेत. एकट्या वेणाबाईंनी आपल्या हयातीत २०० ग्रंथांच्या नकला केलेल्या होत्या. गिरिधरस्वामींनी ४०० ग्रंथ लिहून काढले होते. उंब्रज मठाधिपती केशवस्वामी यांनी दासबोध हा ग्रंथ १८ वेळा लिहून काढला होता. समर्थांच्या मठात शंकराचार्य, श्रीधराचार्य, मध्वाचार्य, मधुसूदन सरस्वती, मुक्तेश्वर, मुकुंदराज, सावता माळी, गोरा कुंभार इ. संतांचे ग्रंथ अभ्यासिले जात होते. एवढेच नव्हे तर शेख महंमद, हुसेन लतिफ, बाजिंद पठाण, शमनामरी या मुस्लिम संतांचाही अभ्यास समर्थ शिष्य करीत असत. ज्ञान ग्रहण

करताना वर्ण, जाती आणि धर्म यांच्या भिंती समर्थांनी उभ्या केल्या नाहीत.

## बहुजन समाजाचा अंतर्भाव

हिमालयापासून कन्याकुमारीपर्यंत समर्थांनी जे मठाचे जाळे विणले होते त्यामध्ये सर्व जातीचे आणि धर्माचे शिष्य होते. म्हशा महार, धोंडीबा धनगर, दत्तु न्हावी हे त्यांचे लाडके शिष्य होते. मराठवाड्यातील विविध मठांवर देखरेख करणारा वली महंमद मुस्लिम होता. समर्थांच्या दोन मुस्लिम शिष्यांच्या कबरी आजही सज्जनगडावर पाहायला मिळतात. शिरवळ मठाधिपती बाजी गोसावी आणि पालीचे मठपती श्रीरंग गोसावी हे मराठा समाजातले होते. समर्थांची भजनाची व्याख्या अत्यंत व्यापक आहे. ते म्हणतात-

'भेटो कुणी येक नर। धेड महार चांभार।
त्याचे राखावे अंतर। या नाव भजन।।'

१६७४ साली रामनवमी उत्सवात ब्राह्मण भोजनाऐवजी समर्थांनी एक हजार हरिजन दाम्पत्यांना जेऊ घातल्याची नोंद कागदोपत्री उपलब्ध आहे. श्रीमद् दासबोधात ते म्हणतात-

'ब्राह्मणाचे ब्रह्म ते सोवळे। आणि शूद्राचे ब्रह्म ते ओवळे।
ऐसे आगळे वेगळे। तेथे असेचिना।।
उंच ब्रह्म रायासि। आणि नीच ब्रह्म परिवारासी।
ऐसा भेद तयापासी। मुळीच नाही।।
नारायण असे विश्वी। त्याची पूजा करीत जावी।
या कारणे तोषवावी। कोणीतरी काया।।'

संत ज्ञानेश्वरांच्यापासून समर्थ आणि तुकोबारायापर्यंत महाराष्ट्रातील सर्वच संतांनी सामाजिक एकात्मता निर्माण करण्यासाठी सर्व थरातील लोकांना जवळ केले. भक्तांना जात-पात नसते. भक्त हीच त्यांची जात होय. या विशालतेमुळे आणि व्यापकतेमुळे समर्थांचा संप्रदाय फार गतीने सर्वत्र आणि सर्वदूर पसरला.

## शिवाजी महाराजांचा मृत्यू

सन १६७२ ते १६७६ ही चार वर्षे समर्थ शिवथर घळीत होते. सन १६७६ साली ते कफाच्या व्यथेने आजारी होते. हेळवाकच्या प्रवासात त्यांना थंडीची बाधा झाली होती. त्यावेळी त्यांचे वयही ६८ वर्षांचे झाले होते. समर्थांनी उर्वरित काळ फार दगदग न करता शांतपणे व्यतीत करावा म्हणून शिवाजी महाराजांनी त्यांच्या निवासाची व्यवस्था सज्जनगडावर केली. सन १६७६ साली समर्थ कायमच्या

निवासासाठी सज्जनगडावर आले. सन १६७७ साली त्यांचे थोरले बंधू गंगाधरस्वामी निधन पावले. सन १६७८ साली त्यांची लाडकी शिष्या वेणाबाई यांनी देह ठेवला. समर्थांना सर्वात मोठा मानसिक धक्का बसला तो शिवाजी महाराजांच्या मृत्यूचा. दि. ३ एप्रिल १६८० रोजी हनुमान जयंतीच्या दिवशी अतिसाराच्या दुखण्याने शिवाजी महाराज निधन पावले. त्यावेळी समर्थांच्या सन्निध असलेले गिरीधरस्वामी 'समर्थ प्रताप' या ग्रंथात लिहितात की, शिवछत्रपतींच्या मृत्यूनंतर समर्थांनी ३ महिने स्वतःला एका अंधाऱ्या खोलीत कोंडून घेतले. नंतर भिक्षेला बाहेर पडताना ते फुटकी भांडी वापरू लागले. त्यांनी जेवण सोडले. शिवाजी महाराजांच्या पश्चात समर्थ पावणे दोन वर्ष होते. या काळात ते फक्त दूध आणि फळे घेत.

## समर्थ रामदासांचा देहत्याग

शिवाजी महाराजांच्या मृत्यूनंतर रायगडावर महाराजांचा उत्तराधिकारी कोण यावरून तंटा सुरू झाला. त्यावेळी सोयराबाई साहेबांनी १० वर्षाच्या राजारामाला गादीवर बसविण्याचा घाट घातला. महाराजांचे काही मंत्रीही त्यात सामील झाले. हे प्रकरण पुढे इतके चिघळले की स्वराज्याचे दोन तट होणार असे दिसू लागले. या दुफळीचा फायदा घेऊन स्वराज्य नष्ट करण्यासाठी औरंगजेब सात लाख फौज घेऊन महाराष्ट्रात उतरला. त्यावेळी समर्थांनी संभाजी महाराजांना फार मौलिक पत्र पाठविले. या पत्रात समर्थ लिहितात-

'श्रेष्ठी जे जे मेळविले। त्यासाठी भांडत बैसले।
मग जाणावे फावले। गनिमासी।।
ऐसे सहसा करू नये। दोघे भांडता तिसऱ्यासी जये।
धीर धरूनी महत्कार्ये। राजकारण सांभाळावे।।
शिवरायाचे आठवावे रूप। शिवरायाचा आठवावा प्रताप।
शिवरायाचा आठवावा साक्षेप। भूमंडळी।।'

हे पत्र पाठवून झाल्यावर अवघ्या दहा दिवसांनी समर्थांनी सज्जनगडावर देह ठेवला. आजही माघ वद्य नवमीला समर्थांचा पुण्यतिथी उत्सव फार मोठ्या प्रमाणात साजरा केला जातो. सज्जनगडावरील समर्थांचे समाधी मंदीर संभाजी महाराजांनी बांधले असून आजही साताऱ्यातील भोसले घराण्यातील मंडळी सज्जनगडावर समर्थांच्या दर्शनासाठी येतात.

## समर्थांच्या पश्चात

समर्थांनी देह ठेवताना दिवाकर गोसावी यांना आपला उत्तराधिकारी नेमले.

सन १६८३ ते १७०० पर्यंत दासनवमी उत्सव आणि मंदिरातील सर्व कार्यक्रम व्यवस्थित चालू होते. सन १७०० साली औरंगजेबाने सज्जनगड जिंकून घेतला. सन १७०७ साली औरंगजेब मरण पावला. ही सात वर्षे गड मोगलांच्या ताब्यात होता. सन १७१० साली संभाजी महाराजांचे पुत्र शाहू महाराज यांनी सज्जनगडावर समर्थांच्या बंधूंच्या वंशजांना बोलावून आणले. रामदास स्वामी संस्थानाची स्थापना केली. समर्थांच्या वंशजांनी स्वामी आडनाव धारण करून सन १९०० सालापर्यंत देवस्थान उत्तम सांभाळले. सन १९०१ ते सन १९५० या काळात स्वामी घराण्यातील गृहकलहामुळे देवस्थानची अनास्था होऊ लागली. त्यावेळी श्रीधर स्वामींनी 'समर्थ सेवा मंडळ' ही संस्था स्थापन केली. सन १९५० ते २००० पर्यंत समर्थ सेवा मंडळाने स्वामी घराण्याच्या सहकार्याने सज्जनगड देवस्थानचा खूप विकास केला. कै. दिनकरबुवा बिवलकर आणि कै. अण्णाबुवा कालगावकर हे दोघे हयात असेपर्यंत सारे काही सुरळीत चालले होते. या दोघांच्या मृत्यूनंतर समर्थ सेवा मंडळ आणि स्वामी घराणे या दोघांनी आपल्या स्वतंत्र चुली मांडल्या. रामदास स्वामी संस्थान आणि समर्थ सेवा मंडळ या दोन्ही संस्था सध्या आपापल्या परीने समर्थांची मनोभावे सेवा करतात. जांब, चाफळ, टाकळी आणि शिवथर घळ येथेही समर्थांचे भक्त तेथील कारभार चांगला चालवित आहेत. समर्थ स्थापित ११ मारूती, मिरज, डोमगाव, भालगाव, अंबेजोगाई, हैद्राबाद, तंजावर, तिसगाव, ग्वाल्हेर, इंदौर, उज्जैन, रामेश्वर जुक्कल येथील समर्थांचे मठ आजही सुस्थितीत आढळतात. थोड्या फार प्रमाणात समर्थांचे कार्य तिथे चालते. आज ४०० वर्षानंतर संप्रदायाची एवढी केंद्रे चालू असणे हे समर्थ संप्रदायाच्या जिवंतपणाचे लक्षण आहे. समर्थांच्या शिष्य परंपरेत अनेक शिष्यांनी लिहिलेले ग्रंथ आजही उपलब्ध आहेत. या कामी धुळ्याचे कै. शंकर श्रीकृष्ण देव यांनी आपले सारे जीवन अर्पण केले. श्री. द्वा. वा. केळकर यांनी सुरू केलेल्या 'पत्रद्वारा दासबोध अभ्यास' या उपक्रमानेही संप्रदायाची संघटना मजबूत झाली. अलिकडे रेवदंडा येथील धर्माधिकारी परिवाराने बहुजन समाजात दासबोध पोहोचविण्याचे अतुलनीय आणि अद्वितीय कार्य केले आहे.



# करुणाष्टके: समर्थांचे आत्मचरित्र

समर्थ रामदासांची वाङ्मय संपदा अफाट आहे. सुमारे ३५ ते ४० हजार ओवी संख्या भरेल एवढे काव्य समर्थांनी लिहिले. त्यामध्ये श्रीमद् दासबोध, आत्मराम आणि मनाचे श्लोक हे तीन ग्रंथ समर्थ संप्रदायाची प्रस्थानत्रयी म्हणून ओळखले जातात. तरी देखील करुणाष्टकांचे स्थान अतिशय महत्त्वाचे आहे. सज्जनगडावरील समर्थ संप्रदायाच्या नित्य उपासनेत करुणाष्टकांचा अंतर्भाव केला जातो. करुणापर स्तोत्रे असे या रचनेचे स्वरूप आहे. त्याला करुणाष्टक हे नाव समर्थांनी दिलेले नाही. कारण नावाप्रमाणे या रचनेचा अष्टकाशी काहीही संबंध नाही. करुणाष्टकांची संख्या काही आठ नाही, तसेच प्रत्येक रचनेतील ओवीसंख्या आठ आहे असेही नाही. पाच ते वीस अशी विविध ओवीसंख्या असलेली सुमारे नव्वद करुणाष्टके आहेत.

या रचनांचे वैशिष्ट्य म्हणजे करुणाष्टकांत समर्थांच्या अंत:करणातील भगवंताविषयीची करुणा ओसंडून वाहताना आढळते. महर्षी नारदांनी भक्तीसूत्रात ईश्वरविषयक परमप्रेमाला भक्ती असे म्हटले आहे. भक्ताला भगवंताचा विरह अजिबात सहन होत नाही. सर्वच संतांनी भगवंताच्या विरहाची वेदना आपल्या काव्यात प्रकट केली आहे. समर्थ त्याला अपवाद नाहीत. समर्थांचे अंत:करण भगवंताच्या विरहाने अत्यंत व्याकुळ होत असे. जीवन जगण्यासाठी समर्थांनी एकमात्र रामरायाचे आलंबन स्वीकारले असल्यामुळे प्रभू रामचंद्र जर दर्शन देणार नसतील तर समर्थ जगू शकणार नाहीत ही त्यांची आर्तता करुणाष्टकातून प्रकट होते. म्हणजे एका अर्थाने करुणाष्टके हे समर्थांचे आत्मचरित्र आहे. आपल्या 'दिव्य जीवन' या ग्रंथाबद्दल योगी अरविंद म्हणतात- 'Divine life is not a treatise, it is a fact.' संत कबीर देखील आपल्या काव्याबद्दल म्हणतात- 'मैं कहता आँखन देखी। यह बात न पढ़ी लिखी।' सर्वच संतांची कविता आत्मानुभवावर अधिष्ठित आहे. श्रीमद् दासबोधामध्ये समर्थांनी काव्याचे तीन

प्रकार सांगितले आहेत.

१) धीट २) पाठ ३) प्रासादिक. धीट आणि पाठ या काव्य प्रकारात स्वत:ची अनुभूती नसते. धीट काव्यात कवीला अजिबात प्रतिभा नसते. धीट काव्याला अनुप्रास वा गेयता नसते. त्यात शब्दांची फार ओढाताण असते. पाठ काव्यामध्ये थोडी बहुत प्रतिभा असते पण ही प्रतिभा उसनवार असते. ती कवीची स्वत:ची प्रतिभा नसते. अन्य कवींनी रचलेल्या पाचपन्नास कविता वाचून त्याची नक्कल करावयाची आणि स्वत:च्या नावाने एखादे काव्य रचायचे हे पाठ काव्य होय. 'कवित्व नसावे धीट पाठ।' असे समर्थांचे स्पष्ट मत होते. प्रासादिक काव्य हेच खरे काव्य होय, कारण त्याला स्वानुभवाची बैठक आहे. भक्त जेव्हा भगवंताच्या भक्तीत रंगून जातो तेव्हा त्याची ऋतंभरा प्रज्ञा जागृत होते. देवी सरस्वती त्याच्या जीभेवर विराजमान होते. जणू प्रत्यक्ष भगवंतच त्याच्याकडून हे काव्य लिहवून घेतो. समर्थ म्हणतात-

'जया अंतरी भगवंत। अचळ राहिला निवांत।
तो स्वभावे जे बोलत। ते ब्रह्म निरुपण।।
आवडी लागली अंतरी। तैसीच वदे वैखरी।
भावें करुणाकीर्तन करी। प्रेमभरें नाचतु।।
ऐसा भगवंती रंगला। आणीक काही नलगे त्याला।
स्वइच्छा वर्णू लागला। ध्यान कीर्ती प्रताप।।'

सर्वच संतांच्या रचना प्रासादिक असल्यामुळे त्यांनी आपल्या काव्याचे श्रेय एक तर भगवंताला तरी दिले आहे किंवा सद्गुरुंना तरी दिले आहे. संत ज्ञानदेवांनी 'ज्ञानेश्वरी' या अद्वितीय ग्रंथाच्या लेखनाचे श्रेय त्यांचे सद्गुरु निवृत्तीनाथ यांना दिले आहे. संत तुकाराम महाराजांनी आपल्या हजारो अभंगाची निर्मिती विठ्ठलाच्या कृपेने झाली असे प्रांजळपणे नमूद केले आहे. समर्थ रामदास तर म्हणतात-

'सकळ करणे जगदीशाचे। आणी कवित्वची काय मानुषाचे।
ऐशा अप्रमाण बोलण्याचे। काय घ्यावे।।'

आपण वेद अथवा उपनिषद यांना अशरीरी वाणी म्हणतो किंवा अपौरुषेय म्हणतो कारण त्याची निर्मिती एखाद्या देहाच्या माध्यमातून झाली असली तरी त्यामागची खरी प्रेरणा भगवंताचीच असते. त्यादृष्टीने संत वाङ्मयही अपौरुषेयच म्हणावे लागेल. रामदास स्वामींनी आपल्या दासबोध या प्रधान ग्रंथाच्या लेखनाचे सारे श्रेय प्रभू रामचंद्रांना दिले आहे. प्रासादिक काव्याचे आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे सामाजिक बांधिलकीचा विचार. समाजामध्ये सदाचार आणि सद्भावना

प्रस्थापित करणे हाच अशा काव्यमागचा प्रधान हेतू असतो. समर्थ म्हणतात-

'जेणे सद्‌बुद्धि लागे। जेणे पाषांड भंगे।
जेणे विवेक जागे। या नाव कवित्व।।'
कवित्व असावें निर्मळ। कवित्व असावें रसाळ।
कवित्व असावें प्रांजळ। अन्वयाचें।।'

काव्याचे जे निकष समर्थांनी सांगितले त्या निकषाला त्यांची समग्र कविता उतरते. लोककल्याण किंवा जगदोद्धार हीच समर्थांच्या काव्यापाठीमागची प्रेरणा होती. त्यांना सामाजिक बांधिलकीची जाणीव तीव्र होती. करुणाष्टके म्हणजे समर्थांच्या प्रतिभाशक्तीचा पहिला हुंकार होय.

## करुणाष्टकातील समर्थांचा आत्मसंवाद-

सत्पुरुष स्वत:संबंधी फारसे बोलत नाहीत वा आत्मचरित्र लिहीत नाहीत. थोडा प्रयत्न केल्यास त्यांच्या काव्यातून त्यांच्या चरित्राच्या पाऊलखुणा पुसटशा आढळतात. करुणाष्टकांमध्ये समर्थांचे टाकळीतील वास्तव्य आपल्याशी बोलून जाते व त्यांची साधकदशा सांगून जाते. यावरून कशा प्रकारच्या जननिंदेच्या मुशीतून समर्थांचे सोने तावून सुलाखून बाहेर पडले ते लक्षात येते. त्यांचे पुढील उद्‌गार केवळ काव्य वाटत नाही तर त्यांच्या जीवनाचा हिस्सा वाटतो

'अन्न नाही वस्त्र नाही। सौख्य नाही जनामधे।
आश्रयो पाहता नाही। बुद्धि दे रघुनायका।।
संसारी श्लाघ्यता नाही। सर्वही लोक हासती। किंवा-
संसार नेटका नाही। उद्वेग वाटतो जीवी। किंवा-
देईना पूर्वीना कोणी। उगेचि जन हासती। लौकिक राखता ये ना। किंवा-
पिशुणे वाटती सर्वै। कुणीही मजला नसे।
समर्था तू दयासिंधू। बुद्धि दे रघुनायका।।'

येथे टाकळीच्या वास्तव्यात साधना करीत असताना प्रारंभी समर्थांना कोणत्या त्रासाला सामोरे जावे लागले असेल याची कल्पना येते. टाकळीत त्यांना कोणतीही सामाजिक प्रतिष्ठा नाही. रस्त्याने जाता-येताना लोक त्यांना टाकून आणि टोचून बोलत असावेत. त्यांची निवाऱ्याची व्यवस्था झाली होती; पण अन्न आणि वस्त्र यांची सन्मानपूर्वक सोय झालेली नसावी. अशा वेळी त्यांचा होत असलेला मानसिक कोंडमारा ते रामाखेरीज कोणाजवळ व्यक्त करणार? पुरेशी मधुकरी त्यांना मिळत नसणार. हा त्यांच्या भाव-भावनांचा कल्लोळ करुणाष्टकांतून प्रतिध्वनीत होत आहे.

समर्थ मळलेल्या वाटेने जाणाऱ्यांपैकी नव्हते. सर्वसामान्य प्रापंचिक माणसापेक्षा वेगळ्या पद्धतीने आपल्या जीवनाचा मार्ग त्यांनी निवडला होता. प्राथमिक अवस्थेत त्यांचे मोठेपण समाजाच्या लक्षात आले नसणार. माणूस जीवनात जोपर्यंत यशस्वी होत नाही तोपर्यंत लोकांच्या दृष्टीने तो सामान्यच असतो. समर्थांना या सगळ्या प्रतिकूल वातावरणात आपण कसे टिकून राहू अशी शंका निर्माण झाली असावी. बारा वर्षे नाशकात राहून तप:श्चर्या करण्याचा संकल्प तर सोडला गेला होता, पण या सामाजिक त्रासामुळे त्यांना पुन्हा घरची आठवण होऊ लागली आणि आपली तपश्चर्या अर्धवट सोडून परत घरी निघून जावे की काय असे त्यांना वाटू लागले हे करुणाष्टकातील पुढील काव्यपंक्तीवरून स्पष्टपणे लक्षात येते-

'उठे मानसी सर्व सांडूनी जावे। रघुनायका काय कैसे करावे।।
घरे सुंदर सौख्य नाना परीचे। परी कोण जाणेल ते अंतरीचे।
मनी आठवीताची तो कंठ दाटे। उदासीन हा काळ कोठे न कंठे।।
चपळपण मनाचे मोडीता मोडवेना। सकळ स्वजन माया तोडीता तोडवेना।।
घडी घडी विघडे हा निश्चयो अंतरीचा। म्हणऊनि करुणा हे बोलतो दीनवाचा।।'

घरदार सोडल्यानंतर प्राथमिक गरजांसाठी समर्थ समाजावर अवलंबून होते. त्यांच्या किमान गरजा पूर्ण करताना समाज त्यांची हेळसांड करीत होता. समर्थांचा जन्म एका चांगल्या कुळात झाला होता. त्यांची घरची सांपत्तिक स्थिती चांगली होती त्यामुळे असे 'येळीलवाणे' जीवन ते जगू शकले नसते. सगळे आधार तुटल्यावर रामरायाचा आधार घेणे त्यांना महत्त्वाचे वाटले म्हणून आपल्या मनातील कारुण्यभाव ते या ओव्यातून व्यक्त करतात. समर्थ मानसिक पातळीवर साधना करीत होते. अशा वेळी फार मोठ्या वैचारिक संघर्षाला सामोरे जावे लागते. कर्मकांडी अथवा परंपरावादी साधकाला या दिव्यातून जावे लागत नाही. साहजिकच 'घडीने घडी चित्त किती धरावे।' हा प्रश्न समर्थांच्या मनात निर्माण झाला. म्हणून करुणाष्टके म्हणजे समर्थांचे संक्षिप्त आत्मचरित्र होय.

## श्री समर्थांची आंतरिक स्थिती-

रामरायाच्या प्रेमाने त्यांचे अंत:करण ओतप्रोत भरले होते. रामचंद्रांचे विस्मरण अथवा वियोग त्यांना सहन होणे शक्य नव्हते. वासनेचे व्यर्थत्व आणि दृश्य जगताचे नश्वरत्व त्यांच्या चित्तात खोलवर रूजले होते. साधकदशेमधे असताना लोकसंग्रहाची उपाधी नसावी अशी त्यांची धारणा होती. वारंवार रामचंद्रांचे दर्शन घडावे, रामरायाशी संभाषण करावे, राम हेच आपल्या जीवनाचे

एकमेव भावविश्व व्हावे ही त्यांची प्रामाणिक चित्तदशा पुढील करुणाष्टकातून प्रकट होते-

'सदा सर्वदा योग तुझा घडावा। तुझेकारणी देह माझा पडावा।
नुपेक्षी कदा गुणवंता अनंता। रघुनायेका मागणे हे चि आता।।
नको द्रव्य दारा नको येरझारा। नको मानसी ज्ञानगर्वे फुगारा।
सगुणा मज लाविरे भक्तिपंथा। रघुनायेका मागणे हे चि आता।।
मनीं नावडे द्रव्य दारा पसारा। मनी नावडे माइकांचा उबारा।
मनी नावडे भोग हा राजयोगे। उदासीन हे वृत्ति कोठे न लागे।।
बहुसाल हे बोलणे आवडेना। जनीं वासना शब्दज्ञाने पडेना।
क्रियेवीण ते बोलता चीत भंगे। उदासीन हे वृत्ति कोठे न लागे।।
उपाधीगुणे सत्य ते मीथ्य होते। उपाधीगुणे मीथ्य ते सत्य होते।
उपाधीगुणे येक रंगे विरंगे। उदासीन हे वृत्ति कोठे न लागे।।
उपाधीगुणे लागतो पक्ष घेणे। उपाधीगुणे सत्य सोडून देणे।
उपाधीगुणे वीषई जीव रंगे। उदासीन हे वृत्ती कोठे न लागे।।
उपाधीगुणे सर्व सोसीत जावे। उपाधीगुणे मानवाधेन व्हावे।
उपाधीगुणे वेर्थ हा स्वार्थ लागे। उदासीन हे वृत्ति कोठे न लागे।।
सुषुप्ती अवस्थेसि भूमी निजावे। उसें रामपादे स्मरोनी धरावे।
दिशांचा माहापट तो पांघरावा। सिताकारणे साह्य वन्ही करावा।।
यथाधवी देहो वनामाजि जावा। तथागारदारादिकींही पिडावा।
श्रीरामोस्मि बोधे स्मरावा स्मरावा। रामी रामदास्ये स्वशांती निवावा।।
जन वमनपरी तू टाकि थुंकून चित्ता। वन विजन धरी तू ज्ञान वैराग्यवंता।
विसर सकळ दुखे पावती शांतिरामी। पहुडसि सुखसेजे सर्व कल्याणधामी।
गजबज मज आता सर्वथा आवडेना। बहुत बडबडीतो त्यास आम्हा पडेना।
विचरत नरमाने सर्वदा आनुरागे। आनुदिन वितरागे भोगत्यागे विरागे।।
स्वजनजन तजावे देश लंघूनि जावे। कठिण मन करावे झाडखंडी भरावे।
अनुदिन विवरावे दूरि देशी भरावे। निरुपण विवरावे तर्कपंथे चि जावे।'

या ओव्या वाचल्या म्हणजे समर्थांच्या मन:स्थितीची कल्पना येते. अशी चित्तदशा ज्याला प्राप्त होते तो भगवद्प्राप्तीचा अधिकारी आहे. आपलीदेखील मानसिकता अशी तयार व्हावी म्हणून करुणाष्टकं रोज म्हणावयाची असतात. कदाचित समर्थ वाङ्मयाच्या सत्संगाने आपणासही ती अवस्था प्राप्त होईल. वैराग्य हा भक्तीचा प्राण आहे. आपल्या प्रेमास्पदासाठी आपण काय सोडायला तयार आहोत यावरून आपल्याला काय प्राप्त होणार ते ठरते. ईश्वराचे दर्शन व्हावे असे

प्रत्येक साधकास वाटते; पण त्यासाठी विषयांचा त्याग करण्याची त्याची तयारी नसते. व्याकुळता नाही; पण दर्शन हवे अशीच अनेकांची स्थिती असते. आचार्य रामसुखदास महाराज म्हणतात- 'माणसाला भगवंताचा विरह सहन होतो म्हणून त्याला भगवंताचे दर्शन होत नाही. 'तद्विस्मरणे परम व्याकुलता' असे नारदांनी या अवस्थेचे वर्णन केले आहे.

साधनकालात लोकसंग्रहाची उपाधी नको. म्हणून समर्थांनी स्वत:ला बारा वर्षे जनसंपर्कापासून दूर ठेवले. प्रत्यक्ष भगवंताचा आदेश मिळाल्यावर त्यांनी कार्याला प्रारंभ केला. साधनकालात मन चिमुकल्या रोपासारखे असते. ते रोप जेव्हा विराट वृक्ष बनून स्वसंरक्षणास क्षम होते तेव्हा कुंपण काढून टाकले तरी चालते. साधकदशा ही कुंपणासारखी आहे. आज अनेक कार्यकर्ते लोकसंग्रहापेक्षा लोकेष्णा आणि लोकप्रियता यांच्या आहारी जातात. धड साधना नाही आणि धड समाजसेवा नाही, उलट कार्यात कटकटी वाढवून कार्यकर्ता आपली मन:शांती गमावून बसतो. मन:शांतीच्या मोबदल्यात ईश्वरसेवा किंवा समाजसेवा ही गोष्ट खोटी आहे. म्हणून समर्थांनी साधकांना मार्गदर्शक ठरण्यासाठी आपली अवस्था बोलून दाखविली.

## करुणाष्टके: साधकाची अंतर्यात्रा-

जगाचा रस्ता आणि भगवंताचा रस्ता परस्परविरोधी आहे. पारमार्थिक होणे म्हणजे प्रवाहाच्या विरुद्ध पोहण्यासारखे आहे. व्यावहारिक जगत् ही एक बहिर्यात्रा आहे तर भगवंताचे विश्व ही एक अंतर्यात्रा आहे. समर्थांनी या अंतर्यात्रेच्या काही खुणा (माईल स्टोन) करुणाष्टकात दिल्या आहेत. असा साधक अनेकदा व्यावहारिक जगतात वेडा ठरू शकतो. ज्याला स्वत:चा स्वार्थ कळतो अशा माणसाला संतदेखील शहाणा म्हणत नाहीत. म्हणून समर्थ काही करुणाष्टकांमध्ये माणसातील दोष आणि दुर्गुणांची चर्चा करतात; तर काही ठिकाणी जीवनाची नश्वरता आणि सुखाची क्षणभंगुरता लक्षात आणून देतात. समर्थांच्या मते साधकाने वेळीच सावध होऊन नित्यानित्य विवेक करावा व अनित्य अशा संसाराविषयीचे किंवा आप्तस्वकीयांबद्दलचे ममत्व सोडून द्यावे. परनिंदा आणि परस्त्री याबद्दल ते सावधनतेचा इशारा देतात. तरुणपणीच साधनपथ स्वीकारावा म्हणून ते म्हणतात-

'देहे चालता सर्वही सुख आहे। देहे खंगता कोण संनीध राहे।
मिळाली सखी चोरटी वैभवाची। भले जाणती दायके ही भवाची।।
न पाहे कदा देव तारुण्यकाळी। देहे खंगता सर्व जाली उमाळी।

बराडी दिसे बापुडे दैन्यवाणे। तयालागि सांभाळिजे काय कोणे।।
उठे गर्व हा सर्व तारुण्यकाळी। मदें मातले चित्त हे काममेळी।
विकारे मनी देव तो आठवेना। पुढे अंतकाळी स्मरेना स्मरेना।।'

यातून साधकाला साधनेसंबंधीच्या मौलिक सूचना मिळतात. अनेक प्रवचनकार अथवा कीर्तनकार आपल्या निरुपणात स्त्रियांची निंदा करतात. त्यांचे कान पिळताना समर्थ म्हणतात-

'बहुता दिसांच्या वयोवृद्ध मूला। जनी बायकोच्या गुणें जन्म तूला।
तये जननीच्या कुळा निंदितोसी। वृथापुष्ट तू मानवांमाजि होसी।।
किती दीस ते वाइले पोटवोझे। पुढे जन्मता खंडिले नाळ तूझे।
जिवी दीस मागील ते आठवावे। जनीं कष्ट कुश्चीळ कैसे करावे।।
मळी लोळता घोळता कष्टलासी। किती हागसी मूतसी वोकिलासी।
खते खांडके दुख उदंड जाले। बहुता प्रकारे तुला वाढवीले।।
बहु जननीने तुझे कष्ट केले। बरे वोखटे सर्व साहोनि नेले।
मनामाजि मागील का आठवेना। देहे पुष्ट हा वेर्थ तुझा झिजेना।।
मुढा वोंगळा वोंगळी जन्मलासी। तुझी जननी ते तुझे कष्ट सोसी।।
जनी पाळिती सर्व नारी नराला। तया निंदिती शुधि नाही खराला।।
स्वयें निंद्य तू निंदिसी कोणकोणा। जनी सर्व संसार हा दैन्यवाणा।
देहेमोघळा कोथळा वांति विष्टा। किती येक दुर्गंधि वर्तो प्रतिष्टा।।'

काही माणसे सत्ता आणि संपत्ती यांचा लोभ धरून आयुष्यभर धडपड आणि धावपळ करत राहतात. पण जीवनाच्या सायंकाळी सारे काही इथेच सोडून जातात. मग एवढा हव्यास कशासाठी? समर्थांनी एका करुणाष्टकात तर 'मरताना करदोटासुद्धा तोडून काढून टाकतात;' असे परखडपणे सांगितले आहे. एका अर्थाने साधकाला हा इशाराच आहे. समर्थ सांगतात-

'अनेक दिव्यांबर रत्नमाळा। सिंह्मासनी फाकती रम्य कीळा।
शरीर ते ही लागे तजावे। सेखी जिवे सोडुनि सर्व जावे।।
सर्वत्र हे वैभव ईश्वराचे। अनुमात्र ते ही नाही जिवाचे।
जन्मासि येता उघडे चि यावे। सेखी जिवे सांडुनि सर्व जावे।।
मधे चि हे सर्व निर्माण जाले। ऋणानुबंधे सकळै मिळाले।
अज्ञानयोगे ममता भ्रमावे। सेखी जिवे सांडुनि सर्व जावे।।
जिता जिवाते बहुसाल चित्ती। करणे घडे हो धन हाव कीर्ति।
कटीसूत्र ते ही तोडून द्यावे। सेखी जिवे सांडुनि सर्व जावे।।'

जीवन एवढे अनित्य असूनही माणसाला किती गर्व आणि ताठा असतो!

आपल्या साध्या साध्या गोष्टीचा त्याला किती अभिमान असतो याचे समर्थांनी अत्यंत उपहासगर्भ शब्दात केलेले पुढील वर्णन माणसाचा गर्वाचा पारा एकदम खाली उतरेल असेच आहे-

'बहु थोर मी शूर मी शाहाणा मी। बहु दक्ष मी धूर्त मी जाणता मी।
बहु नाटकु नेटकु चाळकु मी। बहुतांमधे मान्यसौजन्य तो मी।।
बहु बोलणे नीट नेमस्त माझे। बहु चालणे सत्य नेमस्त माझे।
बहुसाल संगीत कर्तृत्व माझे। बहुतामधे गोड हे सर्व माझे
बहु चांगली वांगली नेटकी मी। बहु जाणती जाण च्यातुर्य ते मी।
बहु बोलकी चालकी सुग्रिणी मी। बहु भाग्य सौभाग्य लावण्य ते मी।।
बहुसाल हो गोजिरे मूल माझे। बहु सासुरे थोर माहेर माझे।
बहुतांमध्ये उंच ते कूळ माझे। बहु गीत माझे बरे सर्व माझे।।'

'अभिमान' या काव्यात तर गर्विष्ठ माणसांची एवढी टिंगल उडविली आहे की अशा अभिमानी माणसाला डोळ्यातील चिपाडांचा आणि नाकातील शेंबडाचा देखील अभिमान असतो. 'प्रपंचाचे वेड' किंवा 'आशा प्रपंची' या दोन्ही करुणाष्टकात माणूस संसारात कसा अडकतो याचे  अत्यंत कठोर वर्णन आहे. 'वृद्धापकाळ' या करुणाष्टकात बीभत्स रसाचा वापर करून शरीराची नश्वरता सांगितली आहे. यावर उपाय सांगताना समर्थ म्हणतात-

'संसार माया ममता नसावी। नैराशता दुल्लभ ते असावी।
आनंदरुपी भजनी भरावे। निरूपणे मानस आवरावे।।
कल्याणकारी भवशोक हारी। सत्संगती मानव मूढ नारी।
ग्रंथांतरी अंतर वीवरावे। निरूपणे मानस आवरावे।।
बहुत सार विचार करी मना। दृढ धरी रघुनाथ उपासना।
रघुविरा भजता चि सुखावसी। परम सुंदर ते पद पावसी।

म्हणून  माणसाने शाश्वताचा निश्चय करावा असे समर्थ सांगतात.

### करुणाष्टकातील सगुणोपासना-

'नारदांनी भक्तीसूत्रात अकरा प्रकारच्या आसक्ती सांगितल्या आहेत. त्यातील रूपासक्ती आणि गुणासक्ती या मुख्य आसक्ती आहेत. माणसाला रूपाचे आणि गुणाचे आकर्षण असणे ही स्वाभाविक प्रेरणा आहे. सर्वच संतांनी ही स्वाभाविक प्रेरणा भगवंताचे रूप आणि भगवंताचे गुण यासाठी वापरून या आसक्तीचा मुक्तीसाठी वापर करून घेतला. त्यासाठी सर्वच संतांनी विविध दैवतांचे स्तवन केले. समर्थांनी त्यांचे आराध्य दैवत श्रीराम यांच्या सगुण रूपाचे

वर्णन करणारी अथवा गुणांचे वर्णन सांगणारी अनेक करुणाष्टके लिहिली आहेत. रामाप्रमाणेच भगवान श्रीकृष्णांचे गुणवर्णन देखील समर्थ करतात. देव-दैवतांच्या गुणांचे चिंतन करीत असताना आपल्यामध्ये ते गुण आत्मसात व्हावेत हा या स्तवनामागे हेतू असतो. तसेच आयुष्यात कायम बंधनात टाकणाऱ्या एखाद्या रूपाकडे आकृष्ट होण्यापेक्षा भगवंताच्या गोड रूपाची आवड लावून घेऊन जीवन सार्थकी लावावे असे समर्थांना वाटते. रामांचे वर्णन करताना ते म्हणतात-

'परमसुंदर रुपशामळ। इंद्रनीलकीळ कांतिकोमळ।
भयनिवारण भक्तवछळ। वरपराक्रम कीर्तिवीमळ।।
भुवनकंटक दैत्यमारक। अमरमोचन दैन्यहारक।
दुरितनाशन पुण्यकारक। हरितसंकट दासतारक।।'

समर्थ रामभक्त असले तरी भगवान श्रीकृष्णांच्या रूपाचे किती गोड वर्णन ते करतात हे पाहण्यासारखे आहे-

'नटे नेटके रुपलावण्य साजे। यमुनेतिरी रम्य राजे विराजे।
अती मृद वेणुस्वरे रंग माजे। आळापे जळा रोध आकाश गाजे।।
उभा देऊढा पाऊली वौशपाणी। ध्वनी गौल्य रागावलीची सिराणी।
तया खेचरे भूचरे लुब्ध जाली। देहेभावना हेत सुखे विराली।।
पदी वक्र वामांग ठाणी विराजे। ग्रिवा वक्र बोटे ध्वनी वक्र वाजे।
कटी वक्रता भृल्लता वक्र पाहे। तया देखता जीव थकीत राहे।
उभा वक्र हा देऊडा चक्रपाणी। जया शक्र भांबावला नक्र ताणी।
सदा सेविती तक्र त्या विक्रयो ही। जगी धन्य गौळी म्हणे दास तो ही।।'

'राघव नीरविला' या करुणाष्टकात समर्थांच्या कल्पनाशक्तीचे विलोभनीय दर्शन घडते. रामचंद्र जेव्हा वनवासाला निघतात तेव्हा वात्सल्यमूर्ती कौसल्यामाता पंचमहाभूतांना रामचंद्रांच्या रक्षणासाठी प्रार्थना करतात. रामांच्या पायांना अनवाणी चालताना खडे रुतू नयेत याची पृथ्वीने काळजी घ्यावी. नद्या, सरोवरे शुद्ध जलाशयांनी संपृक्त असली म्हणजे रामांना पिण्यासाठी लगेच ते उपलब्ध होईल अशी आशा आपाकडून व्यक्त केली आहे. रामचंद्र सूर्यवंशी असल्यामुळे सूर्यदेवांनी रामचंद्रांच्या वरती कोमल किरणांचा वर्षाव करावा आणि त्यांना ताप होणार नाही याची काळजी घ्यावी. रामांच्या अंगावर धूळ उडणार नाही अशा पद्धतीने वाऱ्याने वहावे. वायूला प्रार्थना करताना साहित्यदृष्ट्या कालविपर्यय हा दोष आढळतो. कारण वायूला प्रार्थना करताना 'राम तुझ्या मुलाचे गुरू आहेत' असे कौसल्या म्हणते. प्रत्यक्षात रामाची आणि हनुमंतांची भेट वनात १२ वर्षांनतर किष्किंधेजवळ ऋष्यमुख पर्वतावर झाली आहे. अर्थात कौसल्येची ही प्रार्थना

समर्थांचा कल्पनाविलास असल्यामुळे आणि समर्थ अलिकडच्या काळातील असल्यामुळे हा कालविपर्यास समजायचे कारण नाही. कौसल्या वनस्पतींना आपल्या सुगंधाने रामांचा श्रमपरिहार करायला सांगते तर कोकीळेसह सर्व पक्ष्यांनी आपल्या मंजुळ स्वरांनी भगवती सीतेचे मानसरंजन करावे म्हणजे तिला वनाचा कंटाळा येणार नाही अशी पक्षीकुळाला प्रार्थना करते. प्रार्थना करताना माता कौसल्येचा कंठ दाटून येतो आणि डोळे पाणवतात.



# मनाचे श्लोक

समर्थांच्या अफाट वाङ्मयसंपदेमध्ये मनाचे श्लोक हे छोटेखानी प्रकरण एखाद्या कोहिनूर हिऱ्याप्रमाणे झळकत रहाते. 'नातिसंक्षेप नातिविस्तार' असे या ग्रंथाचे स्वरूप आहे. अवघ्या दोनशे पाच श्लोकांमध्ये समर्थांनी मानवी जीवनाचे रहस्य उलगडून दाखविले आहे. मनाच्या श्लोकांना आचार्य विनोबा भावे 'मनोपनिषद' म्हणतात. ही रचना भुजंगप्रयात वृत्तामध्ये आहे. त्यामुळे त्या श्लोकांना स्वतःची अशी चाल आहे. त्याला गेयता आहे. इतरांना उपदेश करण्यापेक्षा माणसाने स्वतःलाच उपदेश करावा. 'मन करा रे प्रसन्न। सर्व सिद्धींचे कारण।' असे तुकाराम महाराज म्हणतात. परमार्थ साधना करताना आपले मन जर आपल्याला अनुकूल नसेल तर आपल्याला साधनेत यश मिळणार नाही म्हणून तुकाराम महाराज 'मन हेच गुरू आहे' असे म्हणतात.

आपले मन आपल्याला जाणवते; पण त्याचे नियमन करणे आपल्याला शक्य होत नाही. खुद्द अर्जुनाने भगवंताला प्रामाणिकपणे सांगितले की, माझे मन मला आवरता येत नाही. समर्थांनी देखील करुणाष्टकांत 'अचपळ मन माझे नावरे आवरिता' अशी खंत व्यक्त केली आहे. सर्व संतांनी मनोजयावर भर दिला आहे. जर मन शांत नसेल तर जीवनात सर्व सुख उपलब्ध असूनही माणसाला त्याचा आनंद घेता येणार नाही. मन अत्यंत सूक्ष्म असल्यामुळे त्याचे नियमन करणे खूप कठीण आहे. म्हणून प्रारंभिक अवस्थेत इंद्रियांचे नियमन करायला सांगितले. अर्थात शरीराला आणि इंद्रियांना वळण लावायचे असल्यास मन अनुकूल असावे लागते. मनाची संकल्पशक्ती तीव्र असल्यास इंद्रिये मनाचे अनुसरण करतील. त्यासाठी चांगले काय आणि वाईट काय हे बुद्धीला पटले पाहिजे. मन आणि बुद्धी यांच्यात एकवाक्यता पाहिजे. भगवद्गीतेच्या सहाव्या अध्यायात भगवंताने मन, बुद्धी आणि इंद्रिय यांच्यात सुसंवाद निर्माण करण्यासाठी ध्यानमार्ग सांगितला.

समर्थ संप्रदायामध्ये मठांचा खर्च भिक्षेतून चालवायचा अशी शिस्त समर्थांनी लावली. एवढेच नव्हे तर नवीन मंदिराची निर्मिती भिक्षेच्या पैशातून करायची असे ठरविले. भिक्षा मागत असताना शिष्यांनी धान्याच्या मोबदल्यात लोकांना एखादा मौलिक संदेश द्यावयाचा किंवा जीवनाचे मौलिक सूत्र प्रदान करावयाचे ही समर्थांची धारणा होती. तेव्हा मनाचे श्लोक म्हणजे लोकसंग्रहार्थ आणि लोककल्याणार्थ देशभक्त असलेल्या देवभक्तांची संजीवन आणि सक्रीय अशी प्रभातफेरी होय.

## श्रेयप्रेयविचार

मनाच्या श्लोकातील पहिला श्लोक स्तवनाचा आहे तर शेवटचा श्लोक फलश्रुतीचा आहे. मधले दोनशे तीन श्लोक उपदेशाचे आहेत. याचा अर्थ प्रास्ताविक आणि आभार प्रदर्शन थोडक्यात उरकून समर्थांनी मुख्य विषयाला पूर्ण वेळ दिला आहे. सदाचारावर समर्थांचा विलक्षण भर होता. म्हणून कसे वागावे आणि कसे वागू नये (विधी आणि निषेध) याचे विवेचन प्रारंभीच्या सव्वीस श्लोकात समर्थांनी केले आहे. मानवी जीवनाचे परस्पर विरोधी दोन स्तर आहेत. १) पहिला स्तर-प्रेम, माणुसकी, श्रद्धा, त्याग, तितिक्षा, ईश्वरभाव, दया, क्षमा, शांती, ब्रह्मचर्य, भगवद्‌भाव, परोपकार, दुसऱ्याचे चांगले पाहवणे, दुसऱ्यांना मदत करणे तसेच २) दुसरा स्तर- सत्तेसाठी स्पर्धा, द्वेष, निंदा, हिंसा, स्वार्थ, काम, क्रोध, लोभ, मोह, मद, मत्सर, अशांती, असूया, संघर्ष, दुसऱ्याचे चांगले न पाहवणे. माणसाने जर प्रेमाचा स्तर स्वीकारला तर जीवनात शांती आणि समाधान प्राप्त होईल. याउलट त्याने द्वेषाचा स्तर स्वीकारल्यास तो सतत अशांत आणि अस्वस्थ राहील. म्हणून समर्थ म्हणतात-

'मना पापसंकल्प सोडूनि द्यावा। मना सत्य संकल्प जीवी धरावा।
मना कल्पना ते नको वीषयांची। विकारे घडे हो जनी सर्व ची ची।।
नको रे मना क्रोध हा खेदकारी। नको रे मना काम नाना विकारी।
नको रे मदा सर्वदा अंगीकारु। नको रे मना मत्सरु दंभ भारु।।
मना सांग पा रावणा काय जाले। अकस्मात ते राज्य सर्वै बुडाले।
म्हणोनि कुडी वासना सांडी वेगी। बळे लागला काळ हा पाठीलागी।।
मना सर्वथा सत्य सांडू नको रे। मना सर्वथा मिथ्य मांडू नको रे।
मना सत्य ते सत्य वाचे वदावे। मना मिथ्य ते मिथ्य सोडूनि द्यावे।।

प्रेय याचा अर्थ तात्पुरते सुखाचे पण परिणामी दुःखाचे. श्रेय याचा अर्थ आचरण करताना कष्टदायक; पण परिणामी सुखाचे. भज्याच्या वासाने आकृष्ट

होऊन उंदीर पिंजऱ्यात पकडला जावा त्याप्रमाणे माणसे तात्पुरत्या सुखाच्या लोभाने विषयात अडकतात. निर्विषय होण्यासाठी समर्थ मनाला धारिष्ट्य धरायला सांगतात. अनेकदा पारमार्थिक जीवन स्वीकारल्यावर माणूस एकाकी पडतो. एका अर्थाने हे प्रवाहाविरुद्ध पोहणेच असते. अशा वेळी धारिष्ट्याची अत्यंत आवश्यकता असते. अशा माणसाला खडतर जीवन जगावे लागेल; पण मृत्यूनंतर त्याची कीर्ति होईल. म्हणून समर्थ म्हणतात-

'देहे त्यागिता कीर्ति मागे उरावी। मना सज्जना हेचि क्रीया धरावी।
मना चंदनाचे परि त्वा झिजावे। परि अंतरी सज्जना नीववावे।।'

हयातीतील कीर्ति सत्तेच्या अथवा संपत्तीच्या बळावर विकत घेतलेली असू शकते. ती काही खरी कीर्ति नव्हे.

## शाश्वत सुखाचा मार्ग-

मनाच्या श्लोकात समर्थांनी सुखदु:खाचा जो विचार सांगितला आहे त्यातील एक श्लोक अत्यंत लोकप्रिय ठरला-

'जगी सर्व सुखी असा कोण आहे। विचारी मना तूचि शोधूनि पाहे।
मना तो चि रे पूर्व संचीत केले। तया सारिखे भोगणे प्राप्त जाले।।

मानवी जीवनाचे स्वरूपच असे आहे की येथे निर्भेळ सुख शक्य नाही. कै. वि. स. खांडेकर म्हणत असत- 'जीवन म्हणजे सुखदु:खांच्या उभ्या आडव्या धाग्यांनी विणलेले वस्त्र आहे.' येथे पौर्णिमेबरोबर अमावस्या आहे. दिवसाबरोबर रात्र आहे. फुलांबरोबर काटे आहेत तेव्हा प्रत्येक सुख इथे दु:ख पर्यवसानीच ठरणार. माणसाला सर्व काळ अनुकूल ठरेल अशी एकही व्यक्ती नाही, विषय नाही, अवयव नाही. तरुणपणी जे दात उपयुक्त असतात ते म्हातारपणी साथ सोडून देतात. गुडघे दुखू लागतात. दृष्टी क्षीण होते. ज्या शरीरावर आयुष्यभर प्रेम केले तेच शरीर अखेर नकोसे वाटू लागते.

समर्थांनी आणखी एक महत्त्वाची गोष्ट सांगितली की आपल्या दु:खाला आपणच जबाबदार आहोत. या जगात कधीही कोणावर अन्याय होत नाही. आपली पूर्वीची कर्म जशी असतील त्यानुसार आपल्या वाट्याला सुख-दु:ख येते. या क्षणापासून जर आपण नीट वागायला लागलो तर भावी काळात आपण आपल्या जीवनाला हवा तसा आकार देऊ शकतो. समर्थांच्या मते अहंकार हे आपल्या दु:खाचे खरे कारण आहे. व्यावहारिक जीवनात साध्या साध्या गोष्टी माणसे प्रतिष्ठेचा प्रश्न बनवतात आणि त्यातून अनेक दु:खांना आमंत्रण देतात. माणसाने जर मनावर घेतले तर दु:खाच्या प्रसंगात देखील सुख वेचण्याची कला

त्याला आत्मसात करता येईल. त्यासाठी 'देहेदु:ख ते सुख मानीत जावे' असा सल्ला समर्थ देतात. माणसाने कष्टप्रद जीवनाची सवय केली पाहिजे. 'आधी कष्ट मग फळ' हेच जीवनाचे सूत्र आहे. माणसे दु:ख चघळत बसतात आणि त्यातून दु:खाचा गुणाकार करतात.

जीवनात माणसाला जी नानाविध दु:खे भोगावी लागतात त्यातील सर्वात मोठे दु:ख म्हणजे मृत्यूचे. वस्तुत: जन्म आणि मृत्यू या एकाच नाण्याच्या दोन बाजू आहेत. पण कुणी जन्मले तर माणसे त्याचा स्वानंदे स्वीकार करतात आणि मरण पावले तर प्रचंड शोक करतात. मृत्यू हे जीवनाचे वास्तव आहे याची जाणीव करून देताना समर्थ म्हणतात-

'मना पाहता सत्य हे मृत्यभूमी। जिता बोलती सर्व ही जीव मी मी।
चिरंजीव हे सर्व ही मानिताती। अकस्मात सांडूनिया सर्व जाती।।
मरे येक त्याचा दुजा शोक वाहे। अकस्मात तो ही पुढे जात आहे।
पुरेना जनी लोभ रे क्षोभ त्या ते। म्हणोनी जनी मागुता जन्म घेते।।'

समर्थांच्या मते माणसाला जर मरण टाळायचे असेल तर त्याने पुनर्जन्म टाळला पाहिजे आणि पुनर्जन्म टाळण्यासाठी मन निर्वासन झाले पाहिजे. माणसाला पुन्हा जन्म घेण्याची लाज वाटली पाहिजे. 'किती वेळा जन्मा यावे। किती व्हावे फजित।।' असे तुकाराम महाराज विचारतात. तर निर्वासन होण्यासाठी समर्थ गर्भावस्थेतील दु:खाबद्दल सांगतात-

'बहु हिंपुटी होईजे मायपोटी। नको रे मना यातना तेचि मोठी।
निरोधे पचे कोंडीले गर्भवासी। अधोमुख रे दु:ख त्या बाळकासी।।
मना वासना चुकवी येरझारा। मना कामना सांडी रे द्रव्यदारा।
मना यातना थोर हे गर्भवासी। मना सज्जना भेटवी राघवासी।।'

## भगवंत भक्ताचे रक्षण करतो

जीवनामध्ये अनेक अडचणी आणि संकटे येतात. अशा वेळी सर्वसामान्य माणूस नातलगांवर, पैशावर, परिचित मंडळींवर अवलंबून असतो. त्याला भगवंताचा भरवसा वाटत नाही तर माणसांचा आणि पैशाचा भरवसा वाटतो. संकटं संतावरसुद्धा येतात. पण भगवंत आपल्याला यातून बाहेर काढेल याची त्यांना खात्री असते. त्यामुळे संत संकटसमयी धीर सोडत नाहीत. समर्थांनी मनाच्या श्लोकातील श्लोक क्रमांक २८ ते ३७ मध्ये 'नुपेक्षी कदा राम दासाभिमानी' असे १० श्लोक लिहून रामचंद्रांनी आपल्या विविध भक्तांचे कसे रक्षण केले याच्या कथा दिल्या आहेत. पुढे श्लोक क्रमांक ११६ ते १२४ 'नुपेक्षी

कदा देव भक्ताभिमानी' असे १० श्लोक लिहून विविध अवतारांमध्ये भगवंताने आपल्या भक्ताला कसे वाचवले याच्या विविध कथा दिल्या आहेत.

माणूस स्वभावाने मूलत:च दुर्बल असतो. आपल्या सामर्थ्याच्या मर्यादा त्याला ठाऊक असतात. अशी अगतिकता त्याच्या जीवनात येते की या परिस्थितीतून भगवंतच आपल्याला वाचवू शकेल असे त्याला वाटू लागते. जेव्हा तो १०० टक्के भगवंतावरच अवलंबून असतो तेव्हा भगवंत धावून गेल्याशिवाय रहात नाही. वस्त्रहरणप्रसंगी द्रौपदीला प्रथम पांडवांचा भरवसा वाटला. तो आधार तुटल्यावर तिने धृतराष्ट्राकडे मदतीची याचना केली. तिथेदेखील निराशा पदरी पडल्यावर तिने भीष्म, द्रोणांचा आश्रय घेतला. त्या दोघांनी उपरणे झटकल्यावर द्रौपदीच्या लक्षात आले की आता भगवान श्रीकृष्णाखेरीज आपल्याला कोणीही वाचवू शकणार नाही. भक्त जेव्हा अशा अनन्यभावाने भगवंतावर विसंबतो तेव्हा भगवंत त्याला त्या प्रतिकुल परिस्थितीतून बाहेर काढतो. मनोबोधातील हे वीस श्लोक भक्तांना खूप दिलासा देणारे आहेत-

'दिनानाथ हा राम कोदंडधारी। पुढे देखता काळ पोटी थरारी।
जना वाक्य नेमस्त हे सत्य मानी। नुपेक्षी कदा राम दासाभिमानी।।
पदी राघवाचे सदा ब्रीद गाजे। बळे भक्तरिपूशिरी कांबी वाजे।
पुरी वाईली सर्व जेणे विमानी। नुपेक्षी कदा राम दासाभिमानी।।
अहिल्या शिळा राघवे मुक्त केली। पदी लागता दिव्य होऊनि गेली।
जया वर्णिता सीणली वेदवाणी। नुपेक्षी कदा राम दासाभिमानी।।
धुरू लेकरू बापुडे दैन्यवाणे। कृपा भाकिता दीधली भेटि जेणे।
चिरंजीव तारांगणी प्रेमखाणी। नुपेक्षी कदा देव भक्ताभिमानी।।
महा भक्त प्रल्हाद हा कष्टवीला। म्हणोनी तया कारणे सिंह्य जाला।
न ये ज्वाळ वीषाळ सन्नीध कोण्ही। नुपेक्षी कदा देव भक्ताभिमानी।।'

## मना सज्जना राघवी वस्ती कीजे।

मनाच्या श्लोकात काही पंचकं आहेत तर काही दशकं आहेत. मघाशी आपण 'नुपेक्षा कदा' या दोन दशकांचा विचार केला. याखेरीज 'जगी धन्य तो दास सर्वोत्तमाचा' किंवा 'प्रभाते मनी राम चिंतीत जावा' अशा १०-१० श्लोकांची दोन दशके आहेत. 'मना सज्जना राघवी वस्ती कीजे, मना सर्व जाणीव सांडोनि राहे, तुटे वाद संवाद तो हीतकारी, जुने ठेवणे मी पणे आकळेना' असे शेवटचे चरण असलेली ५-५ श्लोकांची विविध पंचके आहेत. जर मन निर्वासन करावयाचे असेल तर मनाला भगवद्चिंतनाचा पर्याय द्यावा लागेल. आज संसार हे

आपले भावविश्व आहे. ते सुटून भगवंत हे आपले भावविश्व झाले पाहिजे. त्यासाठी समर्थ मनाला रामचरणी वस्ती करण्याचा सल्ला देतात. भक्ताने शरीराने आपल्या वाट्याला आलेली विविध प्रापंचिक कर्तव्ये पार पाडावीत पण कर्म करीत असताना मन भगवंताच्या अनुसंधानात ठेवावे. सर्कशीच्या तंबूतील झोक्याचे खेळ चालू असताना त्या खेळाडूंचे लक्ष संगीताकडे असते. संगीताच्या ठेक्यात ते विविध कवायती करतात. त्याप्रमाणे भगवंत हा आपल्या जीवनाचा ठेका आणि हृदयाचा ठोका असावा. भगवंत हाच एकमेव सुखाचा स्त्रोत आहे अशी धारणा असावी. चारही वेद, सहाही शास्त्र, अठरा पुराणे ज्याचे वर्णन करतात त्या एकमेव भगवंताची कास भक्ताने धरली पाहिजे.

आपल्याकडे अध्यात्मात तेहतीस कोटी देव आहेत, नाना संप्रदाय आहेत, नुसत्या ध्यानाच्या शंभराहून अधिक प्रक्रिया आहेत. गुरुंचे नानाविध प्रकार आहेत. अशा वेळी सामान्य माणूस गोंधळात पडतो. अनेकदा परस्पर विरोधी साधना तो करीत राहतो. सगळे साधनमार्ग एकाच परमात्म्याकडे जाणारे असले तरी साधकाला एकच कोणतातरी मार्ग निवडावा लागतो. बसस्थानकावर पंढरपूरला जाणाऱ्या तीन-चार गाड्या असल्या तरी आपल्याला एकाच गाडीत बसावे लागेल. म्हणून समर्थ सूचना देतात-

'बहु हिंडता सौख्य होणार नाही। सीणावे परि नातुडे हीत काही।
विचारें मना अंतरा बोधवीजे। मना सज्जना राघवी वस्ती कीजे।।'

## आदर्श भक्ताची लक्षणे-

मनाच्या श्लोकातील ४७ ते ५६ हे १० श्लोक 'जगी धन्य तो दास सर्वोत्तमाचा' असे असून त्यामध्ये समर्थांनी आदर्श भक्ताची लक्षणे सांगितली आहेत. ही लक्षणे बहिरंग पोषाखाची अथवा केवळ बाह्यचिन्हांची नसून सद्‌गुण संवर्धनाची अथवा अंतरस्थितीची आहेत. येथे सांगितलेली भक्ताची लक्षणे भगवद्‌गीतेतील ज्ञानीभक्तांच्या लक्षणांशी मिळतीजुळती आहेत. सामान्य भक्ताला फक्त मंदिरातच भगवंत दिसतो; पण ज्ञानी भक्त सर्वत्र भगवंत पाहतो. मात्र सर्वत्र भगवंत आहे म्हणून तो मूर्तीपूजेची उपेक्षा करीत नाही. उदाहरणार्थ, पूज्यपाद शंकराचार्य अद्वैत सिद्धांताचे पुरस्कर्ते होते, पण त्यांनी विविध देवतांची उत्तम स्तोत्रे लिहिली. खरा भक्त आधी कर्मयोग, मग भक्तियोग आणि शेवटी ज्ञानयोग हा साधनेचा क्रम सांभाळतो.

अनेकदा देवाच्या नावाखाली काही मंडळी आपल्या विहीत कर्माची उपेक्षा करतात. समर्थांना हे मान्य नाही. खरा भक्त भगवंताने सोपविलेले काम

प्रामाणिकपणे पार पाडतो. तो देहाने आपले विहितकर्म करत असतो तर मनाने भगवंताचे नाम घेत असतो. त्याचे बोलणे आणि वागणे यात कुठेही विसंवाद नसतो. आपल्या धर्मात प्रत्येकाच्या आवडीनुसार विविध दैवते निर्माण केली आहेत. खरा भक्त आपल्या आराध्य देवतेवर निष्ठा ठेवून बाकी सर्व देवांचा योग्य तो मान राखतो. कारण आपले प्रेमास्पदच सर्व देवांच्या रूपाने नटलेले आहे अशी त्याची धारणा असते. असा भक्त भौतिक सुखांच्या बाबतीत उदासिन असतो. कारण त्याच्या सर्व इच्छा तृप्त झाल्यामुळे त्याचे मन एकदम शांत झालेले असते. मद, मत्सर, स्वार्थबुद्धी, प्रापंचिक उपाधी यांचा त्याच्या चित्ताला थोडा देखील स्पर्श होत नाही. तो सर्वकाळ अध्यात्मिक ग्रंथांच्या चिंतनात असतो. अशा ग्रंथात देखील अनेक परस्पर विरोधी विचार प्रवाह असतात, पण भक्त या वादात पडत नाही. तो आपल्या मूळ स्वरूपाच्या चिंतनात दंग असतो. भक्तांच्या लक्षणाचे शेवटचे ४ श्लोक तर फारच गोड आहेत. समर्थ म्हणतात-

'सदा आर्जवी प्रिय जो सर्व लोकी। सदा सर्वदा सत्यवादी विवेकी।
न बोले कदा मिथ्य वाचा त्रिवाचा। जगी धन्य तो दास सर्वोत्तमाचा।।
सदा सेवि आरण्य तारुण्यकाळी। मिळेना कदा कल्पनेचेन मेळी।
चळेना मनी निश्चयो दृढ ज्याचा। जगी धन्य तो दास सर्वोत्तमाचा।।
नसे मानसीं नष्ट आशा दुराशा। वसे अंतरी प्रेमपाशा पिपाशा।।
ऋणी देव हा भक्तिभावे जयाचा। जगी धन्य तो दास सर्वोत्तमाचा।।
दिनाचा दयाळु मनाचा मवाळु। स्नेहाळु कृपाळु जनी दासपाळु।
तया अंतरी क्रोध संताप कैचा। जगी धन्य तो दास सर्वोत्तमाचा।।'

भक्ता-भक्तांमध्ये संघर्ष असणे, स्पर्धा असणे, मतभेद असणे हे ज्ञान न पचल्याचे किंवा भगवंत न समजल्याचे लक्षण आहे. म्हणून समर्थांनी भक्ताच्या गुणात्मक विकासावर भर दिला.

## आस्तिक वाचाळ; नास्तिक वाचाळ-

अलिकडे प्रपंच असो अथवा परमार्थ, भौतिक जीवन असो वा आध्यात्मिक, दोन्हीकडे व्यर्थ चर्चा, फाजील बडबड, वाद-विवाद, एकमेकाची निंदा, अन्य सांप्रदायातील उखाळ्या पाखाळ्या या गोष्टींना अगदी ऊत येत असतो. धुंडा महाराज देगलुरकर आध्यात्मिक क्षेत्रातील बडबड करणाऱ्यांना आस्तिक वाचाळ म्हणतात तर भौतिक क्षेत्रातील बडबड करणाऱ्यांना नास्तिक वाचाळ म्हणतात. एकदा आध्यात्मिक जीवन स्वीकारल्यावर वादंग वाढविणाऱ्यांचे समर्थांनी किती अचूक वर्णन केले आहे ते पाहा-

'उभा कल्पवृक्षातळी दुःख वाहे। तया अंतरी सर्वदा तेचि आहे।
जनी सज्जनी वाद हा वाढवावा। पुढे मागुता शोक जीवी धरावा।।
घरी कामधेनू पुढे ताक मागे। हरिबोध सांडूनी वेवाद लागे।
करी सार चिंतामणी काचखंडे। तया मागता देत आहे उदंडे।।'

अनेकदा काही कडवे सांप्रदायिक अथवा लबाड गुरू संप्रदाय-संप्रदायामध्ये तेढ निर्माण करतात. अशा भोंदू गुरूंचा समर्थांनी कडक शब्दात परामर्श घेतला आहे. खऱ्या साधकाने सर्व वाद-विवादापासून दूर रहावे आणि सुख संवादाची कास धरावी असे आवर्जून समर्थ सांगतात. शेवटी वादातून कधीही चांगले निष्पन्न होत नाही. अर्ध्या हळकुंडाने पिवळी झालेली अहंकारी माणसे समाजात वाद वाढवून बुद्धीभेद निर्माण करतात. वस्तुतः ज्ञानानंतर लीनता यावी. आपण सामान्य असून खरे ज्ञान परमात्म्याचे आहे अशी धारणा व्हायला हवी. म्हणून समर्थ एक उपाय सांगतात.

## मौनम् सर्वार्थ साधनम्....

काही माणसे जशी वादपटू असतात तसे काही रजोगुणी माणसे गप्पाष्टक प्रिय असतात. राजकारण, क्रिकेट, चित्रपट, दूरदर्शनच्या मालिका, जुन्या आठवणी, वृत्तपत्रातील विविध बातम्यांवर भाष्य, जीवनाशी संबंधित नसलेली अनावश्यक माहिती या सगळ्यात वेळेचे भान न ठेवता तासन्तास बोलून वेळ घालवणे याची त्यांना आवड असते. निदान साधकाने अशा प्रवाहापासून सावध राहावे. कुणाच्या संगतीत आपले मानसिक संतुलन ढळते आणि कुणाच्या सहवासात आपली वृत्ती शांत आणि स्थिर असते ते अनुभवाने आणि आत्मपरिक्षणाने आपण जाणू शकतो. म्हणून समर्थ म्हणतात-

'जयाचेनि संगे समाधान भंगे। अहंता अकस्मात येऊनि लागे।
तये संगतीची जनीं कोण गोडी। जये संगतीने मती राम सोडी।।
न बोले मना राघवेविण काही। जनी वाऊगे बोलता सूख नाही।
घडीने घडी काळ आयुष्य नेतो। देहांती तुला कोण सोडू पहातो।।'

आपण जेव्हा सतत बोलत राहतो तेव्हा मनामध्ये ते विषय सतत घोळत राहतात. निर्विचार झाल्याखेरीज वृत्ती शांत होणार नाही. आणि मौन धारण केल्याखेरीज निर्विचारता प्राप्त होणार नाही. मन आधी विषयाचे चिंतन करते, त्यामुळे इंद्रिये चाळवतात. परिणामतः इंद्रिये विषयांची मागणी करतात. इंद्रियांची मागणी वाढली की मन व्याकुळ होते. इंद्रिये मनावरती दबावतंत्राचा वापर करून आपल्या मागण्या पूर्ण करतात. या साऱ्याचा प्रारंभ वैचारिक स्तरावरती होतो.

आपण जर आपल्या विचारांचा संच बदलला, दुर्विचारांची जागा सद्विचारांनी घेतली तर वृत्ती शांत व्हायला मदत होईल. एकदा सद्विचार स्थिरावले म्हणजे हळूहळू निर्विचार होण्याचा अभ्यास करता येईल. अशा वेळी इंद्रियांचे दमन करावेच लागणार नाही. वृत्तीच्या स्तरावरती किंवा वैचारिक स्तरावरती वासनांचे नियमन केले जाईल. त्या दृष्टीने मनाचे श्लोक हा मन आवरण्याचा अत्यंत शास्त्रशुद्ध मार्ग आहे. समर्थ म्हणतात-

'मना अल्पसंकल्प तो ही नसावा। मना सत्यसंकल्प चित्ती वसावा।
जनी जल्प विकल्प तो ही तजावा। रमाकांत येकांत काळी भजावा।।'

त्यासाठी सत्यसंकल्प जीवी धरणे आणि पापसंकल्प सोडून देणे हा शास्त्रशुद्ध मार्ग आहे.

**सत्संगात अद्वैत बोधाची प्राप्ती-**

मनातील वाईट विचार नाहीसे व्हावेत आणि मनात चांगले विचार येत राहावेत यासाठी चांगल्या माणसाच्या सहवासात राहणे खूप फलदायी ठरते. यालाच अध्यात्मात सत्संग असे म्हणतात. व्यावहारिक जीवनातसुद्धा विद्यार्थी दशेत आपल्या मुलाला चांगली संगत असावी याची काळजी प्रत्येकजण घेतो. चांगल्या माणसाच्या सहवासात राहून आपण फार काळ वाईट वागू शकणार नाही. हळुहळु आपल्या वृत्तीत पालट होत जाईल. वासना क्षीण होणे, दृश्य जगताबद्दलचे नश्वरत्व मनावर बिंबणे, सतत आनंदात राहणे, विनम्र भाव प्रबळ होणे, देहबुद्धी कमी होणे, जीवनात साधेपणा येणे या सर्व गोष्टी सत्संगात घडू शकतात. केवळ शास्त्राचा अभ्यास केल्याने अथवा तत्त्वज्ञानाची कोष्टके पाठ केल्याने माणसाची वृत्ती बदलणार नाही. वैचारिक परिवर्तनासाठी ज्याच्या जीवनामध्ये ते तत्त्वज्ञान उतरले आहे अशा जिवंत उदाहरणाची नितांत गरज असते. संत आपल्या आचरणाद्वारे अशा पवित्र जीवनाचा मानदंड प्रस्थापित करतात. साधकाच्या मनावर त्याचा खोलवर परिणाम होतो. हळुहळु तो दुर्बुद्धी आणि असन्मार्ग सोडून सन्मार्गी होतो. समर्थ म्हणतात-

'धरी रे मना संगती सज्जनाची। जेणे वृत्ति हे पालटे दुर्जनाची।
बळे भाव सद्बुद्धी सन्मार्ग लागे। महाक्रूर तो काळ विक्राळ भंगे।।'

**मनोबोधातील नामसाधना**

मनाच्या श्लोकात अद्वैत बोधासाठी समर्थ नामसाधना सांगतात. समर्थांच्या दृष्टीने नाम आणि ध्यान यात विशेष फरक नाही. हे दोनही साधन प्रकार परस्पर

पूरक आहेत. म्हणून ६६ व्या श्लोकात 'करी रे मना ध्यान या राघवाचे' अशी सूचना दिल्यानंतर समर्थांनी ध्यानाचे जे १० श्लोक लिहिले आहेत त्यामध्ये नामाचा देखील अंतर्भाव आहे आणि ध्यानाचे श्लोक झाल्यानंतर सलग ३०-३५ श्लोक नामसाधनेचे आहेत. सामान्य माणसाला एकदम निर्विचार होणे शक्य नसते. अशा वेळी त्याच्या भटकणाऱ्या आणि भरकटणाऱ्या मनाला स्थिर होण्यासाठी कशाचे तरी आलंबन आवश्यक आहे. महाराष्ट्रातील सर्वच संतांनी सर्वसामान्य माणूस डोळ्यासमोर ठेवून नामस्मरणाचे आलंबन सांगितले. वाल्या कोळीसारखा दरोडेखोर असो, अजामेळासारखा पापी मनुष्य असो अथवा पिंगलासारखी वारांगना असो; नामाच्या सहाय्याने सारेजण निर्दोष होऊ शकतात. याचा अर्थ पापी माणसाला पुण्यवान करण्यासाठी नाम घ्यावे असा नाही. ध्रुव आणि प्रल्हादासारख्या थोर भक्तांचे उदाहरण देखील समर्थ देतात. भगवान शंकरासारखी थोर विभूती सतत रामचंद्रांच्या नामात मग्न असते, याचा समर्थांना एवढा अभिमान वाटतो की मनाच्या श्लोकात शंकराचे दाखले वारंवार दिले गेले आहेत. हनुमंतासारखा 'बुद्धीमतां वरिष्ठम्' असलेला देवही सतत रामचिंतनात मग्न असतो. भगवंताच्या चिंतनात भोजन केल्यास वृत्ती भगवंतमय होण्यास मदत होईल. समर्थ म्हणतात-

'बहु चांगले नाम या राघवाचे। अती साजिरे स्वल्प सोपे फुकाचे।
करी मूळ निर्मूळ घेता भवाचे। जिवा मानवा हे चि कैवल्य साचे।।
जनी भोजनी नाम वाचे वदावे। अती आदरे गद्य घोषे म्हणावे।
हरिचिंतने अन्न जेवीत जावे। तरी श्रीहरी पाविजेतो स्वभावे।।
जगी पाहता देव हा अन्नदाता। तया लागली तत्वता सार चिंता।
तयाचे मुखी नाम घेता फुकाचे। मना सांग पां रे तुझे काय वेचे।।
मुखी नाम नाही तया मुक्ति कैची। अहंतागुणे यातना ते फुकाची।
पुढे अंत येईल तो दैन्यवाणा। म्हणोनि म्हणा रे म्हणा देवराणा।।'

नाम हे अत्यंत सूक्ष्म असल्यामुळे ते सगुण आणि निर्गुण यांचा सेतू बनू शकते. समर्थ मनोबोधात नामाद्वारे सगुण-निर्गुण समन्वय साधतात. 'नभासारिखे रूप या राघवाचे' किंवा 'रिता ठाव या राघवेविण नाही' या दोन्ही श्लोकात सगुणरूप असलेला राम सर्वव्यापी सांगून त्याचे निर्गुणत्व समर्थ दाखवितात. नामाने उन्मनी अवस्था प्राप्त होऊन पुन्हा देहबोधावर येताच सर्वत्र 'प्रभू राम भरलेले' असल्याची प्रचिती येते.



# आत्माराम

'आत्माराम' हा समर्थांचा एक महत्त्वाचा ग्रंथ आहे. श्रीमद् दासबोध, मनाचे श्लोक आणि आत्माराम हे तीन ग्रंथ समर्थ संप्रदायाची प्रस्थानत्रयी मानली जाते. आत्माराम हा ग्रंथ उद्धवस्वामींच्या मठात मिळाला त्यावरून नासिकच्या साधनकाळात समर्थांनी तो लिहिला असावा असे सांगतात. आत्मारामात पाच समास असल्याने त्याला 'पंचसमासी'देखील म्हणतात. १) त्याग निरुपण २) माया निरुपण ३) ब्रह्म निरुपण ४) साधन निरुपण ५) स्वानुभव कथन निरुपण असे ते पाच समास आहेत.

### त्याग निरुपण

आत्माराम हा ग्रंथ गुरुशिष्य संवादात्मक असला तरी याचा प्रारंभ श्रीमद् दासबोधाप्रमाणे शिष्याच्या प्रश्नाने होत नाही. अजूनही आपल्या शिष्याचा अहंकार नाहीसा झाला नाही याची समर्थांना काळजी वाटू लागली म्हणून शिष्याला स्वतःहून उपदेशास ते प्रारंभ करतात-

'तुवा आशंका नाही घेतली। परंतु मज तुझी चिंता लागली।
का जे तुझी भ्रांती फिटली। नाहीच अद्यापी।।
दासबोधीचे समासी। निर्मूळ केले मी पणासी।
तया निरुपणे ही वृत्तीसी। पालट दिसेना।।'

येथे दासबोधीचे समासी म्हटले आहे तो जुना दासबोध किंवा एकवीस समासी होय. या ग्रंथात 'मीपण निरसन' नावाचा समास आहे. ते सांगूनही 'मी पणा' गेला नाही हे पाहून समर्थ उत्स्फूर्तपणे शिष्याला मातेच्या ममतेने उपदेश करू लागतात. याचा अर्थ एकवीस समासी किंवा जुना दासबोध आत्मारामापूर्वी म्हणजे नासिक येथील साधन काळातच लिहिला असावा. भारतभ्रमणापूर्वीच्या समर्थ वाङ्मयात मुख्य भर वैयक्तिक उपासना आणि मोक्ष यावर दिसतो. भारत

प्रवासानंतर समर्थांचा दृष्टिकोन खूपच परिवर्तीत झालेला दिसतो. कारण त्यानंतर लिहिलेल्या स्तोत्रात अथवा ग्रंथात समाजजीवन, राष्ट्रचिंतन, संघटन, दुष्टनिर्दालन या सर्वांचा अंतर्भाव दिसून येतो.

आत्मारामाची सुरुवात त्याग निरुपणाने आहे. माणूस स्वत:चे मूळ स्वरूप समजावून न घेता अकारण मायेमध्ये अडकतो आणि दु:खी होतो. त्यातून बाहेर पडण्यासाठी त्याला भौतिक जीवनाचा मनापासून त्याग करावा लागेल. दृश्य जगताचे मिथ्यत्व लक्षात घ्यावे लागेल. समर्थांच्या मते त्यागाने माणूस काही गमावून बसत नाही तर त्याला मोठे घबाड प्राप्त होते. नदी सागराला मिळताना स्वत:च्या नामरूपाचा त्याग करते. पण त्यामुळे ती व्यापक होते. विराटाची प्राप्ती व्हावी असे वाटत असेल तर क्षुद्राचा त्याग करावा लागेल. येथे समर्थ शिष्याला त्याग केल्यास मूळ स्वरूपाची प्राप्ती करून देईन असे आश्वासन देतात.

**माया ब्रह्म निरुपण-**

समर्थांचे हे खास वैशिष्ट्य आहे की ते वेदांती असूनही मायेचे पुरस्कर्ते आहेत. साधकाच्या जीवनात मायेचे स्थान फार महत्त्वाचे आहे. मायेची दोन रूपे आहेत. माया म्हणजे मन. मन जसे बंधन आणि मोक्ष या दोन्हींना कारण ठरू शकते, तद्वत पंचविषयांचे चिंतन ही माया बंधनास कारण ठरते; तर आत्मस्वरूपाचे किंवा भगवद्स्वरूपाचे चिंतन ही माया साधकाला मोक्षाच्या दिशेने नेऊ शकते. साधकाला साक्षात्कार घडविणाऱ्या मायेचे स्तवन करताना समर्थ म्हणतात-

'माया भवसिंधूचे तारू। माया पाववी पैलपारू।
मायेवीण उद्धारू। प्राणीयास नाही।।
मायेकरीता देव आणि भक्त। मायेकरिता ज्ञाते विरक्त।
मायेकरिता जीवनमुक्त। होती स्वानुभवे।।
माया परमार्थाचे अंजन। मायेकरिता जोडे निधान।
मायेकरिता सावधान। साधक स्वरूपी।।
मायेकरिता स्वहित घडे।। मायेकरिता भ्रांती उडे।
मायेकरिता विघडे। प्रपंच भान।।'

समर्थ त्याग करायला सांगतात ते बंधनात टाकणाऱ्या मायेचा म्हणजे विषयांचा त्याग करायला सांगतात.

ब्रह्माचे वर्णन करताना समर्थ एक गोष्ट सांगतात की ब्रह्माचे वर्णन शब्दात करणे शक्य नाही. सर्वच संतांनी ब्रह्म अनुर्वाच्य आहे, नि:शब्द आहे, मनातीत

आहे हे सांगितले. पण तरीही सर्वांनी विविध प्रकारे ब्रह्माचे वर्णन करण्याचा प्रयत्न केला. याचे रहस्य सांगताना आत्मारामात समर्थ सांगतात की, अशा प्रकारे जेव्हा सतत शब्दाने ब्रह्माचे वर्णन करण्याचा प्रयत्न केला जातो तेव्हा साधक मनाने ब्रह्मचिंतन करू शकतो. हळुंहळु बुद्धीने त्याला ब्रह्माची धारणा करता येते. मग शब्दाचे काम संपते. साधकाला प्रत्यक्ष ब्रह्म अनुभवाच्या कवेत घेता येते व मग तो नि:शब्द होतो. पण त्यापूर्वी ब्रह्मचिंतनासाठी शब्दांचा आधार घेत समर्थ ब्रह्माचे वर्णन करतात. ब्रह्मालाच आत्माराम किंवा स्वरूप शब्द वापरून समर्थ म्हणतात-

'स्वरुप निर्मळ आणि निघोट। स्वरुप सेवटाचा सेवट।
जिकडे पहावे तिकडे नीट। सन्मुखचि आहे।।
जे सकळाहूनि मृदू कोवळे। जे सकळाहुनही अत्यंत जवळे।
जे सकळामध्ये परी निराळे। अलिप्तपणे।।
जे हाले ना चाले। जे बोले ना डोले।
आवघे आपणचि संचले। येकले येकटचि ते।।'

चवथ्या समासात समर्थ स्वरूप साक्षात्काराची साधना सांगतात.

**साधन निरुपण-**

ब्रह्मप्राप्तीसाठीचा मार्ग चवथ्या समासात समर्थ सांगतात. त्यालाच ते साधन निरुपण म्हणतात. अन्य सर्व संतांप्रमाणे समर्थ श्रवण साधनेवर भर देतात. ईश्वराच्या स्वरूपाचे वर्णन ज्ञानी, अनुभवी माणसाच्या मुखातून सतत ऐकत रहावे. मात्र श्रवण फक्त ज्ञानी पुरुषाच्या म्हणजे ऋषीमुखातून किंवा गुरुमुखातून करावे. व्यावसायिक कीर्तनकार आणि प्रवचनकार यांच्या मुखातून श्रवण केल्याने ब्रह्मप्राप्ती नाही होणार. श्रवणाला मनन, चिंतन आणि आचरण यांची जोड असावी. हे सांगताना समर्थ म्हणतात-

'जैसे ग्रंथी बोलीले। तैसेचि स्वयें पाहिजे जाले।
येथे क्रीयेच्या माथा आले। निश्चितार्थे।।
जे ग्रंथी जो विचार। वृत्ती होये तदाकार।
म्हणोनी निरुपण सार। भक्ति ज्ञान वैराग्य।।'

नुसते गुरुमुख श्रवण करून भागत नाही. मनन, चिंतन करून ब्रह्माचे स्वरूप समजावून घ्यावे आणि त्याच्याशी एकरूप होण्याचा प्रयत्न करावा. हे सारे दास्यभक्तीने साधते. ज्या संतांच्या वा सद्‌गुरुंच्या मुखातून आपण ज्ञान संपादन करू त्यांचे चरणी बसून सेवा करावी लागेल. भगवंताने देखील भगवद्‌गीतेमध्ये परिप्रश्न आणि प्रणिपात यानंतर 'सेवया' हे पथ्य सांगितलं.

नुसत्या शब्दज्ञानाने साधन शून्यवादात अडकू शकतो. दृश्य जगताचे मिथ्यत्व कळले पण ब्रह्माची अनुभूती आली नाही या मधल्या काळात साधक शून्यवादात अडकू शकतो. त्यासाठी भक्ती हवी. दास्यभक्तीने सद्गुरुची कृपा होऊन साधकाला प्रत्यक्ष ब्रह्माची अनुभूती येते. अद्वैतबोधात ब्रह्माशी एकरुपता साधली जाते म्हणून सर्व संतांनी भक्तीमार्गाचा स्वीकार आणि प्रसार केला.

आत्मारामाचा शेवटचा समास म्हणजे तृप्तीचा ढेकर आहे. साधक आपली कृतार्थता अनुभव कथनाद्वारे व्यक्त करतो. त्यांचा संसारपाश तुटून त्याला स्वत:च्या मूळ स्वरूपाचा साक्षात्कार होतो. परेहून पर्ता करून अकर्ता या शब्दांचा नेमका अर्थ त्याच्या प्रत्ययाला येतो. शिष्य सद्गुरू स्वरूप होतो. अनेक जन्मांच्या भटकंतीनंतर जीव आपल्या परब्रह्म स्वरूपाशी ऐक्य पावतो. आता गुरू आणि शिष्य हे द्वैत शिल्लक राहिले नाही. आत्मारामातील शेवटच्या ओवीत समर्थ महत्त्वाची सूचना देतात-

'ग्रंथ संपता स्तुति उत्तरे। बोलताती अपारे।
परी अर्थासी कारण येरे। येरा चाड नाही।।'

समर्थांना भोवती स्तुतिपाठक नको होते. म्हणून ते म्हणतात की साधना करा, मुक्त व्हा व इतरांना मुक्त करण्यास सहाय्यभूत व्हा. नुसती माझी अन् माझ्या ग्रंथाची स्तुती करू नका.



# तुळजाभवानीची स्तोत्रे

स्तोत्र ही संकल्पना अत्यंत प्राचीन असून वेदकालापासून उपासना कांडात स्तोत्रांचा अंतर्भाव केल्याचे आढळते. 'स्तूयते अनेन इति स्तोत्र:' अशी स्तोत्र या शब्दाची व्याख्या केली जाते. नारदांनी भक्तिसूत्रात रूपासक्ती आणि गुणासक्ती सांगितली आहे. आपल्या प्रेमास्पदाच्या रूपाची आणि गुणाची स्तुती करणे हा मानवी स्वभाव आहे. सद्‌गुरू आणि स्तोत्र या दोन्ही संकल्पनांचा जन्म यातूनच झाला. स्तोत्रामध्ये आपल्या दैवताचे संक्षिप्त चरित्र किंवा त्याच्या पराक्रमाचे, सद्‌गुणाचे वर्णन किंवा आपल्या दैवताच्या जीवनातील एखादा महत्त्वाचा प्रसंग याचे वर्णन असते. त्यात स्तोत्राचा रचयिता एखादी तप:पूत विभूती असेल तर संकटविमोचनाची शक्ती त्या स्तोत्रात उतरते. अनेक साधकांना त्याचे दिव्य अनुभव येतात. रामरक्षा आणि भीमरूपी स्तोत्र हे त्याचे बोलके उदाहरण आहे. अनेकांना या स्तोत्रांनी मोठा आधार, मोठा दिलासा दिला आहे. अनन्य शरणागतीने, मनापासून भावपूर्णतेने, आर्त होऊन जर भगवंताची करुणा भाकली तर 'ये यथा मां प्रपद्यन्ते तां तथैव भजाम्यहम्' या गीतेतील वचनाचा साधकाला अनुभव येतो. स्तोत्र प्रकाराने वाणी शुद्ध आणि पवित्र होते. नित्योपासनेत स्तोत्रपठणाचा अंतर्भाव असणे हा प्रकार अत्यंत लोकप्रिय ठरला आहे. समर्थांनी अशी अनेक स्तोत्र रचली आहेत.

समर्थांची कुलदेवता तुळजाभवानी होती. देवीचे महात्म्य गाणारी सुमारे ३० स्तोत्र त्यांनी लिहिली आहेत. समर्थांची प्रबोधनाची भूमिका त्यांच्या स्तोत्रामधूनही वारंवार डोकावते. केवळ मोक्षप्राप्ती किंवा ईशस्तुती हे त्यांच्या स्तोत्राचे प्रयोजन दिसत नाही. बालपणापासून त्यांना विश्वाची चिंता लागली होती त्यामुळे राष्ट्रचिंता आणि सामाजिक प्रेरणा हा त्यांचा स्तोत्रविशेष प्रकर्षाने जाणवतो. एका स्तोत्रात त्यांनी देवीला केलेली ही विनवणी पाहा-

'दुष्ट संव्हारिले मागे। ऐसे उदंड ऐकतो।।

परंतु रोकडे काही। मूळ सामर्थ्य दाखवी।।
तुझा तू वाढवी राजा। सीघ्र आम्हाचि देखता।
मागणे येकचि आता। द्यावे ते मज कारणे।।
रामदास म्हणे माझे। सर्व आतुर बोलणे।
क्षमावे तुळजामाते। इच्छा पूर्णचि तू करी।।'

समर्थांना केवळ दैवतांच्या भूतकाळातील पराक्रमात वा कथानकात रस नाही. भगवंत भक्ताचे रक्षण करतो. याची त्यांना रोकडी प्रचिती हवी आहे. त्यांची तुळजाभवानी केवळ 'रामवरदायिनी' नाही तर ती शिवरायांना भवानी तलवारीचे वरदान देणारी व समर्थांच्या मनीचे सर्व कोड पुरविणारी आदिशक्ती आहे. ही तुळजाभवानी एकदा 'पारघाटी जगन्माता। सद्य येऊनि राहिली।' असे समर्थ म्हणतात तर दुसरीकडे 'तुळजापुरीची माता । प्रतापगिरी प्रगटली' असेही म्हणतात. समर्थांनी प्रतापगडाच्या पायथ्याला पारगाव येथे तुळजाभवानीमातेचे मंदीर स्थापन केले आहे तर शिवछत्रपतींनी खुद्द प्रतापगडावर तुळजाभवानीची स्थापना केली आहे. दोघांची कुलदेवता तुळजाभवानीच आहे. अफझलखानाने तुळजापुरची भवानी माता आपल्या खड्गाने फोडली ही गोष्ट दोघांच्या मनाला लागली असणार व म्हणून दोघांनी आई जगदंबेची स्थापना प्रतापगडी केली. अफझलखान नेमका प्रतापगडाच्या पायथ्याला मारला गेला ही त्या देवीचीच कृपा याची प्रचिती समर्थांना आली म्हणून स्तोत्रात त्यांनी तुळजापुरची देवी सध्या पारघाटी किंवा प्रतापगडी येऊन आपले कार्य करीत असल्याचे म्हटले आहे.

आणखी एका स्तोत्रात समर्थांनी या देवीचे किती सुंदर वर्णन केले आहे ते पाहा-

'प्रसन्नमुख सुंदरा। तुझेन हे वसुंधरा।
धराधरे फणीवरे। तुलाचि भाविते खरे।।
तुझेनि सर्व बोलणे। तुझेनि सर्व चालणे।
तुझेनि योग धारणे। तुझेनि राजकारणे।।
तुझीच चालते सत्ता। बुझेल तोची पुरता।
तुझी करुनी आस तो। फिरे उदास दास तो।।'

समर्थ स्वत:ला निमित्तमात्र समजतात. जीवनात त्यांचे हातून जे काही अद्भुत कार्य घडते आहे त्याचे सारे श्रेय ते तुळजाभवानीला देतात. उत्पत्ति, स्थिती आणि लय ही भगवंताची तीन रूपे आहेत. ब्रह्मा, विष्णू आणि महेश यांच्याद्वारे हे कार्य घडते. देवी सरस्वती ही ब्रम्हदेवाची शक्ती आहे तर लक्ष्मी ही भगवान विष्णूची शक्ती आहे. संव्हार करणारी महाकाली किंवा दुर्गा ही भगवान

शंकराची शक्ती आहे. हे तिन्ही देव या देवींच्या रूपाद्वारे उत्पत्ती, स्थिती, लयाचे कार्य करतात असे समर्थ एका स्तोत्रात म्हणतात.

### शक्तीची उपासना

देवीची स्तुती करताना समर्थांमधील प्रबोधनकार पुन्हा जागा होतो व आपला दुर्बल हिंदू समाज बलशाली व्हावा म्हणून ते स्तोत्रात म्हणतात-

'शक्तीने पावती सुखे। शक्ती नसता विटंबना।
शक्तीने नेटका प्राणी। वैभवे भोगिता दिसे।।
कोण पुसे अशक्ताला। रोगीसे बराडी दिसे।
कळा नाही कांती नाही। युक्ती बुद्धी दुरावली।।
सार संसार शक्तीने। शक्तीने शक्ती भोगीजे।
शक्त तो सर्वही भोगी। शक्तीवीण दरिद्रता।।
शक्तीने मिळती राज्ये। युक्तीने यत्न होतसे।
शक्ती युक्ती जये ठायी। तेथे श्रीमंत धावती।।
धकाधकीचा मामला। कैसा कळे अशक्ताला।
नाना बुद्धी शक्ताला। म्हणोनि सिकवाव्या।।'

समाजामध्ये चैतन्य निर्माण व्हावे, लोकांना अभय वाटावे म्हणून समर्थांनी ही रामवरदायिनी माता शोधून काढली. समर्थांना तुळजाभवानीचा फार मोठा आधार वाटतो. ती त्यांची मनोकामना पूर्ण करणारी माऊली आहे तर समर्थ तुळजाभवानीचे लेकरू आहे. तिच्याच प्रेरणेने त्यांनी समाज संघटीत करण्यासाठी रामनवमीचा आणि हनुमान जयंतीचा उत्सव सुरू केला. समर्थ लिहितात-

'अंतरी कल्पना केली। येकांती बोलीलो बहु।
रक्षिता देव देवांचा। त्याचा उच्छाव इछिला।।
इछा पूर्ण करी माता। वाढवी बहुतांपरी।
दयाळु मायाळु माता। स्वभावे जाणती कळा।।
जीवाचा पुरला हेतु। कामना मन कामना।
घमंड जाहले मोठे। घबाड साधले बळे।।
मुलाची लाज मातेला। सीकवी सरसे करी।
लोभे लोभेच शृंघारी। आपुली भूषणे तया।।
जीव त्या बालकापासी। अखंड लाविला असे।
स्वहीत कळेना त्याला। सीकवीते बहु बहु।।
मातेसी काय चोरावे। सर्वही ठाऊके असे।

उत्तीर्ण व्हावया नाही। ते ची ते सचराचरी।।'

सारे संत कार्य करताना स्वतःला कमीपणा घेतात व भगवंताच्या कृपेनेच मी सारे केले हा विनम्रभाव स्वीकारतात. त्यामुळे कुठेही कार्याचा अहंकार निर्माण होत नाही. सामान्य माणूस श्रेय घेण्याच्या नादात अहंकारी बनतो व त्यामुळे शेवटी कार्याचा नाश होतो. म्हणून समर्थ आपल्या पुरुषार्थाचा पूर्ण वापर करतात. पण यश मिळाल्यावर त्याचे सर्व श्रेय कधी रामाला तर कधी रामवरदायिनी मातेला देतात.

## आनंदवनभुवनी

संपूर्ण विश्वाला व्यापून राहणारी एक सुप्तशक्ती म्हणून किंवा आदिशक्ती, आदिमाया म्हणून समर्थ तुळजाभवानीची आराधना करतात. ती विश्वजननी आहे. ती स्त्री आहे; पण अबला नाही. मूळात शक्ती हा शब्दच स्त्रीलिंगी आहे. तिनेच शिवछत्रपतींना तलवार देऊन त्यांचा कैपक्ष घेतला. ही तलवार म्लेच्छसंव्हारासाठी दिली होती. ती वीणापुस्तकधारिणी म्हणजे देवी सरस्वती देखील आहे. समर्थांच्या काव्यस्फुर्तीमागे तिचीच प्रेरणा आहे. तिच्या कृपेने रंक राजा होतो तर राजा रंक होऊन जातो. तीच आरोग्य देते आणि रोगाची निर्मिती तीच करते. जिव्हा कापणे, तोंडाला कुलूप लावणे, शीरकमल अर्पण करणे ही अघोरी उपासना तीच भक्ताकडून करवून घेते. समर्थांनी देवीचे विश्वव्यापिनी म्हणून केलेले वर्णन वाचताना ज्ञानदेवांच्या चिद्विलासवादाचे स्मरण होते. समर्थ म्हणतात-

'जगदांतरी तू मदांतरी तू। जगत्रयी तू तू तू नि मी तू।
येह लोक तू तू परलोक तू तु। अगणित तू तू सायोज्यता तू।।
उदंड ऐकिले होते। रामासी वरू दिधला।
मी दास रघुनाथाचा। मजही वरदायिनी।।'

समर्थांनी देवीला विनविले होते- 'तुझा तू वाढवी राजा। सीघ्र आम्हाचि देखता।' समर्थांना देवीने शिवराज्याभिषेकाचा सुवर्णक्षण दाखवला. त्यावेळी समर्थांनी लिहिलेले 'आनंदवनभुवनी' हे काव्य देवीचे त्यांनी रचलेले शेवटचे स्तोत्र होय. 'शिवराज्याभिषेक' हा समर्थांच्या जीवनातला सर्वांत आनंदाचा क्षण होता. वनभुवनी हे काशीचे पौराणिक नाव आहे. १६३४ साली समर्थांना काशी येथे स्वप्न पडले होते. त्या स्वप्नात महाराष्ट्रात हिंदूचे सिंहासन निर्माण झाले असून त्यावर राजाशिवछत्रपती प्रतिष्ठीत झालेले त्यांनी पाहिले होते. म्हणून ते म्हणतात-

'स्वप्नी जे देखिले रात्री। ते ते तैसेंचि होतसे।
हिंडता फिरता गेलो। आनंदवनभुवनी।।'

वनभुवनातील स्वप्न खरे झाल्याचा आनंद म्हणजे आनंदवनभुवनी. हे गीत म्हणजे शिवराज्याभिषेकाचा मंत्र, स्वराज्याचे तंत्र होय. हजारो वर्षांच्या अमावस्येनंतर महाराष्ट्रात शिवराज्याभिषेकाच्या रूपाने स्वातंत्र्याची पौर्णिमा उदित झाली होती. यवनांच्या जुलमी राजवटीवर महाराजांनी मात करून मराठ्यांची सत्ता प्रस्थापित केली होती. या प्रक्रियेलाच समर्थ महाराष्ट्रधर्म म्हणतात.

शिवपराक्रमाचा इतिहास सांगताना समर्थ म्हणतात-

'स्वधर्माआड जे विघ्ने। ते ते सर्वत्र उठीली।
लाटिली कुटीली देवे। दापिली कापिली बहु।।
विघ्नांच्या उठील्या फौजा। भीम त्यावरी लोटला।
घर्डिली चिर्डीली रागे। रडविली बडविली बळे।।
खौळले लोक देवाचे। मुख्य देवची उठीला।
कळेना काय रे होते। आनंदवनभुवनी।।
बुडाले सर्वही पापी। हिंदुस्थान बळावले।
अभक्तांचा क्षयो जाला। आनंदवनभुवनी।।
बुडाला औरंग्या पापी। म्लेंच्छ संव्हार जाहला।
मोडिली मांडिली क्षेत्रे। आनंदवनभुवनी।।
रामवरदायिनी माता। गर्द घेऊनि उठली।।
मर्दिले पूर्वीचे पापी। आनंदवनभुवनी।।
भक्तासी रक्षिले मागे। आताही रक्षिते पहा।
भक्तासी दीधले सर्वै। आनंदवनभुवनी।।'

हे काव्य लिहिता लिहिता समर्थांची भावसमाधी लागली असावी. त्यामुळे शेवटी 'दास म्हणे' हे सांगायला ते शिल्लक उरले नाही. आयुष्यभर केलेल्या श्रमाचे सार्थक झाले या कल्पनेने समर्थ भावविभोर झाले. हे सारे देवाने केले याची ते कबुली देतात.



# हनुमंताची स्तोत्रे

समर्थ हनुमंताचे अवतार आहेत अशी समर्थ सांप्रदायिक मंडळींची धारणा आहे. समर्थ रामभक्त असल्याने हनुमंताची स्तुती हा त्यांच्या रामभक्तीचाच एक भाग म्हणावा लागेल. समर्थांना रामचंद्रांनी अनुग्रह दिला तेव्हा समर्थांची सर्व जबाबदारी त्यांनी हनुमंतावर सोपवली. समर्थांनी हनुमंताची अनेक स्तोत्रे लिहिली असून त्यात ते या घटनेचा स्पष्ट उल्लेख करतात.

'तुजविण मज पाहे पाहता कोण आहे। म्हणऊनि मन माझे रे तुझी वास पाहे।।
मज तुज निरविले पाहिजे आठवीले। सकळीक निजदासा लागी सांभाळविले।।
स्वधामासी जाता प्रभू रामराजा। हनुमंत तो ठेविला याच काजा।
सदा सर्वदा रामदासासी पावे। खळे गांजीता ध्यान सांडोनि धावे।।
हनुमंत आमुची कुळवल्ली। राममंडपा वेला गेली।
श्रीराम भक्तीने फळली। रामदास बोले या नावे।।
साह्य आम्हासी हनुमंत। आराध्य दैवत श्री रघुनाथ।
गुरू श्रीराम समर्थ। काय ऊणे दासासी।।'

हनुमंताची स्तुती करताना समर्थांचे अंतःकरण अगदी भरून येते. किती विशेषणे समर्थांनी त्यासाठी वापरावीत? 'भीमरुपी महारूद्रा' या त्यांच्या लोकप्रिय स्तोत्रात भीमरूपी, महारूद्रा, वज्रहनुमान, मारुती, वनारी, अंजनीसूत, रामदूत, प्रभंजन, महाबळी, प्राणदाता, सौख्यकारी, दुःखहारी, धूर्त, वैष्णव, गायक, दीनानाथ, हरिरूप, सुंदर, जगदांतर, लोकनाथ, जगन्नाथ, प्राणनाथ, पुरातन, पुण्यवंत, पुण्यशील, पावन, परितोषक, अशी नुसती विशेषणांची खैरात आहे. यातील प्रत्येक विशेषण हनुमतांच्या चरित्रातील एकेका प्रसंगाचे स्मरण घडवते. उदाहरणार्थ, हनुमंताने अशोकवनाचा लंकेत विध्वंस केला म्हणून वनारी; वज्राने हनुवटीला आघात झाला म्हणून वज्रहनुमान; अन्य स्तोत्रातूनही वातनंदनु, वज्रपुच्छ, काळदंड, वितंडशक्ती, धगधगीतसीकळा, कराळकाळमुख अशी

विशेषणे वापरलीत. अशा प्रकारे हनुमंतांची स्तुती केल्यास समर्थ त्याची फळश्रुती पण सांगतात.

'भूतप्रेत समंधादी रोगव्याधी समस्तही।
नासती तुटती चिंता आनंदे भीमदर्शने।।'

## परित्राणाय साधूनां विनाशायच दृष्कृताम्

सज्जनांच्या रक्षणासाठी दुर्जनांचे निर्दालन हे भगवंताचे खास अवतार प्रयोजन आहे. त्यात हनुमान दुष्टनिर्दालनासाठी विशेष प्रसिद्ध आहेत. हनुमंताच्या पराक्रमाने वर्णन करताना समर्थ वीररस, बीभत्सरस आणि रौद्ररस यांची अप्रतिम पेरणी करतात. या पेरणीतून निर्भय तरूणांचे पीकच हाती लागणार. दुष्टांच्या दृष्टीने समर्थांचा मारुती प्रलयंकारी असला तरी सज्जनांकरिता तो शुभंकारी किंवा भक्तकामकल्पतरू आहे. वीरनायक म्हणून हनुमंताची प्रतिमा पोरापासून थोरापर्यंत सर्वांच्या चित्तात चांगलीच बिंबली आहे. त्याचा फायदा घेत समर्थ वीर हनुमानाचे चित्र प्रभावी शब्दात रेखाटतात. समर्थांचा राम आणि हनुमान हे बंधविमोचन करणारे आहेत. म्हणून मानवजातीबद्दलची अपार करुणा या वर्णनात प्रतिबिंबीत होते. एका अर्थाने हनुमंताचा पराक्रम म्हणजे विश्वव्यापी नारायणाची वीर रसाने बांधलेली पूजा म्हणावी लागेल. रावणाने जे सामान्य प्रजेवर अत्याचार चालवले आहेत त्याची चीड नको का यायला? हनुमंताचा क्रोध, वीररस यांचे वर्णन समर्थ करतात ते त्यासाठी. म्हणून समर्थांचा हनुमान संतप्त, प्रतिकारशील, युद्ध प्रवृत्त असा आहे. समर्थांच्या शब्दात सांगायचे झाल्यास-

'भुवनदहन काळी काळ विक्राळ जैसा। सकळ गिळीत उभा भासला भीम तैसा।।'

किंवा आणखी एका स्तोत्रात 'कोपला रुद्र जे काळी। ते काळी पाहावेचिना।।' असे ते म्हणतात. 'नेत्राग्नी चालील्या ज्वाळा। भृकुटी त्राहटिल्या बळे।' हे पण वर्णन आहेच.

याचा अर्थ समर्थांचा मारुती सर्वकाळ संतापलेलाच असतो असे नाही. त्याचे सौम्य, सोज्वळ, सुंदर, सुकुमार रूपही समर्थ वर्णन करतात.

'अद्‌भूत पुच्छ ते कैसे। भोंवडी नभ पोकळी।
फाकले तेज ते भारी। झाकिले सूर्यमंडळ।।
देवता रूप पै ज्याचे। ठाण अद्‌भूत शोभले।
ध्वजांग ऊर्ध्व तो बाहो। वामहस्त कटावरी।।
कासिले हेम कासोटी। घंटा किंकिणी भोवत्या।

मेखळे जडिलें मुक्त। दिव्य रत्न परोपरी।।
माथा मुगुट तो कैसा। कोटि चंद्रार्क लोपले।
कुंडले दिव्य ते कानी। मुक्तमाळा विराजती।।
केशरे देखिले भाळी। मुख सुहास्य चांगले।
मुद्रिका शोभती बोटी। कंकण कर मंडीत।।
चरणीचे वाजती अंदु। पदी तोडर गर्जती।
कैवारी नाथ दीनांचा। स्वामी कल्याणदायकु।।'

घणाघाती, नादमय शब्दांचा अनुप्रासात्मक वापर करून स्तोत्रात गेयता आणि संगीत निर्माण करणे हे समर्थांचे भाषासौष्ठव केवळ अपूर्व म्हणावे लागेल. शब्दक्रीडा, भावक्रीडा, लयक्रीडा यातून समर्थ ते कसे साधतात ते खरोखर पाहण्यासारखे आहे. त्यांची ही अपूर्व शैली बघा-

'गडगडीत धडधडीत कडकडीत कोपला।
लाटि कूटी पाडि फोडी झोडी झोडी झोडला।। किंवा
झिडकिता झिडकी झिडकेना। तडकिता तडकी तडकेना।
फडकिता फडकी फडकेना। कडकिता कडकी कडकेना।।
टणकिता टणकी टणकेना। ठणकिता ठणकी ठणकेना।
दणगिता दणगी दणगेना। फुणगीता फुणगी फुणगेना।।'

ट्, ठ्, ढ्, ण, ड, ळ या व्यंजनाचा समर्थ अशा कुशलतेने वापर करतात की शब्द एकमेकांवर आदळून एक नाद तयार होतो. ही स्तोत्रे संगीतमय आहेत.

'जनी ते अंजनीमाता' या स्तोत्रामध्ये समर्थांनी हनुमंताच्या बाललीलांचे वर्णन केले आहे. अगदी बालवयात फळ समजून सूर्य गिळण्याचा हनुमंताने केलेला प्रयत्न समर्थांचे मन वेधून घेतो. हनुमंताचे उड्डाण आणि त्याच्या शेपटीचा पराक्रम याचे समर्थांना फार कौतुक वाटते. हनुमंताच्या बालरूपाबद्दल ते लिहितात-

'त्रैलोकी पाहता बाळे। ऐसे तो पाहातां नसे।
आतुळ तुळणा नाहि। मारुती वातनंदनु।।
चळे ते चंचल नेटे। बाळ मोवाळ साजिरे।
चळवळी चळवळीताहे। बाळ लोंबाळ गोजिरे।।
बाळाने गिळिला बाळु। स्वभावे खेळतां पाहा।
आरक्त पीत वाटोळे। देखिले धरणीवरी।।
पवनासारिसा धावे। वावरे विवरे बहु।
आपूर्व बाळलीला हे। रामदास्य करी पुढे।।'

समर्थांनी 'हनुमंता रामदूता। वायुपुत्रा महाबळी' या स्तोत्रात हनुमंतालाच विश्वाची उत्पत्ती करणारा ब्रह्मदेव, विश्वाचे पालन करणारा भगवान विष्णू अथवा संहार करणारा शंकर म्हटले आहे. त्यांच्या दृष्टीने हनुमान हे परब्रह्माचेच रूप असून वेद, शास्त्र आणि शेष यांना हनुमंताचे स्वरूप वर्णन करता येत नाही. एकदा समर्थांना कफाची व्यथा झाली होती त्यावेळी रामाच्या सेवेकरीता आरोग्य चांगले रहावे म्हणून ते हनुमंताला प्रार्थना करतात-

'उचित हित करावे उधरावे धरावे। अनहित न करावे ता जनी येश द्यावे।
अघटित घडवावे सेवका सोडवावे। हरिभजन घडावे दु:ख ते वीघडावे।।
बहुत सबळ सांठा मागतो अल्प वाटा। न करि हित काटा थोर होईल ताठा।
कृपणपण नसावे भव्य लोकी दिसावे। अनुदित करूणेचे चिन्ह पोटी वसावे।।'

समर्थांनी हनुमंताची शेकडो मंदिरे स्थापिली असली तरी सातारा, सांगली आणि कोल्हापूर या जिल्ह्यातील अकरा मारुती विशेष लोकप्रिय आहेत. अष्टविनायक, बारा ज्योर्तिलिंगे यांच्याप्रमाणे अकरा मारुतींची यात्रा अनेक लोक करत असतात. काही मारुतीस्तोत्रे या अकरा मारुतीतील काही मूर्तींना उद्देशून आहेत. उदाहरणार्थ-'भीमरूपी महारूद्रा' हे प्रसिद्ध स्तोत्र म्हणजे चाफळच्या वीर मारूतीचे वर्णन आहे. 'बळे सर्व संहारिले रावणाला' या मारुतीस्तोत्रात बहे बोरगावची कथा असून रामकथेतील एका प्रसंगाचे वर्णन केले आहे. समर्थ वाल्मीकि रामायणाएवढेच महत्त्व लोकमानसातील प्रचलित रामकथेला देतात. कृष्णाबाईच्या पुरापासून रामांचे रक्षण करण्यासाठी हनुमंताने आपल्या बाहुबलाने बहे बेट निर्माण केले. त्या त्या गावातील लोक अभिमानाने या कथा सांगतात. समर्थ त्यांचे भावविश्व जोपासतात.



# गुरुगीता

आध्यात्मिक क्षेत्रात सद्‌गुरू ही संकल्पना सर्वच संप्रदायांनी स्वीकारली आहे. भौतिक शिक्षण घेतानासुद्धा गुरूशिवाय ज्ञान नाही, हे सर्वांना ठाऊक आहे. अध्यात्मविद्या तर अत्यंत सूक्ष्म आहे. तिथे आपल्या मनाने किंवा केवळ स्वप्रयत्नाने ज्ञान मिळवायचे ठरविल्यास फसगत होण्याची खूप शक्यता आहे. अशा वेळी ज्याने प्रत्यक्ष ज्ञान प्राप्त करून घेतलेले आहे अशा माणसाच्या सहवासात साधना करून ज्ञानप्राप्ती करून घेणे ही सहज आणि स्वाभाविक प्रक्रिया आहे. सद्‌गुरू जीवन जगण्याची कला प्रदान करतात म्हणून सर्वच संतांनी सद्‌गुरूचे महात्म्य सांगितले आहे. सद्‌गुरूचे स्तवन करताना तर ज्ञानदेवांच्या प्रतिभेला बहरच येतो. समर्थांना देहधारी गुरूचा अनुग्रह लाभला नव्हता. त्यांनी त्यांचे आराध्य दैवत प्रभू रामचंद्र यांनाच गुरू मानले. हे गुरू मानणे एकतर्फी नव्हते. रामचंद्रांनी त्यांचा शिष्य म्हणून स्वीकार केल्याची नोंद समर्थ चरित्रात आणि वाङ्मयात सापडते. रामचंद्रांचे त्यांना वारंवार दर्शन आणि मार्गदर्शन मिळत असल्यामुळे त्यांच्या दृष्टीने रामचंद्र हे देहधारी गुरू असल्यासारखेच होते. समर्थांनी आपल्या गुरूंचे स्तवन करण्यासाठी गुरूगीता हे १४९ ओव्यांचे छोटेखानी प्रकरण लिहिले आहे.

मुळातील गुरूगीता उमा महेश्वर संवादात्मक असून त्याचे २७४ श्लोक स्कंदपुराणाच्या उत्तरखंडात आढळतात. या २७४ श्लोकांचे १४९ ओव्यात भावांतरण समर्थांनी केले आहे. देवी पार्वती भगवान शंकरांना ब्रह्मप्राप्तीचा उपाय विचारते. तिचा प्रश्न ऐकून भगवान शंकर अत्यंत प्रसन्न होतात आणि सद्‌गुरूची भक्ती हाच ब्रह्मप्राप्तीचा एकमेव उपाय आहे असे पार्वतीला समजावून सांगतात. मूळ उमा महेश्वर संवादाचा पूर्ण आशय समर्थांच्या गुरूगीतेत अत्यंत प्रभावी शब्दात आलेला आहे. भगवान शंकरांच्या मते विविध देवतांच्या आराधनांचे सर्वश्रेष्ठ फळ म्हणजे सद्‌गुरूंची प्राप्ती होणे होय. संत नामदेव विठ्ठलाचे अनन्य

भक्त होते. त्यांचा नैवेद्य प्रत्यक्ष विठ्ठलाने ग्रहण करावा एवढा नामदेवांचा अधिकार होता. पण ब्रह्मप्राप्तीसाठी खुद्द विठ्ठलाने त्यांना सद्गुरूची कास धरायला सांगितली. सद्गुरू हा देवापेक्षा थोर आहे हा विचार सर्वच संतांनी मांडला. समर्थांनी देखील गुरूगीता, श्रीमद् दासबोध ह्या त्यांच्या वाङ्मयात तो मांडला.

गुरूगीतेतील दोन ओव्या गुरू या शब्दाचा अर्थ किंवा व्युत्पत्ती सांगणाऱ्या आहेत.

'गुकार तो तम अक्षर जाण। रूकार तो तेजप्रकाशन।
नाशक अज्ञानाचा होय ज्ञान। ऐसी दोनी अक्षरे।।
गुकार ते प्रथम अक्षर। तेचि माया त्रिगुणाकार।
रूकार ते ब्रह्माक्षर। माया नाशक।।'

याचा अर्थ मायेतून सुटका करणे हे महत्त्वाचे कार्य सद्गुरू करतात. मात्र त्यासाठी गुरूची सेवा कशी करावी याचे भावपूर्ण मार्गदर्शन समर्थ करतात-

'आधि गुरूदेव भोजन। मग घेईजे अन्नपान।
तेचि गुरूच्छिष्ट भोजन। यथाक्रमे।।
गुरू मूर्तिचे ध्यान। करावे स्तोत्र पठण।
गुरूचे निवासस्थान। तेचि निवास काशी।।
गुरू मूर्तिचे स्मरण। निरंतर तेचि ध्यान।
गुरू आज्ञेचे पालन। अनन्यभावे।।
त्रिलोकी थोर थोर। देव पन्नग असुर।
ऋषी मानव विद्याधर। गुरूप्रसादची पावले।।'

समर्थांनी सद्गुरूलाच परब्रह्म म्हटले असल्यामुळे सद्गुरू हे तत्त्व सर्वव्यापी आहे असे ते म्हणतात. ब्रह्मा, विष्णू आणि महेश सृष्टीची उत्पत्ती, स्थिती आणि लय करतात ते सद्गुरूच्याच अधिष्ठानावरती. सद्गुरू हे निराकार आहेत. 'अनंत कोटी ब्रह्मांडनायक' असे आपल्या सद्गुरूचे वर्णन शिष्य करतात ते यथार्थच होय. जप, तप, ध्यान, उपासना हे सर्व सद्गुरूचेच असावे हे सांगताना समर्थ म्हणतात-

'ध्यानमूळ गुरूमूर्ति। पूजामूळ गुरूचरण असती।
मंत्रमूळ वाक्यस्थिती। मोक्षमूळ गुरूकृपा।।
गुरू आदि अनादि। गुरूच सर्व देत बुद्धि।
गुरूच विधान विधी। जपजाप्य।।'

शिष्याला उपासनेचा किंवा ज्ञानाचा अहंकार होऊ नये म्हणून त्याने आपल्या सर्व कर्माचे श्रेय सद्गुरूंना अर्पण करावे. सद्गुरूंनी दिलेल्या मंत्राचे त्याने सतत

स्मरण करावे. शिष्याच्या दृष्टीने सद्‌गुरू जे सांगतील तेच वेदवाक्य होय. त्याने वेगळे वेदाध्ययन करण्याची गरज नाही. जो अशाप्रकारे आजीवन गुरूदास्य करतो तोच खरा संन्यासी होय. मग तो भगवी वस्त्रे परिधान करो अथवा न करो.

काही साधक गुरूमधले दोष पाहातात आणि गुरूची निंदा करतात. समर्थांच्या मते हे सर्वात मोठे पाप आहे. एखाद्या मुनीने शाप दिला किंवा देवाने संकट आणले तर गुरूकृपेने त्यातून बाहेर पडता येईल. मात्र जर गुरूचा कोप झाला तर त्या शिष्याला वाचविण्याचे सामर्थ्य प्रत्यक्ष परमेश्वरातही नाही. या प्रकरणाचे शेवटी समर्थ म्हणूनच म्हणतात की अश्रद्ध अथवा अभाविक असल्यास त्याला ही गुरूगीता अजिबात सांगू नये. साधकाने प्रसंगपरत्वे पठण करावे असे हे मौलिक प्रकरण आहे.



# समर्थांचा पत्रव्यवहार

पत्रव्यवहार हा एक जिवंत वाङ्मय प्रकार आहे. अलिकडे दूरभाष आणि भ्रमणध्वनी यांनी पत्रव्यवहाराची जागा घेतली असली तरी पूर्वी पत्राद्वारेच माणसे एकमेकांशी संबंध ठेवीत असत. पत्राच्या माध्यमातून पत्र लिहिणारा नकळत आपले अंत:करण व्यक्त करतो. माणसाचे भावविश्व त्याच्या पत्रातून प्रकट होते. अगदी अलिकडचे उदाहरण द्यावयाचे झाल्यास स्वामी विवेकानंदांचे देता येईल. स्वामीजींची अनेक चरित्रे उपलब्ध आहेत; पण त्यांच्या अंत:करणाचा ठाव लागतो तो त्यांच्या पत्राद्वारे. समर्थ रामदास ही तर एक राष्ट्रीय चळवळ होती. त्यांच्या मनातील वादळ त्यांच्या पत्रातून अनेकदा व्यक्त झाले आहे. समर्थांच्या काळात त्यांनी शेकडो पत्र लिहिली असतील. पण आज दुर्दैवाने फार थोडी पत्रे उपलब्ध आहेत. समर्थांनी जी पत्रे लिहिली ती बहुतेक ओवीबद्ध असून त्यांची दोनच पत्र गद्य प्रकारातील आहेत.

समर्थांच्या पत्रांचे विषयानुसार तीन भाग पाडता येतील. १) कौटुंबिक पत्रव्यवहार २) सांप्रदायिक पत्रव्यवहार ३) राजकीय पत्रव्यवहार. समर्थांनी आपली आई राणूबाई, आपले बंधु गंगाधर तर आपले पुतणे रामजी आणि शामजी यांना लिहिलेली पत्र उपलब्ध आहेत. समर्थ वैराग्यशाली होते पण तुसडे नव्हते. एका अर्थाने ते प्रेमळ आणि कुटुंबवत्सल होते. त्यांनी घराचा त्याग केला त्यामागे एक विशिष्ट ध्येय होते. आपल्या मातेबद्दल त्यांच्या मनात किती आदरभाव होता ते पत्रातील पुढील ओव्यांवरून लक्षात येईल.

'तू भवसिंधूंचे तारू। तू भक्ताचा आधारू
तू अनाथाचे अवसरू। वैष्णवी माया ।।२।।
तू भावार्थांची जननी। तू विरक्ता संजीवनी
तू परमार्थाची खाणी। भजनशीळ।।३।।
तू सर्व सुखांची मूस। तू आनंदरत्नांची मांदूस।

तुझेनि चुकती सायास। संसारीचे ।।४।।'

म्हणून ते जरी लग्न मंडपातून पळून गेले असले तरी तपश्चर्या आणि भारतभ्रमण झाल्यावर ते जांबेला परत आले आणि आईचे आशिर्वाद घेऊनच त्यांनी आपल्या कार्याला प्रारंभ केला. एवढेच नव्हे तर आईच्या शेवटच्या आजारपणात ते पुन्हा काही दिवस जांबेत जाऊन राहिले होते. त्या थोर माऊलीने भगवत् चिंतन करीतच समर्थांच्या मांडीवर देह ठेवला.

समर्थांनी पंढरपूरहून श्रेष्ठांना पाठवलेली दोन पत्र उपलब्ध आहेत. त्यावरून देखील आपल्या थोरल्या भावाकडे समर्थ कोणत्या दृष्टीने पाहत होते त्याची कल्पना करता येते. त्यांचे थोरले भाऊ अध्यात्मामध्ये मोठे अधिकारी होते. त्यांना लोक आदराने श्रेष्ठ म्हणत असत. त्यांनी लिहिलेले पारमार्थिक वाङ्मयदेखील उपलब्ध आहे. 'रामी रामदास' या नावाने ते कविता लिहीत. आपल्या बंधूबद्दल समर्थ लिहितात,

'तू धीरपणे मेरू। तू उदारपणे जळतरू
तू गंभीरपणे सागरू। पीयुषाचा।।२।।
तू पवित्रपणे वैश्वानरू। तू समर्थपणे ईश्वरू।
तू प्रतापाचा दिनकरू। धगधगायमान ।।३।।
तू सकळ तीर्थांचे यश। तू उंच आकाश।
तू मायेचा मूळपुरूष। सकळकर्ता ।।४।।'

या ओव्यांवरून जगाकडे पाहण्याचा समर्थांचा दृष्टीकोन दिसून येतो. संतांना ईशावास्य दृष्टि प्राप्त झालेली असते. हे सारे जगत् म्हणजे भगवंताचा अविष्कार आहे याचे त्यांना भान असते.

समर्थांनी आपले पुतणे रामजी आणि शामजी (गंगाधरपंतांची मुले) यांना पत्रे लिहिली त्यावेळी ते दोघेजण आठ-दहा वर्षांचे असावेत. म्हणजे दोघे विद्यार्थीदशेत होते. आपण यापूर्वीच पाहिले की प्रबोधनप्रियता हा समर्थांच्या वाङ्मयाचा खास गुणविशेष होता. त्यामुळे आपल्या पुतण्यांना पत्र लिहिताना त्यांनी जो उपदेश केला आहे तो विद्यार्थ्यांची भगवत्गीता ठरावा. गोड बोलणे, नानाविध गुणांनी अंत:करण सजवणे, अभ्यास आणि खेळ यांचे संतुलन साधणे, शरीर आणि कपडे स्वच्छ ठेवणे, अजातशत्रु किंवा जगमित्र असणे, हे त्यांचे मुद्दे आजही विद्यार्थ्यांना उपयुक्त आहेत. समर्थ पत्रात लिहितात.

'बरे सत्य बोला यथातथ्य चाला। बहु मानिती लोक तेणे तुम्हाला।
दिसामाजी काही तरी ते लिहावे। प्रसंगी अखंडीत वाचीत जावे।।
वरी चांगला अंतरी गोड नाही। तया मानवाचे जिणे वेर्थ पाही।

वरी चांगला अंतरी गोड आहे। तयालागी कोणीतरी शोधिताहे।।
भला रे भला बोलती ते करावे। बहुता जनांचे मुखे येश घ्यावे।
परी सेवटी सर्व सोडोनी द्यावे। मरावे परी कीर्तीरूपे उरावे।।'

अब्राहम लिंकन यांनी मुख्याध्यापकांना लिहिलेले पत्र अनेक शाळांमधून लावले जाते. समर्थांचे हे पत्रदेखील मोठ्या अक्षरात छापून शाळेतील वर्गावर्गामध्ये लावण्यासारखे आहे. अत्यंत सोप्या भाषेत विद्यार्थीदशेचे सार समर्थांनी सांगितले आहे.

सांप्रदायिक पत्रव्यवहारामध्ये समर्थांनी आपल्या शिष्यांना लिहिलेली पत्रे उपलब्ध आहेत. त्यातील पहिलेच पत्र भावपूर्ण आहे. समर्थ जेव्हा कृष्णातीरी रहायला आले, तेव्हा त्यांना नासिकमधील बारा वर्षांच्या वास्तव्याचे स्मरण झाले. पंचवटीतील राम आठवला आणि आपण पंचवटीतील रामापासून फार दूर गेलो आहोत याची खंत त्यांच्या मनाला लागून राहिली. म्हणून त्यांनी तेथील रामभक्तांना पत्र पाठवले. पत्राच्या शेवटी समर्थ लिहितात-

'प्रत्यही माझा नमस्कार। देवासी करावा निरंतर
मजकारणे शरीर। इतुके कष्टवावे।।
बाळ वृध नर नारी। सकळ भक्त कुमार कुमारी।
समस्तासी नमस्कारी। कृष्णातीरवासी।।'

टाकळी मठाचे मठपती उद्धवस्वामी यांना समर्थांनी लिहिलेले आज्ञापत्र वाचले म्हणजे समर्थांनी भिक्षेच्या माध्यमातून किशोरवयीन मुले कशी गोळा केली असावीत याची कल्पना येते. समर्थांचे हे पत्र गो. नी. दांडेकरांना खूप आवडत होते. समर्थ लिहितात-

'सोईऱ्या धाईऱ्याची मुले। तीक्ष्ण बुधिची सखोले।
तयासी बोलणे मृद बोले। करित जावे।।७।।
त्याचा संसार समाचार। पुसत जीवा विस्तार।
उदंड सांगता तत्पर। होऊन ऐकावे।।८।।
दु:ख ऐकता दु:ख जाते। त्याचे दु:ख हळु होते।
मग ते सवेचि धरिते। मित्रभावे।।९।।
निकट मित्री बरी होता। मग त्यासी न्यावे येकांता।
म्हणावे रे भगवंता। काही तऱ्ही भजावे ।।१०।।
पूर्वी देव पूजिला नव्हता। म्हणोनि आली दरिद्रता
या कारणे अनंता। काही तऱ्ही भजावे ।।११।।
मान्य होता जप सांगावा। मग तो इकडे पाठवावा।

मग तयाचा सकळ गोवा। उगऊ आम्ही ।।१२।।'

समर्थांनी तंजावर मठाधिपती भीमस्वामी यांना लिहिलेल्या पत्रात राजकारण आणि अध्यात्म यांचा समन्वय सांगितला. भौतिक जीवनात राजकीय स्वातंत्र्य आवश्यक आहे. तरच राष्ट्र समृद्ध होते. आध्यात्मिक जीवनात ब्रह्मचिंतन आवश्यक आहे. तरच मनाला शांती समाधान प्राप्त होते.

समर्थांच्या राजकीय पत्रव्यवहारात तत्कालीन देशस्थितीचे प्रतिबिंब पाहायला मिळते. समर्थ संप्रदायाची चतु:सूत्री पुढीलप्रमाणे होती-

१) मुख्य हरिकथा निरुपण २) दुसरे ते राजकारण ३) तिसरे ते सावधपण ४) चौथा अत्यंत साक्षेप. मनुष्याला व्यावहारिक जीवनात यशस्वी होण्यासाठी त्याने राज्यकर्ते चांगले निवडले पाहिजेत अशी समर्थांची ठाम धारणा होती. राजा जर जाणता नसेल तर याचा अर्थ लोक पापी आहेत असे समर्थ स्पष्टपणे म्हणतात. शिवाजी महाराजांसारखा विलक्षण पराक्रमी, निखळ चारित्र्यसंपन्न, आत्यंतिक निस्पृह असा थोर राजा उदयाला आला होता- त्याची स्तुती करताना समर्थांच्या प्रतिभेला बहर आला आणि त्यांनी लिहिले- .

'यशवंत कीर्तीवंत। सामर्थ्यवंत वरदवंत
पुण्यवंत नीतिवंत। जाणता राजा।।४।।
आचारसीळ विचारसीळ। दानसीळ धर्मसीळ।
सर्वज्ञपणे सुसीळ। सकळां ठाई ।।५।।
धीर उदार आणि सुंदर। शूर क्रियेसी तत्पर।
सावधपणे नृपवर। तुच्छ केले।।६।।
या भूमंडळाचे ठायी। धर्मरक्षी ऐसा नाही।
मऱ्हाष्ट्र धर्म राहिला काही। तुम्हाकारणे ।।१०।।
कितेक दुष्ट संव्हारिला। कितेकांसी धाक सुटला
कितेकांसी आश्रयो जाला। शिवकल्याण राजा।।१२।।'

या पत्रासंबंधी महाराष्ट्राचे मुख्यमंत्री यशवंतराव चव्हाण म्हणत असत की, शिवछत्रपतींचे एवढे सुंदर वर्णन कोणत्याही समकालीन लेखकाने अथवा कवीने केलेले नाही. देशस्थितीचे भान हे समर्थांच्या वाङ्मयाचे खास वैशिष्ट्य आहे. अफझलखान वधापूर्वी त्यांनी पाठवलेले एक पत्र उपलब्ध आहे. या पत्रातील प्रत्येक चरणाचे पहिले अक्षर घेतल्यास 'विजापूरचा सरदार निघाला आहे' ही सूचना मिळते. हा विजापूरचा सरदार म्हणजे अफझलखान हे सांगायला नकोच. या पत्राचे शेवटचे दोन चरण 'येकांती विवेक करोनी। इष्ट योजना करावी।।' असे आहेत. आणखी एका पत्रात शिवछत्रपतींना सावध राहण्याचा सल्ला देताना

अफझलखानाचे स्वभाववर्णन समर्थांनी किती प्रभावी शब्दात केले आहे ते पाहा-

'तुंड हेकांड कठोरवचनी। अखंड तोले साभिमानी।
न्याय नीति अंत:कर्णी। घेणार नाही।।
तऱ्हे सीघ्रकोपी सदा। कदापि न धरी मर्यादा।
राजकारण संवादा। मिळोचि नेणे।।
ऐसा लौंद बेईमानी। कदापि नाही सत्यवचनी।
पापी अपस्मार जनी। राक्षेस जाणावा।।'

समर्थांनी शिवरायांच्या सद्‌गुणांचे जसे अचूक वर्णन केले आहे तसेच अफझलखानाच्या दोषांचा पाढादेखील बरोबर वाचला आहे. या वर्णनावरून लक्षात येते की समर्थांनी या सर्व घटना किती जवळून न्याहाळल्या आहेत. शिवछत्रपतींच्या मृत्यूनंतर संभाजीला पाठविलेले पत्र वाचले म्हणजे तत्कालीन राजकीय घडामोडीत समर्थांची किती मानसिक गुंतवणूक होती ते लक्षात येते.

शिवछत्रपतींच्या मृत्यूनंतर संभाजीने गादीवर बसावे की राजारामाने बसावे हा तंटा रायगडावर सुरू झाला. ही संधी साधून औरंगजेब सात लाख फौज घेऊन स्वराज्य गिळंकृत करण्यासाठी आला. अशा वेळी उग्र प्रकृतीच्या संभाजीने शिवछत्रपतींचे तीन जुने विश्वासू सेवक हत्तीच्या पायी देऊन ठार मारले. अशा वेळी समर्थांनी संभाजीस केलेला उपदेश सर्वांना थक्क करून सोडणारा आहे. या पत्रातील प्रत्येक शब्दातून समर्थांची राष्ट्रचिंता आणि स्वराज्यप्रीती दिसून येते. समर्थ म्हणतात-

'काही उग्रस्थिती सांडावी। काही सौम्यता धरावी।
चिंता लागावी परावी। अंतर्यामी।।
मागील अपराध क्षमावे। कारभारी हाती धरावे।
सुखी करूनि सोडावे। कामाकडे।।
श्रेष्ठी जे जे मेळविले। त्यासाठी भांडत बैसले।
मग जाणावे फावले। गनिमांसी।।
ऐसे सहसा करू नये। दोघे भांडता तिसऱ्यासि जये।
धीर धरून महत्कार्य । समजून करावे।।
बहुत लोक मेळवावे। येक विचारे भरावे।
कष्टे करोनि घसरावे। म्लेंच्छावरी।।
आहे तितुके जतन करावे। पुढे आणिक मेळवावे।
महाराष्ट्र राज्य करावे। जितके तिकडे।।
लोकी हिंमत धरावी। शर्तीची तरवार करावी।

चढती वाढती पदवी। पावाल येणे।।
शिवरायास आठवावे। जीवित्व तृणवत् मानावे।
इहलोकी परलोकी राहावे। कीर्तिरूपे।।
शिवरायाचे आठवावे स्वरुप। शिवरायाचा आठवावा साक्षेप।
शिवरायाचा आठवावा प्रताप। भूमंडळी।।
शिवरायाचे कैसे चालणे। शिवरायाचे कैसे बोलणे।
शिवरायाचे सलगी देणे। कैसे असे ।।'

शिवाजी महाराजांनी निर्माण केलेल्या स्वराज्याबद्दल समर्थांना किती अभिमान होता आणि हे स्वराज्य टिकावे, वाढावे या विषयीची त्यांच्या मनातील तळमळ या पत्रात दिसून येते. तत्कालीन राजकीय घडामोडींचे हे पडसाद जसे समर्थांच्या वाङ्मयात आढळतात तसे अन्य कोणाही समकालीन लेखकाच्या अथवा कवीच्या साहित्यात आढळत नाहीत.

समर्थांनी जी दोन गद्य पत्र लिहिली त्यातील पहिले पत्र दिवाकर गोसाव्याचे व्याही अनंतभट यांना लिहिले आहे. तर दुसरे गद्य पत्र शिवछत्रपतींच्या मृत्यूनंतर संभाजी महाराजांना पाठविलेले आहे. या पत्राच्या प्रारंभीच समर्थ संभाजी महाराजांना 'सध्या काळ अत्यंत कठीण आहे तेव्हा सावधानतेने राहिले पाहिजे' अशी सूचना करतात. या पत्रानंतर वर्षभरात औरंगजेबचे आक्रमण झाले आणि मराठी साम्राज्याला फार मोठ्या कठीण प्रसंगातून जावे लागले. समर्थ आणि शिवछत्रपती यांचे संबंध किती जिव्हाळ्याचे होते त्यावर हे पत्र चांगलाच प्रकाश टाकते.

नळ नाम संवत्सरी म्हणजे १६७६ साली शिवथर घळीत समर्थांनी छत्रपतींना १८ शस्त्र दिल्याची नोंद आहे. तसेच चाफळ येथील रामनवमी उत्सवाचा अंगिकार शिवछत्रपतींनी केल्याचा उल्लेख आहे. या पत्रातील पुढील परिच्छेद फार महत्त्वाचा आहे- 'उत्तेरकडील राजपुत्राचे आगमन जाले म्हणोनि ऐकले. ते समयी आता काय आला म्हणोनि बोलिले. परंतु या उपरिही ते प्रांतीचे लोक अनुकूळ करून घेतील तरी उभयता योगे कार्यसिद्धीच आहे. परंतु त्वरा पाहिजे।' हा उत्तरेकडील राजपुत्र म्हणजे औरंगजेबचा मुलगा अकबर होय. हा अकबर बापाशी भांडून स्वराज्यात आश्रय मिळावा म्हणून संभाजी महाराजांकडे आला होता. त्याच्या मदतीने औरंगजेबचा काटा काढायला हरकत नाही ही मौलिक सूचना समर्थ देतात. यावरून देहत्यागापर्यंत ते राजकारणाच्या बाबतीत सक्रीय होते असे दिसून येते.



# राजधर्म, क्षात्रधर्म, अखंड सावधानता

समर्थ रामदासांनी संभाजी महाराजांना जे गद्य पत्र लिहिले त्यात आणखी एक धागा मिळतो की पूर्वी समर्थांनी शिवछत्रपतींना तीन पत्रे पाठविली होती. १) राजधर्म २) क्षात्रधर्म ३) अखंड सावधानता. सुदैवाने ही तिन्ही पत्र उपलब्ध आहेत. या पत्रांचा अंतर्भाव राजकीय पत्रव्यवहारातच करावा लागेल. वयाच्या सहाव्या वर्षापासून समर्थ विश्वाची चिंता करीत होते. राजकीय स्वातंत्र्य हा तत्कालीन देश स्थितीवरील तातडीचा उपाय होता. सर्वसामान्य मनुष्य राजकीयदृष्ट्या अत्यंत उदासीन होता. अशा वेळी लोकांना त्यांच्या कर्तव्याची जाणीव करून देणे, त्यांची अस्मिता जागृत करणे, नैराश्य टाकून देऊन सावधपणे कौटुंबिक, सामाजिक आणि राजकीय कामे करण्यासाठी त्यांना प्रवृत्त करणे हे अत्यंत अवघड काम समर्थांनी अंगिकारले होते. सुदैवाने छत्रपती शिवाजी महाराजांसारखा धर्माचा कैपक्षी राजा त्यावेळी अस्तित्वात होता. त्यांना राजधर्म सांगताना समर्थ रामदास लिहितात-

'आधी मनुष्य वोळखावे। योग्य पाहुनि काम सांगावे।
निकामी तरी ठेवावे। येकीकडे।।४।।
कार्यकर्ता प्रयत्नी जाड। काही येक असला हेकाड।
तरी समर्थपणे पाठवाड। केली पाहिजे ।।६।।
अमर्याद फितवेखोर। त्यांचा करावा संव्हार।
शोधिला पाहिजे विचार। यथातथ्य।।७।।
धुरेने युद्धासी जाणे। अैशी नव्हेत की राजकारणे।
धुराच करोनि सोडणे। कित्येक लोक ।।१४।।
उदंड मुंडे असावी। सर्व ही एक न करावी।
वेगळाली कामे घ्यावी। सावधपणे ।।१५।।
मोहरा पेटला अभिमाना। मग तो जीवास पाहेना।

मोहरें मेळवूनि नाना। वरी चपेटे करी।।१६।।'

समर्थांनी राजकारणात नेमका कशाप्रकारे सहभाग घेतला हे सांगणे कठीण आहे. कारण, 'राजकारण बहुत करावे। परंतु कळोचि नेदावे।' हे त्यांचे सूत्र असल्यामुळे त्यांनी ते गुप्तपणेच केले असणार, परंतु राजधर्मासंबंधी ज्या मौलिक सूचना त्यांनी दिल्या आहेत त्यावरून त्यांच्या बौद्धिक उंचीची कल्पना करता येते.

क्षात्रधर्म प्रकरणातील ओव्या तर आश्चर्यकारक आहेत. हिंसा आणि अहिंसा या संकल्पनांच्या बाबतीत समर्थांचा काहीही वैचारिक गोंधळ नव्हता. दुष्टांच्या हिंसेला ते अहिंसाच समजत होते. माणसा-माणसांचे संबंध प्रेमाचे आणि जिव्हाळ्याचे असावेत. तिथे बोलतानासुद्धा विनम्रता असावी. पण लष्कराला जर आपण शांतता, अहिंसा आणि प्रेम शिकवायला लागलो तर दुर्जनांचे फावेल आणि राष्ट्रीय सुरक्षा धोक्यात येईल. शिवछत्रपतींनी जणु दुष्टांच्या निर्दालनासाठीच अवतार घेतला होता. संभाजी महाराजांनी शिव छत्रपतींच्या तलवारीचे वर्णन 'म्लेंच्छ क्षय दीक्षित' असे केले आहे. समर्थ क्षात्र-धर्म सांगताना लिहितात-

'जयास वाटे जीवाचे भये। तेणे क्षात्रधर्म करू नये।
काहीतरी करोनि उपाये। पोट भरावे।।२।।
मारिता मारिता मरावे। तेणे गतीस पावावे।
फिरोनि येता भोगावे। महद्‌भाग्य ।।४।।
देवमात्र ऊच्छेदिला। आपुला स्वधर्म बुडविला।
जित्यापरीस मृत्यू भला। ऐसे समजावे ।।१२।।
मराठा तितुका मेळवावा। आपुला महाराष्ट्रधर्म वाढवावा।
ये विषयी न करिता तकवा। पूर्वज हासती।।१३।।
मरण हाक तो चुकेना। देहे वाचविता वाचेना।
विवेकी होऊन समजाना। काय करावे ।।१४।।
भले कुळवंत म्हणावे। ते ही वेगी हजीर व्हावे।
हजीर न होता कष्टावे। लागेल पुढे ।।१५।।
देवद्रोही तितुके कुत्ते। मारूनि घालावे परते।
देवदास पावती फत्ते। यदर्थी संशयो नाही।।१७।।
देव मस्तकी धरावा। अवघा हलकल्लोळ करावा।
मुलुख बडवा की बुडवावा। धर्म संस्थापनेसाठी ।।१८।।'

या ओव्यांवरून युद्ध व दुष्ट निर्दालन याबद्दलच्या समर्थांच्या स्पष्ट कल्पना लक्षात येतात. अहिंसा ही अनेकदा दुबळ्या लोकांची लपायची जागा असते.

भ्याड आणि भित्र्या माणसाला अहिंसेचे तत्त्वज्ञान लगेच पटू शकते. याबाबतीत समर्थ अत्यंत परखड आणि व्यवहारी होते. जर सज्जनांना सुखाने जगू द्यायचे असेल तर दुष्ट शक्तींचा बिमोड करावाच लागेल. दुर्जनांना देखील धाक वाटावा एवढे सामर्थ्य सज्जनांनी संपादन करावे. दुर्बल सज्जन हा राष्ट्राला कलंक आहे.

राष्ट्रीय जीवनामध्ये सावधानता हा मोठा गुण आहे म्हणून समर्थ लिहितात-

'इशारतीचे बोले नये। बोलायाचे लिहो नये।।
लिहायाचे सांगो नये। जबाबीने।।१२।।
खबरदारी आणि वेगी। तेणे सामर्थ्य चढे आंगी।
नाना प्रकारे कार्यभागी। अंतर चि न पडे।।७।।'

अखंड सावधानता हा शिवाजी महाराजांचा स्वभाव-विशेष होता. शायस्तेखान प्रकरण, आग्र्याहून सुटका ही त्यांच्या सावधानतेची बोलकी उदाहरणं आहेत.

## सेवकधर्म

समर्थांचा राजधर्म आणि क्षात्रधर्म पत्ररूप आहे. याखेरीज त्यांचे सेवकधर्म नावाचे स्वतंत्र प्रकरण असून त्याचे तीन समास आहेत. मुद्दाम सोईचे जावे म्हणून येथे आपण त्याचा विचार करीत आहोत. ज्या माणसाकडे स्वतःचे असे कर्तृत्व नसते; पण संसार तर चालवायचा असतो अशा माणसाला कुठेतरी नोकरी करणे भाग पडते. समर्थांच्या मते अशा सेवकाने मालकाचा विश्वास संपादन करावा. मालकाने त्याच्या कामाची स्तुती करावी. मात्र त्याने स्वतःचा बडेजाव मिरवू नये. मालकावर टीका करणे, मालकाच्या विरोधात कारस्थाने करत राहणे या सर्व गोष्टींना समर्थ कृतघ्नपणा म्हणतात. अशी कृतघ्न माणसे संस्थेत किंवा उद्योग समुहात भ्रष्टाचार वाढवतात. मालकाने अशा सेवकांना तत्काळ कामावरून काढून टाकावे. नोकराचे फाजील महत्त्व वाढवणाऱ्या मालकाला ते म्हणतात-

'काम नासले तरी नासावे। परी सेवकाधीन न व्हावे।
दास म्हणे स्वभावे। बोलिला न्याय।।'

सेवकामध्ये एखादा गुण किंवा कौशल्य असते म्हणून मालक त्याला महत्त्व देतात. याचा अर्थ त्याने स्वतःला मालकापेक्षा शहाणे समजू नये. त्यापेक्षा स्वतंत्र व्यवसाय सुरू करून स्वतःचे शहाणपण सिद्ध करावे.
समर्थ म्हणतात-

'कामाकारणें ठेविले। काम पाहूनि वाढविले।
तेही उगेच गर्वे फुगले। कोण्या हिशोबे।।
श्रेष्ठांचे केले मोडावे। आपुलेचि पुढे प्रतिष्ठावे।
तरी मग लागे भ्रष्टावे। वैभवापासूनि।।
श्रेष्ठांपुढे शहाणपण। हेचि केवळ मूर्खपण।
मूर्खपणे नागवण। आली घरा।।
कळेल तरी सांगू नये। वडिलांसी बुद्धी शिकवू नये।
नेणेपणेचि उपाय। विवेकी करावा।।
पुढे पुढे निघू नये। आज्ञेवेगळे वर्तू नये।
न मानिता अपाय। नेमस्त आहे।।'



# मुसलमानी अष्टक

धुळे येथील समर्थ वाग्देवता मंदिरात जी शेकडो हस्तलिखित बाडं आहेत त्यातील बाडांक ६६८ मध्ये समर्थांनी रचलेली मुसलमानी अष्टकं आहेत. ज्याप्रमाणे करुणाष्टकांना अष्टक का म्हटले ते कळत नाही त्याचप्रमाणे या ६६ श्लोकांना अष्टक का म्हटले ते कळत नाही. वस्तुतः हे ६६ श्लोक मनाच्या श्लोकांप्रमाणेच असून काही श्लोक अपवाद वगळता बहुसंख्य श्लोकांत भुजंगप्रयात वृत्त सांभाळण्याचा प्रयत्न केला आहे. या श्लोकांद्वारे प्रबोधन करताना समर्थांनी श्रोत्यांना 'भाई' म्हणून संबोधिले आहे. तर स्वतःचा उल्लेख करताना 'कहे रामदासो' अशी मुद्रा वापरली आहे. समर्थांच्या अन्य रचनांमध्ये भगवंताचा उल्लेख करताना श्रीराम, देव, परमेश्वर, आत्माराम, अंतरात्मा असे शब्द वापरले आहेत. मात्र या मुसलमानी श्लोकांमध्ये खुदा, इलाही, पैगंबर, पीर यासारखे शब्द सर्रास वापरले आहेत. यावरून समर्थांच्या मनात ईश्वर आणि अल्ला यात काही भेद नाही हे स्पष्ट दिसते. मनाच्या श्लोकात आध्यात्मिक वाटचालीला ते राघवाचा पंथ म्हणतात तर मुसलमानी श्लोकांत त्याला ते पैगंबराचा मार्ग म्हणतात. मानवी जीवनाचे सार्थक क्षणभंगुर अशा जगाच्या खेळात रमण्यात नाही तर पैगंबराच्या रस्त्याने चालण्यात आहे. समर्थ म्हणतात-

दुन्या काहि धंदा सबों छोड देना। दुन्या दो दिनोंकि दुन्याहि न होना।
अछि है राह पिर पैगोंबरोंकि। कहे रामदासो पकर्बे ईनोकि।।'

समर्थांच्या अन्य वाङ्मयातही त्यांची ही विशालता आणि व्यापकता दिसून येते. क्षुद्र मतभेद, वादविवाद, हेवेदावे यामध्ये समर्थांना मुळीच रस नाही. मुसलमानी श्लोकांत रामाने लंका घेतली असे न म्हणता रहीमने लंका घेतली असे ते म्हणतात किंवा माझ्या गळ्यात रामाची माळ आहे असे न म्हणता रहीमची माळ आहे असे म्हणतात. याचा अर्थ समर्थ राम आणि रहीम यांच्यात मुळीच भेद करीत नाहीत हे स्पष्ट होते.

खरा परमेश्वर मुसलमान असत नाही अथवा हिंदू असत नाही. जो सगळीकडे व्यापून आहे त्याला विशिष्ट जातीचे वा धर्माचे लेबल कशासाठी लावायचे? त्यामध्ये संघर्ष कशासाठी? समर्थांनी आपल्या तात्त्विक विवेचनात या संघर्षाच्या मुळावरच आघात केला आहे. ते म्हणतात-

'नहि वो मुसल्मान हिंदु कछुहि। सयथ्यी नहि क्या कहु मे ईसेहि।
सर्वोज्यातसे वोह हिरे नियारा। कहे रामदासो चला वेहि सारा।।'
सर्वोज्यात मोहि हहि बस्त यहि। ईनो कि कहु ज्यात सें कोण भाई।
नहि त्यात ना गोतसे सो निराला। कहे रामदासो ये आला ये आला।।'

ज्याप्रमाणे मनाच्या श्लोकांत भक्ताची लक्षणं सांगितली त्याप्रमाणे मुसलमानी श्लोकातही भक्ताची लक्षणं सांगितली आहेत. भगवंताचा खरा भक्त कधीही दुसऱ्याला दुःख देत नाही. तो जसे बोलतो तसे वागतो. केवळ कफनी आणि माळ धारण करतो तो काही देवाचा खरा भक्त नव्हे. दोन भिन्न संप्रदायाची माणसे एकमेकाला भेटली म्हणजे भिन्न वेषावरून ते आपापसात भांडत राहतात. जर सारे जग भगवंतच चालवतो आहे तर वादविवाद आणि संघर्ष यांचे कारणच कुठे राहते? समर्थ म्हणतात-

'सबोमे कहे सो च्यलावे ईलाहि। ज्युदाहि नहि रे न कर्बे लडाई।
नहि बाद बेबाद भाई तमण्ना। रहिम्काहि बाना सबोने च्यलाना।।'

देवाचा खरा बंदा 'कहे वात वैसा राह से चले सो' असा असतो. संसाराचा व्याप सोडून तो भगवंताचे चिंतन करीत राहतो. माणसाने फकीर व्हायचे असते ते अल्लाला समजावून घेण्यासाठी. फकीर होऊन जो वादामध्ये पडतो त्याला खरा देव कळलेलाच नसतो.
समर्थ म्हणतात-

'खुदाकेहि वास्ते फकिरिही लेना। सबो से भलाई लडाई न कर्ना।।
भला साधु सो वो हरामि न लेवे। खुसि हालसेहि मिला तोहि खावे।'

त्या काळात मुस्लिम राज्यकर्ते मूर्तीभंजन करण्यास प्रोत्साहन देत होते. खरा देव दगडाच्या मूर्तीत नाही हे सांगून समर्थ मूर्तीभंजनाने व्यथित होणाऱ्या हिंदूंना मानसिक दिलासा देत होते तर मूर्ती फोडली म्हणजे धर्म नष्ट केला असे समजणाऱ्यांना समर्थ वाकुल्या दाखवित होते. खरा परमेश्वर सर्वत्र व्यापून असून तोच हे सारे जग चालवित आहे असे समर्थ म्हणतात. आपल्या मराठी रचनेत सद्गुरु कृपेने आपल्याला ज्ञान झाले असे समर्थ सांगतात, मात्र मुसलमानी श्लोकांत पीराने आपल्याला हे ज्ञान दिले असे ते म्हणतात. समर्थांच्या शब्दात सांगायचे झाल्यास-

'पिरोंके पगोंसे हमें ने तलाई। अछि भात सेहि बताया ईलाई।
सुन्हो साथ भाई कहु येहि माना। कहे रामदासो अकलसे पछाना।'

माणसे स्वत:ला फार मोठं समजतात पण भगवंत सर्वात मोठा आहे हे त्याच्या लक्षात येत नाही. कोणता धर्म चांगला आणि कोणता धर्म वाईट याची चर्चा करीत बसण्यापेक्षा भक्ताने स्वत: चांगले व्हावे. सगळेच संत व्यापक विचारांचे असतात पण या मुसलमानी अष्टकात समर्थांनी व्यापकतेची परिसीमा गाठली आहे. त्यांचे हे चिंतन वाचल्यावर भगवंताच्या मागे लपून वादंग माजवणाऱ्यांचा खोटा बुरखा ध्यानात येतो.



# ग्रंथराज दासबोध

समर्थांची वाङ्मयसंपदा अफाट आहे. पण त्यामध्ये श्रीमद् दासबोधाचे स्थान सर्वात महत्त्वाचे आहे. समर्थ संप्रदायाचा तो प्रधान ग्रंथ आहे. खुद्द समर्थांनी देह ठेवताना शोक करणाऱ्या आपल्या शिष्यांना सांगितले-

'माझी काया आणि वाणी। गेली म्हणाल अंत:करणी।
परी मी आहे जगजीवनी। निरंतर।।
आत्माराम दासबोध। माझे स्वरूप स्वत: सिद्ध।
असता न करावा खेद। भक्तजनी।।
नका करू खटपट। पहा माझा ग्रंथ नीट।
जेणे सायुज्यतेची वाट। गवसेल की।।'

समर्थ रामदासांना जर जाणून घ्यायचे असेल तर त्यांचा दासबोध समजावून घ्यावा लागेल. संतांच्या जीवनातील चमत्कार गौण असतात. त्यांचा उपदेश प्रधान असतो. त्यांची खरी शिकवण त्यांच्या ग्रंथात पाहायला मिळते. समर्थ संप्रदायाची सारी शिकवण श्रीमद् दासबोधात पाहायला मिळते.

समर्थांनी दासबोधाचे लेखन शिवथर घळीत केले याबद्दल दुमत नाही. कारण त्यासंबंधीचे दिवाकर गोसावींनी १६५४ साली लिहिलेले पत्र उपलब्ध आहे. सन १६५२ ते सन १६६० ही आठ वर्षे समर्थ शिवथर घळीत राहिले होते. त्याकाळात त्यांनी दासबोध या ग्रंथाचे लेखन केले. संपूर्ण दासबोधाची प्रत १६६० साली तयार झाली की समर्थांच्या देहत्यागापर्यंत त्याचे लेखन चालूच होते याबद्दल विविध विचारप्रवाह चालूच आहेत. समर्थांनी सांगितलेली आणि कल्याणस्वामींनी लिहिलेली श्रीमद् दासबोधाची मूळ प्रत आजही डोमगाव येथे उपलब्ध आहे. पण या प्रतीवर शक लिहिलेला नसल्यामुळे ही प्रत नेमकी केव्हा तयार झाली ते सांगणे कठीण आहे. एवढे नक्की की दासबोध लेखन घडले तेव्हा समर्थ संप्रदायाचा फार मोठा विस्तार झालेला होता. समर्थांची

शिष्यसंख्या बऱ्यापैकी वाढली होती. वेगवेगळे शिष्य समर्थांना व्यावहारिक, कौटुंबिक, सामाजिक, आध्यात्मिक, राजकीय जीवनातील नाना शंका विचारीत होते. हे सारे प्रश्न संकलित करावेत आणि त्यांची उत्तरे देऊन त्यावाच एक ग्रंथ तयार करावा, म्हणजे शिष्यांची कायमची सोय होईल असे समर्थांच्या मनात आले. त्यातून हा ग्रंथ आकाराला आला. दासबोधाच्या कल्याणस्वामींच्या मूळ प्रतीच्या नकला केलेल्या अनेक प्रती आजही उपलब्ध आहेत. कल्याण स्वामींचे धाकटे बंधू दत्तात्रय गोसावी यांचा साताऱ्याजवळ शिरगावला मठ होता. शिरगाव मठात दत्तात्रेयस्वामींच्या हस्ताक्षरात लिहिलेला दासबोध उपलब्ध आहे. याखेरीज साताऱ्याजवळीलच उंब्रज मठातील केशवस्वामींनी लिहून काढलेली दासबोधाची प्रत धुळ्याच्या समर्थ वाग्देवता मंदिरात उपलब्ध आहे. या केशव स्वामींनी दासबोधाच्या अठरा नकला तयार केल्या असे सांगितले जाते.

दासबोधाचे २० दशक आहेत की २१ दशक असा वाद मधे काही मंडळींनी निर्माण केला होता. पण तो फार काळ टिकू शकला नाही. कारण २१ दशकी दासबोधाची एकही प्रत उपलब्ध नाही. नुसता २१वा दशक जो दाखवला जातो त्यातील सर्व प्रकरणे समर्थांच्या अन्य साहित्यात पाहायला मिळतात. मुख्य मुद्दा म्हणजे दासबोधाचे लेखनिक कल्याणस्वामी यांनी श्रीमद् दासबोधाच्या आरतीत- ''वीसही दशकींचा अनुभव जो पाहे। नित्य नेम विवरीता स्वये ब्रह्मची होये।।'' असे स्पष्ट म्हटले आहे. मूळ दासबोध वीस दशकी आहे यासाठी कल्याणस्वामींची आरती हे पुरेसे प्रमाण आहे. खुद्द समर्थांनी दासबोधाच्या शेवटी स्पष्टपणे म्हटले आहे की-

'वीस दशक दोनसे समास। साधके पाहावे सावकाश।
विवरता विशेषा विशेष। कळो लागे।।'

समर्थांना या ग्रंथाचे घाईगर्दीने केलेले वाचन अपेक्षित नाही. त्याचे सावकाश अध्ययनच करावे अशी त्यांची अपेक्षा आहे. नुसती ग्रंथाची स्तुतीपण करू नका असे ते बजावतात. ग्रंथ वाचा, नीट समजावून घ्या, त्यानुसार वागा आणि जीवनाचे सार्थक करा, असे ते सांगतात यावरून समर्थांची भूमिका किती शुद्ध, स्पष्ट आणि तर्कशुद्ध होती ते ध्यानात येते. म्हणून दासबोधाची फलश्रुती सांगताना 'क्रिया पालटे तत्काळ।'' असे ते म्हणतात. वागण्यात सुधारणा होणे ही खरी फलश्रुती.

श्री समर्थांनी दासबोधाच्या प्रारंभीच 'ग्रंथारंभ लक्षण' या नावाचा समास लिहिलेला आहे. हा समास म्हणजे जणू काही ग्रंथाची प्रस्तावनाच आहे. समर्थांना नेमके काय सांगायचे आहे आणि श्रोत्यांकडून त्यांची नेमकी काय

अपेक्षा आहे हे सारे त्यांनी प्रारंभीच स्पष्ट केले आहे. दासबोध हा गुरूशिष्यांचा संवाद आहे. शिष्याने प्रश्न विचारावेत आणि सद्गुरूंनी त्याचे उत्तर देऊन समाधान करावे ही प्राचीन भारतीय परंपरा आहे. आपले बहुसंख्य ग्रंथ गुरू-शिष्य संवादात्मकच आहेत. कठोपनिषद् हा यमराज आणि नचिकेता यांचा संवाद आहे तर भगवत्गीता हा कृष्णार्जुन संवाद आहे. जिज्ञासा निर्माण होणे हा मानवी स्वभाव आहे. समर्थांनी शिष्यांची तळमळ जाणून त्यांना मार्गदर्शन केले आहे.

दासबोध या ग्रंथाचे खास वैशिष्ट्य म्हणजे इथे प्रश्न विचारणारा शिष्य एकच नाही. अनेक शिष्यांनी विविध प्रश्न विचारले आहेत. मात्र उत्तर देणारा गुरू एकच आहे. शिवाय सगळे शिष्य एकाच दर्जाचे नाहीत. काही शिष्य ब्रह्मचारी आहेत तर काही प्रापंचिक आहेत. कोणी गरीब आहे तर कुणी श्रीमंत आहे. एखादा धोंडीबा धनगर तर एखादा वासुदेव शास्त्र्यांसारखा पंडीत. सर्व जातीच्या, सर्व धर्माच्या तसेच सर्व स्तरावरील लोकांसाठी समर्थांनी हा ग्रंथ लिहिला. त्यामुळे दासबोध हा एक सर्वसंग्राहक, सर्वसमावेशक असा मौलिक ग्रंथ झाला आहे. प्रत्येक प्रकृती धर्माच्या माणसाला त्यातून काही न काही मिळतेच. समर्थांनी सर्वसामान्य माणसाचे भौतिक आणि आध्यात्मिक जीवन यशस्वी कसे होईल याचा बारकाईने केलेला विचार या ग्रंथात आढळतो. दशक म्हणजे प्रकरण आणि समास म्हणजे उपप्रकरण. वीस दशक म्हणजे वीस मुख्य प्रकरणे आणि दोनशे समास म्हणजे दोनशे उपप्रकरणे असे या ग्रंथाचे स्वरूप आहे. प्रपंचाच्या पहिल्या इयत्तेपासून अद्वैत वेदांताच्या अंतिम इयत्तेपर्यंत मानवी जीवनाचा सारा अभ्यासक्रम या एका ग्रंथात पाहायला मिळतो.

## आधी माणूस व्हा, मग आध्यात्मिक व्हा

श्रीमद् दासबोधामधे जे दोनशे समास आहेत त्यापैकी ४० समास केवळ लक्षणांचे आहेत. भगवत् गीतेत ज्याप्रमाणे १६ व्या अध्यायात दैवी संपत्ती आणि आसुरी संपत्ती यांची लक्षणे सांगितली आहेत. त्याप्रमाणे दासबोधातील लक्षणांच्या ४० समासापैकी ३० समास दैवी संपत्तीचे आहेत. तर १० समास आसुरी संपत्तीचे आहेत. उत्तम लक्षण, भक्त निरूपण, सत्त्वगुण लक्षण, विरक्त लक्षण, चातुर्य लक्षण, महंत लक्षण, निस्पृह लक्षण, उत्तम पुरूष निरूपण, सदेव लक्षण या विविध समासात दैवी संपत्तीची लक्षणं आढळतात तर मूर्ख लक्षण, पढतमूर्ख लक्षण, करंट लक्षण, कुविद्या लक्षण, रजोगुण आणि तमोगुण लक्षण या समासात असुरी संपत्तीचे विवेचन आहे. ७७५१ ओव्या असलेल्या श्रीमद्

दासबोधातील १/५ भाग केवळ लक्षणांनी युक्त असावा हे आश्चर्य नव्हे काय? या पाठीमागे प्रयोजन काय? सद्‌गुणांची आणि दुर्गुणांची एवढी चर्चा कशासाठी? हे सारे समजावून घेतले पाहिजे.

माणूस बदलू शकतो हा समर्थांचा ठाम सिद्धांत होता. श्रीमद् दासबोधात ते म्हणतात-

'अवगुण सोडिता जाती। उत्तम गुण अभ्यासिता येती।
कुविद्या सांडून सिकती। शहाणे विद्या।।
मुर्खपण सोडता जाते। शहाणपण सिकता येते।
कारभार करिता उमगते। सकळ काही।।'

याचा अर्थ माणसाने मनावर घेतले तर त्याला स्वत:च्या स्वभावात हवा तसा बदल घडवून आणता येतो. वर्षानुवर्षे परमार्थात राहून आपले दोष न टाकणाऱ्या मंडळींनी परमार्थाला कमीपणा आणला आहे. डॉ. राधाकृष्णन म्हणत- ''विमानाच्या साहाय्याने माणूस पक्ष्याप्रमाणे आकाशात संचार करायला शिकला. जहाजाच्या साहाय्याने पाण्यात जलचराप्रमाणे फिरू लागला. पण अजून जमिनीवर त्याला माणसासारखे वागता येत नाही.'' म्हणून बहिणाबाईंनी प्रश्न विचारला- ''अरे माणसा माणसा! कधी होणार माणूस.'' ही सारी लक्षणे आपले अंतरंग सजवण्यासाठी आहे. अध्यात्माच्या लंब्याचौड्या गप्पा मारण्यापूर्वी माणसाने आधी स्वत:ला घडवावे; मनुष्यच आपल्या जीवनाचा शिल्पकार आहे हे त्याने लक्षात ठेवावे. आत्मपरिक्षण करून आपण आपले दोष ओळखावेत आणि प्रयत्नपूर्वक त्याचा त्याग करावा. तसेच आत्मपरिक्षणाने आपले गुण ओळखून देश, देव आणि धर्म यांच्या रक्षणासाठी त्याचा वापर करावा यासाठी ही लक्षणे आहेत.

ईश्वर प्राप्तीसाठी माणसे नाना प्रकारची व्रतवैकल्ये करतात. कांदा खाणार नाही, जेवताना बोलणार नाही अशा प्रकारचे नाना नियम पाळतात. उपास-तापास, तिर्थाटण वगैरे करतात. पण आपला स्वभाव बदलायला तयार होत नाहीत. समर्थांच्या मते आत्मपरिक्षणाद्वारे स्वत:ला बदलणे हीच खरी साधना होय. साईबाबाची उपासना करायची आणि नोकरीत भ्रष्टाचार करायचा, सज्जनगड आणि पंढरपूरची वारी करायची आणि धंद्यातील लबाडी चालू ठेवायची यामुळे परमार्थ कानकोंडा होतो. दांभिक आस्तिक माणसापेक्षा प्रामाणिक नास्तिक मनुष्य भगवंताच्या जास्त जवळ असतो. वस्तुत: स्वत:मध्ये असा बदल घडवून आणणे हेच सर्वश्रेष्ठ साधन आहे. म्हणून समर्थांनी मूर्ख लक्षणे सांगितली. आपल्या दोषांमुळेच आपल्या वाट्याला दु:ख येते. पण मनुष्य

आपल्या दु:खास किंवा अपयशास दुसऱ्या कोणाला तरी जबाबदार धरतो. समर्थ म्हणतात-

'येथे बोल नाही जनासी। हे अवघे आपणाचपासी।
सिकवावे आपुल्या मनासी। क्षणक्षणा।।
उत्तम गुण स्वये घ्यावे। घेऊन जनास सिकवावे।
वर्तल्याविण बोलावे। ते शब्द मिथ्या।।
हे सकळ गुणासी गती। सगुण भाग्यश्री भोगती।
अवगुणास दरिद्र प्राप्ती। यदर्थी संशयो नाही।।
शरीर परोपकारी लावावे। बहुतांच्या कार्यास यावे।
उणे पडो नेदावे। कोणी येकासी।।
उत्तम पदार्थ दुसऱ्यास द्यावा। शब्द निवडून बोलावा।
सावधपणे करीत जावा। संसार आपुला।।'

समर्थांचा विलक्षण भर सद्‌गुण संवर्धनावरती आहे. ज्या माणसामध्ये गुण अथवा कला असते त्याला लोकसंग्रह करता येतो. समर्थांना वैयक्तिक मोक्षासाठी केवळ माळा ओढणारे, ध्यान लावणारे साधक नको होते. काळाचे भान असणारे संग्राम शूर साधक त्यांना हवे होते. त्यासाठी त्यांना सद्‌गुणांची आराधना अपेक्षित होती. समर्थ प्रयत्नवादाची कास धरतात ते यासाठी. ते म्हणतात-

'आपुल्या पुरूषार्थ वैभवे। बहुतास सुखी करावे।
परंतु कष्टी करावे। हे राक्षसी क्रिया।।
घालून अकलेचा पवाड। व्हावे ब्रह्मांडाहून जाड।
तेथे कैचे आणले द्वाड। करंटपण।।
रेखा तितुकी पुसून जाते। हे तो प्रत्ययास येते।
डोळे झाकणी करावी ते। काय निमित्ते।।'

माणसाने जो भविष्य सांगतो त्याच्याकडे जाण्यापेक्षा जो भविष्य घडवतो त्याच्याकडे जावे. प्रयत्नाच्या साहाय्याने प्रारब्धावर मात कशी करावी ते दासबोध आपल्याला शिकवतो.

## समर्थांचा त्रिगुण विचार

श्रीमद् दासबोधात दुसऱ्या दशकात सत्त्वगुण, रजोगुण आणि तमोगुण याचे विवेचन केलेले आहे. भगवंताने निर्माण केलेली सृष्टी त्रिगुणात्मक आहे. थोडे मानवी जीवनाकडे पाहिले तर लक्षात येईल की इथे बालपण आहे, तारुण्य आहे

आणि वार्धक्य आहे. बालपण हे सत्त्वगुणात्मक आहे, तारुण्य रजोगुणात्मक आहे तर वार्धक्य तमोगुणात्मक आहे. वर्षाचे तीन ऋतु आहेत. हिवाळा सत्त्वगुणाचे, पावसाळा रजोगुणाचे तर उन्हाळा तमोगुणाचे लक्षण आहे. आधुनिक वैज्ञानिकांनासुद्धा अणुचे विच्छेदन केले तेव्हा इलेक्ट्रॉन, न्यूट्रॉन आणि प्रोटॉन हे तीन घटक आढळले. रजोगुणी मनुष्य क्रियाशील असतो तर तमोगुणी मनुष्य स्थितीशील असतो. गप्प बसवत नाही हा रजोगुण. तर जागचा हालत नाही हा तमोगुण. सत्त्वगुणी माणसाला स्थितीशिलता आणि क्रियाशिलता यांचे संतुलन साधलेले असते. केव्हा गप्प बसायचे आणि केव्हा कार्य करायचे याचे भान त्याला असते. मी पारमार्थिक व्हायचे याचा अर्थ मी सत्त्वगुणी व्हायचे. माझ्यातील राजसिक आणि तामसिक प्रवृत्ती हळूहळू नाहीशा व्हाव्यात आणि सत्त्वगुण हा माझा स्वभाव व्हावा. समर्थांनी त्रिगुणांखेरीज शुद्ध रजोगुण हा एक प्रकार सांगितला एवढेच नव्हे तर शुद्ध रजोगुणाचा पुरस्कार केला. अनेकदा राष्ट्रहितासाठी अथवा लोककल्याणासाठी माणसाने क्रियाशील असणे आवश्यक असते. स्वा. सावरकर, लो. टिळक, वासुदेव बळवंत फडके वगैरे देशभक्त कमालीचे क्रियाशील होते. पण ते पूर्णपणे निःस्वार्थ होते म्हणून त्यांच्या रजोगुणाला शुद्ध रजोगुण म्हणता येईल. समर्थांनी आपल्या महंताला शुद्ध रजोगुणाचा पुरस्कार करून प्रचार कार्यास लावले. त्यामुळे समर्थ संप्रदाय भारतभर पसरला. ११०० मठ, १४०० महंत आणि शंभराहून अधिक कीर्तनकार समर्थांनी तयार केले. आपल्या महंतांना उपदेश करताना समर्थ म्हणतात-

'जितुके काही आपणासी ठावे। तितुके हळूहळू सिकवावे।
शहाणे करून सोडावे। बहुत जन।।
शहाणे करावे जन। पतीत करावे पावन।
सृष्टिमध्ये भगवद् भजन। वाढवावे।।
महंते महंत करावे। युक्ती बुद्धीने भरावे।
जाणते करूनी विखरावे। नाना देसी।।'

ज्ञानी माणसाने फक्त स्वतःचा विचार न करता अवघ्या मानवजातीचा विचार करावा. त्याकाळी अध्यात्माच्या नावासाठी लोक अत्यंत आळशी बनले होते. समर्थांनी त्यांना अभ्यासाला लावले. ''दिसामाजी काहीतरी ते लिहावे। प्रसंगी अखंडीत वाचीत जावे।'' अशी त्यांची महंतांना आज्ञा होती. ज्याला धर्माचा प्रचार करायचा आहे त्याने कोणकोणते गुण आत्मसात करावे हे सांगताना समर्थ रामाला प्रार्थना करतात-

'कोमळ वाचा दे रे राम। प्रसंग ओळखी दे रे राम।।
विद्या वैभव दे रे राम। बहुजन मैत्री दे रे राम।।
संगीत गायन दे रे राम। आलाप गोडी दे रे राम।।
जाड कथा मज दे रे राम। नृत्यकला मज दे रे राम।।
प्रबंध सरळी दे रे राम। शब्दमनोहर दे रे राम।।
बहुत पाठांतर दे रे राम। अर्थारोहण दे रे राम।।'

हे सारे मागणे कीर्तनकार प्रवचनकार यांच्यासाठी आहे. सद्विचारांचा प्रसार ही आजसुद्धा काळाची गरज नाही का? आपली प्रसार माध्यमे किंवा वृत्तपत्रे दुर्गुणांचे प्रचारक झाले आहेत. अशावेळी सज्जन माणसांनी शुद्ध रजोगुणाची कास धरून समाजामध्ये सात्विक जीवनमूल्ये रूजवायची असतात.

## व्यवस्थापन आणि व्यक्तिमत्त्व विकास

हल्ली जगभर व्यक्तिमत्त्व विकासाची अथवा व्यवस्थापनाचे प्रशिक्षण देणारी शिबिरे होतात. या शिबिरात जे काही सांगितले जाते ते सारे समर्थांनी या लक्षणांच्या समासात सांगितले आहे. सभ्यता आणि शिष्टाचार (Manners & eticates) यांचे महत्त्व सामाजिक जीवनात वाढत चालले आहे. अशावेळी समर्थांनी मोठमोठ्यांने हसणे, खिदळणे, अधाशाप्रमाणे भोजन करणे, अनेक लोक बसले असताना आपण झोपून राहणे, मोठ्या माणसांच्या ओळखी सांगून बडेजाव मिरवणे, रस्त्याने खात खात जाणे, फाजील अंगविक्षेप करणे, मुखदुर्बल असणे, नको तिथे बडबड करणे, आमंत्रण नसताना समारंभात जाणे ही सारी मूर्खाची लक्षण सांगितली आहेत. आजच्या व्यावहारिक जगतात याला फार महत्त्व आहे.

कसे बोलावे आणि कसे बोलू नये याच्या सुमारे ५०० ओव्या दासबोधात आढळतील. अंतरात्म्याशी संवाद साधायचा असल्यास मौनाचे माध्यम लागते. पण समाजाशी संवाद साधायचा असल्यास शब्दांचा आधार घ्यावा लागतो. पंडीत दीनदयाल उपाध्याय म्हणत असत- 'ज्याला लोकसंग्रह करायचा आहे त्याच्या डोक्यावर बर्फाची लादी, जीभेवर खडीसाखर आणि पायाला भिंगरी असली पाहिजे.' म्हणून समर्थांनी आपल्या शिष्यांना सतत प्रवास करायला सांगितले. बोलण्याबद्दल समर्थ म्हणतात-

'नेमकचि बोलावे। तत्काळचि प्रतिवचन द्यावे।
कदापि रागास न यावे। क्षमारूप।।
जीव जीवात घालावा। आत्मा आत्म्यात मिसळावा।

राह राहो शोध घ्यावा। परांतराचा।।
जे दुसऱ्यास दु:ख करी। ते अपवित्र वैखरी।
आपुलाच घात करी। कोणी एके प्रसंगी।।
बरे बोलता सुख वाटते। हे तो प्रत्ययास येते।
तरी मग कर्कश बोलावे ते। काय निमित्त्य।।'

व्यक्तिमत्त्व विकासात बोलणे हा फार महत्त्वाचा घटक आहे. शब्दाचे शस्त्र फार जपून वापरावे लागते.

समर्थांच्या व्यवस्थापन शास्त्राची चर्चा तर सध्या जगभर चालू आहे. फेडरीक टेलर, पिटर डकर, ब्राऊन इमरसन या विदेशी मंडळींनी व्यवस्थापन शास्त्राचे जे सिद्धांत सांगितले ते सारे सिद्धांत सूत्ररूपाने दासबोधात येऊन गेले आहेत. मध्यंतरी रशियात कॅलिग्रॉफीची जागतिक परिषद झाली होती. ती परिषद महाराष्ट्रातील श्री. अच्युत पालव नावाच्या तरुण मुलाने गाजवली. त्याने उत्तम हस्ताक्षरासंबंधीचा समर्थांचा समास वाचून दाखवला आणि समर्थ सुलेखन शास्त्राचे जनक होते असे सांगितले. आजचे व्यवस्थापन परिणामाचा विचार करणारे (Result Oriented) आहे. कार्याचे पुनर्मुल्यांकन कार्यपद्धतीत सुधारणा याला फार महत्त्व आहे. समर्थांनी यासंबंधी खूप मार्गदर्शन केले आहे. मंदीर कसे असावे याबद्दलचे त्यांचे विवेचन वाचले म्हणजे एखादा कारखाना चालवण्यासाठी जी काळजी घ्यावी लागते त्याचा परामर्शच जणू समर्थ घेतात. अलिकडे वेळेचे व्यवस्थापन (Time Management) फार महत्त्वाचे समजले जाते. समर्थांनी दासबोधात दोन ठिकाणी आदर्श दिनचर्येचे मार्गदर्शन केले आहे. ''ऐक सदेव पणाचे लक्षण। रिकामा जावो नेदी येक क्षण।'' हे समर्थांचे सूत्र वेळेच्या व्यवस्थापनाचा आत्मा आहे.

संघटन आणि अनुशासन हे आजच्या युगाचे परवलीचे शब्द आहेत. समर्थांनी स्वत: शिस्तबद्ध संघटना उभी करून एक मानदंडच प्रस्थापित केला आहे. आजच्या लोकशाही पद्धतीत आंदोलन, संप, जाळपोळ या शस्त्रांमुळे गुंड लोकांना उपद्रव मूल्य (nuisance value) प्राप्त झाले आहे. दुर्जनांची ही ताकद लक्षात घेऊन समर्थ म्हणतात-

'दुर्जन प्राणी ओळखावे। परि ते प्रगट न करावे।
सज्जनापरीस आळवावे। महत्त्व देऊनी।।
जनामध्ये दुर्जन प्रगट। तरी मग अखंड कटकट।
या कारणे ती वाट। बुझवून टाकावी।।'

नियोजन (Planning), मालक-नोकर संबंध, अधिकार परत्वे कामाचे

वाटप, नेतृत्व, कार्यक्षमता, जाहिरात, अखंड सावधानता, गुप्तता ह्या व्यवस्थापकीय मूल्यांचे सुंदर विवेचन दासबोधात जागोजागी आढळते.

## प्रपंच परमार्थ समन्वय

समर्थांनी रजोगुणाचे शुद्ध आणि शबळ असे दोन प्रकार सांगितले. आपण यापूर्वी पाहिले की देशभक्तांचा रजोगुण शुद्ध स्वरूपाचा असून परमार्थाला पूरक आहे. म्हणून समर्थांनी त्याचे समर्थन केले. शबळ रजोगुण हा प्रापंचिक स्वरूपाचा असून परमार्थाला विशेष पूरक नाही. तरी देखील समर्थांनी शबळ रजोगुणाची देखील शिफारस केली. समर्थांच्या समोर सर्वसामान्य प्रापंचिक मनुष्य आहे त्याच्या भौतिक गरजा पूर्ण झाल्याशिवाय तो परमार्थाकडे वळणारच नाही. उपाशी पोटी परमार्थ होऊ शकत नाही. जगातली सगळी माणसे नैष्ठिक ब्रह्मचर्याचे पालन करू शकणार नाहीत ही वास्तवता समर्थांनी लक्षात घेतली. आपल्या धर्मात १) धर्म २) अर्थ ३) काम ४) मोक्ष असे चार पुरुषार्थ सांगितले आहेत. परमार्थाचा संबंध मोक्ष या पुरुषार्थाशी असला तरी अर्थ आणि काम तृप्त झाल्याखेरीज मनुष्य मोक्षाचा अधिकारी होऊ शकत नाही. प्रापंचिक गरजा पूर्ण झाल्या म्हणजे मग तो भगवंताचे चिंतन करू शकतो. समर्थांच्या काळात यावनी सत्तेमुळे समाज भिकेला लागला होता. सर्वत्र दारिद्र्याचे सामर्थ्य पसरले होते अशा परिस्थितीत भाकरीची भ्रांत असताना वेदांत सांगणे धादांत खोटे ठरेल हे समर्थांच्या ध्यानात आले. भारतभ्रमण करीत असताना त्यांनी जनसामान्यांचे उध्वस्त संसार पाहिले. आणि त्यांनी प्रपंच परमार्थ समन्वयाचा मार्ग सांगितला. श्रीमद् दासबोधात समर्थ म्हणतात-

'आधी प्रपंच करावा नेटका। मग घ्यावे परमार्थ विवेका।
येथे आळस करू नका। विवेकी हो।।
प्रपंच सांडून परमार्थ केला। तरी अन्न मिळेना खायला।
मग तया करंट्याला। परमार्थ कैंचा।।
प्रपंच करावा नेमक। पाहावा परमार्थ विवेक।
जेणे करता उभय लोक। संतुष्ट होती।।
प्रपंच सुखेनैव करावा। परि काही परमार्थ वाढवावा।
परमार्थ अवघाची बुडवावा। हे बरे नव्हे।।
प्रपंची जो सावधान। तोच परमार्थ करील जाण।
प्रपंची जो अप्रमाण। तो परमार्थी खोटा।।'

मूळात समर्थ अजातवादी होते. दृष्य जगत् झालेच नाही अशी त्यांची

धारणा होती. पण सामान्य माणसाला जर दृष्य जगत् खरं वाटत असेल आणि त्याची सारी सुख-दु:खें दृष्य जगताशी निगडीत असतील तर त्याचा बुद्धीभेद करून चालणार नाही हा विवेक समर्थांना होता. एवढेच नव्हे तर प्रपंच कटकटीचा आहे म्हणून जे लोक पळून जाऊन साधू होत होते त्यांचीसुद्धा समर्थांनी खरडपट्टी काढली. पलायनवादाची लाट थोपवून त्यांनी माणसांचे संसार उभे केले.

आदर्श कुटुंबसंस्था हा समर्थांच्या चिंतनाचा विषय होता. आदर्श मुले निर्माण व्हायची असतील तर आधी आदर्श गृहस्थाश्रम असला पाहिजे. आज शहरात हळूहळू कुटुंबसंस्थेचा ऱ्हास होत चालला आहे. वृद्धाश्रमांची वाढती संख्या, पाळणाघरांची गरज, घटस्फोटांचे वाढते प्रमाण या सर्व गोष्टी आज चिंताजनक ठरत आहेत. त्या पार्श्वभूमीवरती समर्थांची आदर्श गृहस्थाश्रमाची कल्पना खूपच महत्त्वाची मानावी लागेल. आदर्श कुटुंबाचे वर्णन करताना समर्थ म्हणतात-

'मनासारिखी सुंदरा ते अनन्या। मनासारिखे पुत्र जामात कन्या।
सदा सर्वदा बोलती रम्य वाचा। जनी जाणिजे योग हा सुकृताचा।।
भली मायबापे भले मित्र बंधू। सखे सोयरे राखती स्नेहवादु।
सुना लेकुरे येक मेळा सुखाचा। जनी जाणिजे योग हा सुकृताचा।।'

समर्थांना दरिद्री माणसाचा रडका प्रपंच मान्य नव्हता. दारिद्र्य आले तर माणसाने त्याला तोंड द्यावे. पण आयुष्यभर दरिद्री राहण्यात कृतार्थता मानू नये. नेटक्या प्रपंचासाठी ''प्रपंची पाहिजे सुवर्ण'' असे ते म्हणतात. ''उत्कट भव्य तितुके घ्यावे। मिळमिळीत अवघेची टाकावे। निस्पृहपणे विख्यात व्हावे। भूमंडळी।।'' हाच त्यांचा संदेश होता. निस्पृह माणसाने दरिद्रीच असले पाहिजे असे नाही. त्यासाठी समर्थ जनकाचे उदाहरण देतात. जनक निस्पृह असले तरी विरक्त होते. प्रभु रामचंद्र वनवासात वल्कले परिधान करीत. पण अयोध्येत महालात राहताना ते उंची वस्त्रे परिधान करीत. समर्थ प्रयत्नवादाचे पुरस्कर्ते असल्यामुळे 'जितका व्याप तितके वैभव' असे सूत्र ते सांगतात. पुरूषार्थी माणसाने राष्ट्रीय संपत्तीत भर घालावी अशी त्यांची धारणा होती. समर्थांनी नुसता गृहस्थाश्रमाचा पुरस्कार केला नाही तर गृहस्थाश्रमी माणसासमोर त्यांनी आदर्श दिनक्रम ठेवला. श्रीमद् दासबोधात आदर्श दिनचर्येचे दोन समास येऊन जातात. गृहस्थाश्रम म्हणजे उपभोगाचा परवाना नव्हे. तो आश्रम आहे, क्लब नव्हे. समर्थांच्या मते- १) गृहस्थाश्रमी माणसाने सकाळी लवकर उठावे. २) त्याने सकाळच्या नीरव शांततेत भगवंताचे चिंतन करावे. स्नान, संध्या, पूजा, ध्यान

याद्वारे त्याने प्रथम मन सुसंस्कृत करावे. ३) गृहस्थाने कामावर जाताना न्याहरी करून जावे हे सांगायला समर्थ विसरत नाहीत. ४) आपले विहीत कर्म ईश्वराची उपासना समजून मनापासून करावे. ५) गृहस्थाने दुश्चित्त कदापि नसावे. काम करताना चूक होणे, हातातून वस्तू पडणे, मन एकाग्र नसणे, एखाद्या कामाचे विस्मरण होणे. वस्तूंची आदळ-आपट घडणे, ही सर्व लक्षणे गृहस्थाश्रमी मनुष्य परमार्थ नीट करत नसल्याची आहेत. ६) व्यवसायात केवळ स्वार्थ बुद्धी न ठेवता सेवाभाव असावा. ७) सर्वांशी गोड बोलून इतरांना त्यांचे संसार उभे करण्यात मदत करावी. ८) दिवसातून थोडा वेळ रामायण, महाभारत यांच्यासारख्या ग्रंथांचे शांतपणे अध्ययन करावे.

प्रपंच नीट करता येत नाही म्हणून परमार्थाच्या मागे दडू नये. जे लोक फुकटचे खायला मिळेल म्हणून बुवा किंवा महाराज होत होते, त्यांना समर्थ खडसावून विचारतात

'अन्न पाहिजे स्त्रियेला। अन्न पाहिजे लेकुराला।
अन्न पाहिजे कुटुंबाला। मग कष्ट करूनी मिळवावे।।
का जोगी होऊन जावे?
द्रव्य पाहिजे वस्त्राला। द्रव्य पाहिजे घराला।
द्रव्य पाहिजे प्रपंचाला। मग कष्ट करूनी मिळवावे।।
का जोगी होऊन जावे?'

अनेकदा नाईलाजास्तव परमार्थात पडलेली माणसे अनाचारी बनतात. भाविक आणि भावनाप्रधान स्त्रियांकडे ते पापबुद्धीने पाहात राहतात. यातूनच बुवाबाजी, दांभिकता, शोषण या सर्वांना प्रोत्साहन मिळते. समर्थांना ते अजिबात मान्य नव्हते.

## दासबोधातील नवविधा भक्ती

समर्थांनी दासबोधाच्या प्रस्तावनेत सांगितले-
'भक्तिचेन योगे देव। निश्चये पावती मानव।
ऐसा आहे अभिप्राव। इये ग्रंथी।।'

समर्थ संत असल्यामुळे ज्ञानेश्वर महाराजांपासून चालत आलेल्या भक्ती मार्गाचे ते पुरस्कर्ते होते. श्रीमद् भागवतातील नवविधा भक्तीचा श्लोक आधाराला घेऊन समर्थांनी चौथ्या दशकात नवविधा भजन सांगितले. याखेरीज श्रीमत् दासबोधात अधून मधून भक्तीची चर्चा आलेली आहे. महर्षि नारदांनी भक्तीसूत्रात भगवंताबद्दलच्या परमप्रेमाला भक्ती असे म्हणले आहे. भगवंताबद्दल

अशा प्रकारचे प्रेम कसे निर्माण व्हावे? मनुष्य हा स्वभावत: प्रेमळ आहे. त्याचा जन्म प्रेमातूनच झालेला आहे. कुटुंबसंस्था हा प्रेमाचाच परिपाक आहे. कुटुंबात आई आणि मुलगा, पती आणि पत्नी, बहीण-भाऊ असे विविध प्रेमाचे पदर आपल्याला पाहायला मिळतात. वाल्मीकि रामायणात राम-भरताचे बंधू प्रेम, दशरथांचा रामाबद्दलचा वात्सल्य भाव, सीतेचा रामाविषयीचा मधुरा भाव, शबरी आणि हनुमान यांचा दास्यभाव ही सारी उत्कट प्रेमाची भावोदात्त उदाहरणं आहेत. गृहस्थाश्रमी मनुष्य अशा प्रकारे प्रेमाद्वारे भगवंताकडे पोहोचू शकतो. जे प्रेम दृष्य जगतातील व्यक्ती अथवा वस्तूवर असते तेच प्रेम भगवंताकडे रूपांतरीत झाले म्हणजे त्याला भक्ती म्हणतात. नातलगांचे आपसातील प्रेम वासनामय असल्यामुळे आणि त्यात अपेक्षा असल्यामुळे त्याला भक्ती म्हणता येत नाही. समर्थांच्या मते असे प्रेम फक्त सद्‌गुरूवर किंवा भगवंतावर करता येते. नवविधा भक्ती हा प्रेमवृद्धीचा राजमार्ग आहे.

सतत भगवंताबद्दल ऐकत राहणे (श्रवण भक्ती), सतत भगवंताबद्दल बोलत राहणे (कीर्तनभक्ती), सतत त्याचेच चिंतन करत राहणे (नामस्मरण), जो त्या भगवत्‌भक्तीत रंगून गेलेला आहे त्याच्या चरणाजवळ बसून त्याची सेवा करणे (पादसेवन), भगवंताची मनोभावे पूजा करणे (अर्चन), भगवंताला श्रद्धापूर्वक नमस्कार करणे (वंदन), सद्‌गुरूंच्या मठात किंवा मंदिरात सेवा-भावाने देह झिजवणे (दास्य), भगवंत आपले भावविश्व होणे (सख्य), आणि अखेर आपणच भगवत् स्वरूप होणे (आत्मनिवेदन) हे ते नऊ टप्पे होत.

### श्रवण आणि कीर्तन

श्रवणसाधना ही नवविधा भक्तीची सुरुवात आहे. तुमच्या कानावर सर्वप्रथम काय पडते याला फार महत्त्व आहे. लहान मुले ज्या वातावरणात वाढतात तसे संस्कार त्यांच्यावर होतात. प्रारंभीच जर साधकाने सत्पुरुषांचे प्रवचन किंवा कीर्तन ऐकले तर त्याची पारमार्थिक धारणा पारदर्शी राहते. त्याच्या मनात आध्यात्मिक संकल्पनांबद्दल थोडाही वैचारिक गोंधळ राहत नाही. समर्थ तर श्रवणाला खूप महत्त्व देतात. श्रीमद् दासबोधात श्रवणभक्तिचे सहा समास आहेत. कीर्तनभक्तिचे पाच समास आहेत. याचा अर्थ श्रवण आणि कीर्तनभक्तिला समर्थ सर्वात जास्त महत्त्व देतात. सांगणारा म्हणजे सद्‌गुरू आणि ऐकणारा म्हणजे सत्‌शिष्य. ऐकणाऱ्याचा कान तयार असावा लागतो तर बोलणाऱ्याची वाणी तयार असावी लागते. संपूर्ण दासबोध हा गुरूशिष्य संवाद आहे. समर्थांनी श्रोता आणि वक्ता यांची फार मोठी आचारसंहिता या दोन

भक्तीप्रकारात सांगितली आहे.

श्रवण मनापासून केले पाहिजे. केवळ एकदा ऐकून भागत नाही. समर्थ म्हणतात-

'जेथे नाही नित्य श्रवण। ते जाणावे विलक्षण।
तेथे साधके येक क्षण। क्रमू नये सर्वथा।।
जेथे नाही श्रवणस्वार्थ। तेथे कैंचा हो परमार्थ।
मागे केले तितुके वेर्थ। श्रवणेविण होये।।
सेविलेच सेवावे अन्न। घेतलेचि घ्यावे जीवन।
तैसे श्रवण मनन। केलेचि करावे।।'

ज्याप्रमाणे शरीराला अन्नाची गरज आहे त्याप्रमाणे मनाचे वैचारिक पोषण होण्यासाठी सद्विचारांचे सेवन घडायला हवे. केवळ ऐकत राहणे पुरेसे नाही. जो वर्षानुवर्षे ऐकत राहतो; पण त्यानुसार आचरण करीत नाही त्याला समर्थ पढतमूर्ख म्हणतात. श्रवण करताना साधकाने 'आपण कशासाठी श्रवण करतो' हा प्रश्न स्वतःच्या मनाला विचारावा. आज विज्ञानाने दूरदर्शन, सीडी, कॅसेट याद्वारे श्रवणाची भरपूर साधने आपल्या हाती दिलेली आहेत. श्रवणाची एवढी उत्तम सोय पृथ्वीच्या पाठीवर पूर्वी कधीच नव्हती. पण आज करमणूक म्हणून किंवा सवय म्हणून माणसे नुसत ऐकत राहतात. काहीजण माहिती गोळा करणे आणि लोकांना सांगत राहणे या मर्यादित हेतूने श्रवण करतात. ज्या हेतूने तुम्ही श्रवण कराल तेवढे फळ पदरात पडेल. प्रवचनकार होणे ही काही दासबोधाची खरी फलश्रुती नव्हे. समर्थांना मोक्षापेक्षा किंवा भगवत् प्राप्तीपेक्षा खालच्या दर्जाची फलश्रुती मान्यच नाही. 'मोक्षेविण फलश्रुती। ती दुराशेची पोथी।' असे ते परखडपणे म्हणतात. त्यांच्या मते कोणत्या पुस्तकाला ग्रंथ म्हणायचे ते पाहा-

'जेणे परमार्थ वाढे। आंगी अनुताप चढे।
भक्तीसाधन आवडे। त्या नाव ग्रंथ।।
जेणे होये उपरती। अवगुण पालटती।
जेणे चुके अधोगती। त्या नाव ग्रंथ।।
जेणे धारिष्ट चढे। जेणे परोपकार घडे।
जेणे विषय वासना मोडे। त्या नाव ग्रंथ।।
जेणे परत्रसाधन। जेणे ग्रंथे होय ज्ञान।
जेणे होईजे पावन। त्या नाव ग्रंथ।।'

ज्याच्या मनात काही वासना आहेत असा माणूस श्रवण करून

ईश्वरप्राप्तीऐवजी मधेच कुठल्यातरी प्रलोभनाला बळी पडतो आणि भगवंताला मुकतो. म्हणून प्रवचन मनापासून ऐकावे (effective listening) समर्थांच्या मते- १) कीर्तनाला अथवा प्रवचनाला वेळेवर पोहोचावे. २) श्रवण करताना आपले मन इतस्तत: भटकू न देता वक्त्याच्या विषयावर केंद्रित करावे. ३) ऐकताना झोप किंवा कंटाळा येऊ नये. वक्त्याचे मुद्दे नीट समजावून घ्यावेत. ४) श्रवणापूर्वी खूप भोजन करू नये अथवा खूप पाणी पिऊ नये. म्हणजे देहधर्माची आठवण होणार नाही. आणि मन एकाग्र व्हायला मदत होईल. ५) मंदिरात अथवा सभागृहात श्रोत्यांना डास, ढेकूण, पिसवा यांचा उपद्रव होणार नाही याची काळजी आयोजकांनी घ्यावी. ६) काही मुद्दे न पटले तर पुन्हा श्रवणाला जाऊ नये पण तिथेच बसून वक्त्याशी वादंग घालू नये. ७) ज्याच्या मुखातून ऐकणार आहोत त्याच्याबद्दल मनात पूर्वग्रह नसावा. ८) श्रवण करताना डोळ्यांना सांप्रदायिक कट्टरतेची झापडे नसावीत. आपल्या साधनेला पूरक असे विचार जिथून कुठून मिळतील ते उदार मनाने स्वीकारावेत. सांप्रदायिक कट्टरतेमुळे भगवंताविषयी प्रेम वाढण्याऐवजी इतर संप्रदायांबद्दल द्वेष निर्माण होत राहतो.

साधकाने श्रवण करताना आपल्या देहापासून विचलित होऊ नये यासाठी गुरूमुख श्रवण करावे. ज्या माणसाच्या जीवनात कुठेही अध्यात्म दिसत नाही, फक्त बुद्धीचा विकास आणि भाषेचा फुलोरा दिसतो अशी प्रवचने किंवा कीर्तने ऐकून जीवनात कधीही परिवर्तन घडणार नाही. अनेकदा व्यावसायिक वक्ता आपल्या प्रतिभेच्या बळावर श्रोत्यांचा बुद्धीभेद करू शकतो. त्यामुळे साधनेत खंड पडू शकतो किंवा आपण स्वीकारलेले साधन बरोबर आहे की नाही असा संदेह निर्माण होऊ शकतो. समर्थ म्हणतात-

'येक वक्तृत्व श्रवणी पडे। तेणे जाले समाधान मोडे।
केला निश्चय विघडे। अकस्मात।।
ते वक्तृत्व त्यागावे। जे माईक स्वभावे।
जेथे निश्चयाच्या नावे। सुन्याकार।।
येक्या ग्रंथे निश्चय केला। तो दुजयाने उडविला।
तेणे संशयोचि वाढला। जन्मवरी।।
जेथे संशय तुटती। होये आशंकानिवृत्ती।
अद्वैतग्रंथ परमार्थी। श्रवण करावे।।

अनेकदा अज्ञान परवडते पण विपरित ज्ञान परवडत नाही. जसे आजारी माणसाला औषध न दिले तरी चालेल पण चुकीचे औषध दिले जाऊ नये. आज

आध्यात्मिक क्षेत्रात अध्यात्म हा एक शैक्षणिक विषय झाला आहे. पारमार्थिक प्रवचने हा काही लोकांचा धंदा झाला आहे. सामान्य माणसाच्या मनात अध्यात्माविषयी इतके अज्ञान असते की तो कोणाच्याही नादी लागू शकतो. म्हणून कीर्तनभक्तिचा विचार करताना समर्थ 'वक्ता असावा साचार। अनुभवाचा।।' अशी ताकीद देतात.

अलिकडे पारमार्थिक क्षेत्रात बुद्धीभेद करणारे किंवा साधुसंतांची निंदानालस्ती करणारी अनेक पुस्तके निर्माण होत आहेत. साधकाने अशा ग्रंथाला चुकूनही हात लावू नये. याचा अर्थ समर्थ फक्त प्रवचन किंवा कीर्तन ऐकण्याला श्रवण म्हणत नाहीत तर ग्रंथवाचनालादेखील श्रवण म्हणतात. साधकाने फक्त संतांचे वाङ्मय वाचावे किंवा अधिकारी साधकाचे वाङ्मय वाचावे. मोक्ष किंवा ईश्वर प्राप्ती हे ज्याच्या जीवनाचे ध्येय नाही अशा माणसाच्या मुखातून आत्मज्ञान मिळवण्याच्या प्रयत्न करण्याला पूज्यपाद शंकराचार्य म्हणतात-

'वीणा या रूप सौंदर्य तंत्री वादन सौष्ठवम्।
प्रजारंजन मात्रं तं न साम्राज्याय कल्पते।।
वाक् वैखरी शब्दझरी शास्त्रं व्याख्यान कौशलम्।
वैदुष्यम् विदुषाम् तद्वत् भुक्तये न तु मुक्त ये।।'

ज्यावेळी मनुष्य करमणूक म्हणून ऐकत असतो किंवा साहित्यिक दृष्टिकोनातून ऐकत असतो तेव्हा ती श्रवणसाधना ठरत नाही. ते शब्द विषयाचे सेवन सुरू असते. सांगणाऱ्या माणसाचा रजोगुण त्याच्या वक्तृत्वाद्वारे बाहेर पडत असतो. सांगणारा मनुष्य जेव्हा जगत असतो तेव्हा ऐकणाऱ्यावर शक्तीपातासारखा प्रयोग होतो. म्हणून सांगणारा विरक्त असावा, त्याचे अंतःकरण भगवत् प्रेमाने ओसंडून भरून वाहावे. सांगणे हा व्यवसाय (Profession) नसावा तर जीवनव्रत असावे. (mission) प्रवचन करणे हे त्याचे ज्ञानोत्तर कर्म असावे किंवा ज्ञानप्राप्ती व्हावी म्हणून केलेले साधन असावे. म्हणून कीर्तनाला भक्ती म्हटले आहे. कीर्तनकार जेव्हा व्यावसायिक असतो किंवा केवळ कलावंत असतो तेव्हा त्याचा सारा भर लोकांना खूष करण्याकडे असतो. विश्वस्त जर धार्मिक प्रवृत्तीचे नसतील तर केवळ गर्दी खेचतो म्हणून त्याच कीर्तनकाराला बोलवत राहतील. संगीताचा अतिरेक स्त्रियांसबंधीचे विनोद या सर्व गोष्टी साधकाला त्याच्या ध्येयापासून दूर नेतात. म्हणून कीर्तनकाराने हे सर्व टाळावे. आपल्याला लोकांना एक संदेश द्यायचा आहे किंवा जीवनाचे एखादे सूत्र सांगायचे आहे याचे भान कीर्तनकाराला

असले पाहिजे. आपल्या बोलण्याचे समाजावर विपरित परिणाम होऊ शकतात हे त्याने ध्यानात घ्यावे. समर्थ म्हणतात-

'सांडून देव सर्वज्ञ। नादामध्ये व्हावे मग्न।
ते प्रत्यक्ष विघ्न। आडवे आले।।
येक मन गुंतले स्वरी। कोणे चिंतावा श्रीहरि।
बळेचि धरूनिया चोरी। शिश्रूषा घेतली।।
श्रृंघारिक नवरसिक। यामधे सांडावे येक।
स्त्रियादिकांचे कौतुक। वर्णू नये की।।
लावण्य स्त्रियांचे वर्णिता। विकार बाधिजे तत्त्वता।
धारिष्टापासून श्रोता। चळे तत्काळ।।
म्हणऊन ते तजावे। जे बाधक साधका स्वभावे।
घेता अंतरी ठसावे। ध्यान स्त्रियांचे।।'

कीर्तनाचा अथवा प्रवचनाचा मूळ हेतू समाजात भक्तिभाव वाढवणे, लोकांच्या मनात भगवंताबद्दल प्रेम निर्माण करणे हा आहे. समर्थांच्या शब्दात सांगायचे झाल्यास-

'आपण अवचित मरोन जावे। मग हरिभजन कोणे करावे।
याकारणे हरिभजनास लावावे। बहुत लोक।।
आमुचि प्रतिज्ञा ऐसी। काही न मागावे शिष्यासी।
आपणामागे जगदिशासी। भजत जावे'

समर्थांनी कीर्तनकारांना आणखी काही महत्त्वाच्या सूचना दिल्या आहेत. १) निरूपणात निरूपणाचे प्रतिपादन करताना सगुण मूर्तीचा उच्छेद होईल असे मुद्दे मांडू नयेत. २) समोर ज्या प्रकारचा श्रोता बसला असेल त्या पद्धतीने निरूपण करावे. समोर संन्यासी असतील तर अद्वैत निरूपण करावे. समोर सांसारिक लोक असतील तर सगुण कथा सांगावी. ३) भगवंताच्या नाम आणि रूपात तल्लीन होऊन जोषपूर्ण कथा करावी. ४) सांगणारा मी नसून भगवंतच बोलतो आहे आणि मी निमित्तमात्र आहे असा नम्रभाव हवा.

एवढ्या विस्तारपूर्वक आणि बारकाईने समर्थांनी श्रवण आणि कीर्तन भक्तिचे विवेचन केले आहे.

## नामसाधना आणि पादसेवन

महाराष्ट्रात संत नामदेवापासून अगदी अलिकडच्या गोंदवलेकर महाराजांपर्यंत सर्वच संतांनी नामसाधनेचा पुरस्कार केला आहे. महाराष्ट्रातील

बऱ्याच संतांनी हरिपाठाचे अभंग लिहून नाममहात्म्य गायले आहे. खरे तर श्रवण आणि कीर्तन यातून नामसाधक जन्माला यावा. सगळे संत सर्वकाळ नामात असत.

नामसाधना अत्यंत वैज्ञानिक आणि शास्त्रशुद्ध साधन मार्ग आहे. आपले मन सतत विचार करीत असते. प्रत्येक विचारापाठीमागे काहीतरी इच्छा असते. जेवढे विचार जास्त तेवढा मानसिक ताण वाढतो. विचार जेवढे दिशाहीन जास्त तेवढे मनाचे संतुलन ढळत जाते. एका अर्थाने विचार हा विद्युतप्रवाह आहे तर मन त्याची बॅटरी आहे. नामस्मरण भक्ती ही व्होल्टेज स्टॅबिलायझरसारखी आहे. विचारांचा प्रवाह नियंत्रित आणि नियमित करण्याचे काम नामस्मरण करते. नामामुळे चित्त स्थिर होते. प्रपंचातील विविध विषयांचे चिंतन करण्यात मनाची खूप शक्ती खर्च होते. गरज म्हणून मन विचार करत नाही तर सवय म्हणून विचार करीत राहते. सगळेच विचार हे महत्त्वाचे नसतात. नामसाधनेमुळे विचारांची जागा नाम घेते. त्यामुळे आपोआप विचारांची संख्या कमी होते.

अनुग्रहीत साधकाने सद्‌गुरूंनी दिलेल्या मंत्राचा जप करणे याला नामसाधना म्हणतात. असा जप रोज किती माळा करावा असा प्रश्न साधकाच्या मनात निर्माण होतो. त्यावर समर्थ म्हणतात-

'स्मरण देवाचे करावे। अखंड नाम जपत जावे।
नामस्मरणे पावावे। समाधान।।
नित्य नेम प्रातःकाळी। माध्यानकाळी सायंकाळी।
नामस्मरण सर्वकाळी। करीत जावे।।
चालता बोलता धंदा करिता। खाता जेविता सुखी होता।
नाना उपभोग भोगिता। नाम विसरो नये।।'

आता सर्वकाळ नामात राहणे शक्य आहे का? समर्थांच्या मते आपण आपले प्रत्येक कर्म भगवंताच्या अनुसंधानात करावे. तसेच आपले प्रत्येक कर्म भगवंताला अर्पण करावे. ही गोष्ट भगवत्‌गीतेतही भगवंताने वारंवार सांगितली आहे. म्हणजे कर्महो बंद पडत नाही आणि उपासनाही घडत राहते. मात्र भगवंत कर्ता आहे हा भाव प्रामाणिक असावा. तसेच कर्म भगवंताला अर्पण केल्यावर फळाची अपेक्षा बाळगू नये. अशा भक्ताचा सर्व संसार भगवंत चालवतो असे भगवत्‌गीता म्हणते.

नामस्मरण भक्तीच्या शेवटी समर्थांनी नामाची फलश्रुती सांगितली आहे. ते म्हणतात-

'नामे संकटे नासती। नामे विघ्ने निवारती।
नामस्मरणे पाविजेती। उत्तम पदे।।
भूत पिशाच्च नाना छंद। ब्रह्मगिऱ्हो ब्राह्मणसमंध।
मंत्रचळ नाना खेद। नामनिष्ठे नासती।।
नामे विषबाधा हरती। नामे चेडे चेटके नासती।
नामे होये उत्तम गती। अंतकाळी।।'

नामस्मरणामुळे संकटे नाहीशी होतात याचे दोन अर्थ आहेत. पहिल्या अर्थानुसार साधक जेव्हा नामात असतो तेव्हा त्याला संकट हे संकट वाटत नाही. त्याला साधनेतून जे बळ प्राप्त होते त्यामुळे तो त्या संकटावरती मात करतो. याचा अर्थ संकट असून नसल्यासारखे होते. आणि दुसरा अर्थ भगवंत संकट खरोखरच दूर करतो. संत मीराबाई किंवा संत वेणाबाई यांच्यावर विषप्रयोग होऊन देखील त्या वाचल्या. विविध संतांच्या चरित्रात ते सतत नामात असताना भगवंताने त्यांचे संकट दूर कसे केले याच्या विविध कथा आपल्याला ऐकायला मिळतात.

नामसाधनेचा आणखी एक विशेष म्हणजे सर्व समाजातील सर्व लोकांना नामाचा अधिकार आहे. काही साधन मार्गाचा सर्वांना अधिकार नसतो पण नामाचे तसे नाही. उलट तुम्ही जर नाम घेत असाल तर तुम्हाला अन्य कोणत्याही साधन मार्गाचा अवलंब करण्याची गरज नाही. नुसत्या नामाने मनुष्य तरून जातो असे समर्थ ठासून सांगतात. देह ठेवताना मुखात भगवंताचे नाव यावे असे प्रत्येकाला वाटते. याबाबतीत समर्थांचे स्पष्ट मत असे होते की जो सतत भगवंताच्या नामात राहतो त्यालाच अंतकाळी भगवंताच्या नामाचे स्मरण होईल. अंतकाळी अचानक भगवंताचे नाव मुखात येणार नाही. त्यासाठी नामसाधनेचा संस्कार हवा किंवा अभ्यास हवा.

पादसेवन भक्तीमध्ये समर्थ अखंड नामात राहण्याची सोपी युक्ती सांगतात. सद्गुरू किंवा सत्पुरूष सतत नामात असतात. त्यांची सेवा करण्याच्या निमित्ताने सतत त्यांच्या सहवासात राहता येईल. परिणामतः त्यांची स्पंदनं साधकाला जीवनपरिवर्तनास मदत करतील. अशा जीवन जगणाऱ्या माणसाच्या सहवासात जीवन जगण्याची कला आत्मसात करता येईल. पादसेवन म्हणजे केवळ सद्गुरूंचे पाय दाबणे नव्हे तर सद्गुरूंच्या सहवासात राहून त्यांची अवस्था प्राप्त करून घेणे होय. समर्थ म्हणतात-

'पादसेवन तेचि जाणावे। कायावाचामनोभावे।
सद्गुरूचे पाय सेवावे। सद्गतीकारणे।।

सद्‌गुरूकृपेविण काही। भवतरणोपाव तो नाही।
याकारणे लवलाही। सद्‌गुरूपाय सेवावे।।
सद्‌वस्तु दाखवी सद्‌गुरू। सकळ सारासारविचारू।
परब्रह्माचा निर्धारू। अंतरी बाणे।।'

येथे देहाने सेवा करणे किंवा देहबुद्धी सोडणे म्हणजे सद्‌गुरूंचे कायिक पादसेवन झाले. सद्‌गुरूंनी दिलेल्या मंत्राचा वाणीने जप करीत राहणे हे वाचिक पादसेवन होय. तर मनाने अखंड सद्‌गुरूंचे अथवा भगवंताचे चिंतन करणे हे मानसिक पादसेवन होय. वाणीने कुणाचीही निंदा न करणे किंवा कुणाचेही अंतकरण न दुखवणे हे देखील वाचिक पादसेवन म्हणता येईल. राजा भरताने प्रभु रामचंद्रांच्या पादुकांना राज्याभिषेक करून १४ वर्षे राज्यकारभार सांभाळला हे पादसेवन भक्तीचे उत्कट उदाहरण सांगता येईल. संत ज्ञानेश्वर माऊलींनी ज्ञानेश्वरीच्या तेराव्या अध्यायात आचार्योपासना समजावून सांगताना सद्‌गुरूंची जी उपासना सांगितली ते पादसेवन भक्तीचे विवेचन होय. मग मात्र शिष्याला केवळ त्या पादसेवन भक्तिने अद्वैत बोध प्राप्त होऊ शकतो. असे समर्थ रामदास म्हणतात.

## पूजा कशी करावी?

साधारणतः हिंदू कुटुंबात जन्माला आलेल्या प्रत्येकाच्या घरात परंपरेने चालत आलेले देव असतात. या देवाची पूजा करणे याला समर्थ अर्चन भक्ती म्हणतात.

भगवान रामकृष्ण परमहंस कालीमातेची पूजा करीत तेव्हा ते कालीमातेशी आणि कालीमाता त्यांच्याशी संभाषण करीत असत. संत नामदेव देखील पंढरपूरच्या पांडुरंगाशी आत्मसंवाद करीत. संत ज्ञानदेवांना विठ्ठलाच्या दर्शनाने किती आनंद होत असे. विठ्ठलासमोर उभे राहून भारावलेल्या स्थितीत तुकोबाराय म्हणतात-

'सुंदर ते ध्यान उभे विटेवरी। कर कटेवरी ठेवोनिया।।
मकर कुंडले तळपती श्रवणी। कंठी कौस्तुभ मणी विराजितसे।।
तुळसी हार गळा कांसे पितांबर। आवडे निरंतर हेची ध्यान।।
तुका म्हणे माझे हेची सर्व सुख। पाहीन श्रीमुख आवडीने।।'

आपण तीर्थक्षेत्री देवाचे दर्शन घेताना आपले अंतःकरण भरून येते. परंतु घरातील देवांची पूजा करताना तसा भाव निर्माण होत नाही. वस्तुतः आपल्या भावपूर्ण पूजेने आपण घरातील देवांमध्येही ते दिव्य तेज निर्माण करू शकू. मात्र

त्यासाठी यथासांग पूजा केली पाहिजे. अनेकदा पूजा करणे हा एक यांत्रिक उपचार होऊन जातो. आपण धातूच्या मूर्तीची पूजा करीत नसून प्रत्यक्ष भगवंताची सेवा करत आहोत, असा भाव असायला हवा. आपल्या वैयक्तिक जीवनात जसे स्वत:च्या देहाला सगळे उपचार करावेसे वाटतात त्याप्रमाणे भगवंताच्या मूर्तीला प्रत्यक्ष भगवंताचे शरीर समजून विविध उपचार अर्पण करणे ही अर्चन भक्ती होय. आपल्याला उत्तम वस्त्रे आणि अलंकार वापरावेसे वाटतात मग भगवंताला देखील उत्तम वस्त्रालंकार अर्पण करायला हवेत. आपणास सुग्रास भोजन खावेसे वाटते मग भगवंताला देखील चांगल्या पदार्थांचा नैवेद्य दाखवावा. आपण गरम पाण्याने स्नान करतो मग भगवंताला देखील गरम पाण्याने स्नान घालावे. अशा पद्धतीने यथासांग पूजा घडावी.

अनेकदा भगवंतासाठी खूप करावेसे वाटते पण आर्थिक दुर्बलतेमुळे आपण ते करू शकत नाही. काही देवस्थानात पुजाऱ्यांखेरीज कोणालाही आत प्रवेश नसतो. पण आपल्या मनात तर त्या देवाची पूजा करावीशी वाटते पण प्रत्यक्षात तसे करता येत नाही. अशावेळी समर्थ मानसपूजा करण्याचा सल्ला देतात. आपल्या प्रेमास्पदाची अथवा आपल्या सद्गुरूंची अशा प्रकारची मानसपूजा प्रत्येकाला करता येते. समर्थ दासबोधात म्हणतात-

'मने भगवंतास पूजावे। कल्पून सर्व ही समर्पावे।
मानसपूजेचे जाणावे। लक्षण ऐसे।।
जे जे आपणास पाहिजे। ते ते कल्पून वाहिजे।
येणे प्रकारे कीजे। मानसपूजा।।'

मानसपूजा म्हणजे भागवा-भागवी नव्हे किंवा तडजोड नव्हे. जिथे आपल्याला मनाप्रमाणे यथासांग पूजा करता येत असेल तिथे प्रत्यक्ष पूजाच करायची. पण जिथे प्रत्यक्ष पूजा शक्य नसेल तिथे मानसपूजा सांगितली आहे. मानसपूजेत जर तीव्र भाव असेल तर प्रत्यक्ष पूजेचे श्रेय त्यातून प्राप्त होऊ शकते.

## वंदन भक्ती

अध्यात्मात अहंकाराच्या विसर्जनाला अपरिमित महत्त्व आहे. भगवंत आणि सद्गुरू या दोन जागा आत्मविसर्जनाच्या आहेत. नदी ज्याप्रमाणे सागरात विलीन होते किंवा वृक्षाची बी जशी भूमीत विलीन होते तसे भक्ताने भगवंतात आणि शिष्याने सद्गुरूमध्ये विलीन व्हावे. वंदन भक्ती हा त्याचाच एक प्रकार आहे. प्रत्येक जण स्वत:ला मोठा समजत असतो. वंदन भक्तीमध्ये दुसऱ्याचे

मोठेपण स्वीकारण्याची प्रक्रिया असते. नमस्काराने आपोआप नम्रता अंगी येते. त्यासाठी पैसे खर्च करावे लागत नाहीत. पूजेसाठी तरी निदान सामग्री लागेल. पण नमस्कारासाठी काय लागते? समर्थ म्हणतात-

'नमस्कारा ऐसे नाही सोपे। नमस्कार करावा अनन्यरूपे।
नाना साधनी साक्षेपे। कासया सिणावे।।'

वारकरी संप्रदायात एकमेकांना नमस्कार करण्याची पद्धत आहे. हा अहंकार विसर्जनाचाच एक मार्ग आहे. नुसते नमस्कार स्वीकारीत राहून काही महाराज कसे अहंकारी होतात ते आपण पाहतो. शिष्य जेव्हा भावपूर्णतेने किंवा अनन्यतेने सद्‌गुरूंना नमस्कार करतो तेव्हा सद्‌गुरूंचा वात्सल्यभाव जागा होतो. समर्थ म्हणतात-

'साधक भावे नमस्कार घाली। त्याची चिंता साधूस लागली।
सुगम पंथे नेऊन घाली। जेथील तेथे।।'

समर्थांनी वंदन भक्ती सांगताना एक महत्त्वाचे सूत्र सांगितले. देवाला नमस्कार करताना सर्व देवतांबद्दल आपल्या मनात सारखाच पूज्य भाव असावा. मुळात आपला नमस्कार एखाद्या व्यक्तीला किंवा मूर्तीला नसून त्या व्यक्तीमधील किंवा मूर्तीमधील विशेष गुणाला नमस्कार असतो. एखादा वारकरी जितक्या श्रद्धेने देहू आळंदीला जातो तेवढ्याच श्रद्धेने त्याने गाणगापूर आणि सज्जनगडाला जावे. आपल्या सद्‌गुरूंना जितक्या श्रद्धेने प्रणाम करतो त्याच श्रद्धेने अन्य संप्रदायातील सत्पुरूषांना प्रणाम केला पाहिजे. वंदन करताना मनात दूजाभाव नसावा. आपला नमस्कार त्या आकाराला नसून अधिष्ठान चैतन्याला आहे याचे भान हवे. म्हणजे सांप्रदायिक कट्टरता वा भक्तांमध्ये दैवत बदलले म्हणून परस्परांमध्ये तेढ नसेल. समर्थ म्हणतात-

'या कारणे सर्व देवांसी। नमस्कारावे अत्यादरेसी।
अधिष्ठान मानिता देवांसी। परम सौख्य वाटे।।'

## दास्य आणि सख्य

भक्त भगवंतावर जेव्हा प्रेम करतो तेव्हा तो भगवंताशी नाते जोडतो. या नातेसंबंधांना भाव असे म्हणतात. मी भगवंताची पत्नी आहे आणि भगवंत माझा पती आहे या नातेसंबंधाला मधुराभाव असे म्हणतात. मीराबाईने मधुराभावाने श्रीकृष्णाची प्राप्ती करून घेतली. गुलाबराव महाराजांचा देखील मधुराभाव होता. पण ते स्वतःला ज्ञानेश्वर कन्या म्हणवून घेत. रामकृष्ण परमहंसांनी देखील मधुराभावाने साधना केली. भक्त जेव्हा स्वतःला आई मानतो आणि भगवंताला

आपला पुत्र मानतो तेव्हा त्याला वात्सल्यभाव म्हणतात. रामकृष्ण परमहंसांनी वात्सल्यभावाने रामाची आराधना केली तेव्हा त्यांना रामांचे बालरूपात दर्शन झाले. समर्थांनी मात्र दास्य आणि सख्य हे दोन भाव जोपासले. दास्यभावात भक्त स्वत:ला भगवंताचा दास समजत असतो तर सख्यभावामध्ये तो स्वत:ला भगवंताचा मित्र मानत असतो. पौराणिक वाङ्मयात हनुमंत हे दास्य भक्तीचे तर अर्जुन हे सख्य भक्तीचे उदाहरण समजले जाते.

दास्यभाव हा अहंकाराच्या विसर्जनास अत्यंत पूरक ठरतो म्हणून सर्वच संतांनी स्वत:ला भगवंताचे दास म्हणवून घेतले. समर्थ स्वत:ला रामाचा दास मानीत. आजीवन त्यांनी रामदास्य केले. मीराबाई स्वत:ला श्रीकृष्णांच्या चरणांची दासी म्हणवून घेते. तुकाराम महाराज तर म्हणतात- 'तरीच जन्मा यावे। दास विठ्ठलाचे व्हावे।' भगवंताचे दास्य करायला मिळणार असेल तर तुकाराम महाराज वारंवार जन्म घ्यायला तयार आहेत. दास्य भक्तीमध्ये मी भगवंताचा दास आहे असा अखंड भाव असतो. त्यामुळे देवाच्या दारात किंवा सद्गुरूंच्या मठात हलकी सलकी कामे करताना कमीपणा वाटत नाही. दास्यभावात केवळ भगवंताचीच नव्हे तर भगवंताच्या सर्व भक्तांची दास्यरूपात सेवा करावयाची असते. म्हणजे सेवेने अहंकार वाढणार नाही. समर्थ म्हणतात-

'सकळांचे करावे पारपत्य। आल्याचे करावे आतिथ्य।
ऐसी ही जाणावी सत्य। सातवी भक्ती।।
वचने बोलावी करूणेची। नाना प्रकारे स्तुतीची।
अंतरे निवती सकळांची। ऐसे वदावे।।'

असा भाव ठेवल्यास अहंकाराला थाराच मिळणार नाही. भक्त २४ तास विनम्र भावात राहील. समर्थांनी दास्यभाव वाढवण्यासाठी जागोजागी मारुती मंदिरे स्थापन केली. लोकांची अशी धारणा असते की दुबळ्या लोकांनी अथवा निर्बुद्ध लोकांनी दास्य भक्ती करावी. पण दास्य भक्तीसाठी प्रसिद्ध असलेले हनुमान 'बुद्धिमतां वरिष्ठम्' होते आणि पराक्रमाच्या बाबतीत अतुलनीय होते. समर्थांनी स्थापन केलेल्या हनुमंताचे एक वैशिष्ट्य होते. चाफळला एक हनुमान रामासमोर आहे तर एक रामापाठीमागे आहे. जो हनुमान रामासमोर आहे तो दास्यभावात हात जोडून उभा आहे तर रामापाठीमागील हनुमान वीर मारुती किंवा प्रताप मारुती म्हणून ओळखला जातो. त्याच्या पायाखाली राक्षस आहे. याचा अर्थ कुठे दास्य करायचे आणि कुठे पराक्रम करायचा याला मर्यादा आहेत. दास्यभाव खरा विकसित झाला म्हणजे अहंकाराचा वारा लागणार नाही.

सख्य भक्तीचे वर्णन करताना समर्थांच्या प्रतिभेला एक वेगळा बहर आला. सख्य भक्तीमध्ये भक्त भगवंताशी आत्यंतिक एकरूप होतो. समर्थ वर्णन करतात-

'देवासी परम सख्य करावे। प्रेम प्रीतीने बांधावे।
आठवे भक्तीचे जाणावे। लक्षण ऐसे।।
देवास जयाची अत्यंत प्रीती। आपण वर्तावे तेणे रीती।
येणे करिता भगवंती। सख्य घडे नेमस्त।।
आपण तैसेचि वर्तावे। आपणासि तेच आवडावे।
मनासारिखे होता स्वभावे। सख्य घडे नेमस्त।।'

प्रेमामुळे भगवंत भक्ताच्या आधीन होतो. आदर्श भक्ताचे वर्णन करताना 'ऋणी देव हा भक्ती भावे जयाचा' असे समर्थ वर्णन करतात. भक्त दास्य करत राहतो; पण भगवंताकडून काही मागत नाही. भगवंताने काही दिले तरी स्विकारत नाही. या सगळ्याचा भगवंतावर विलक्षण परिणाम होतो. तो भक्ताचा मिंधा होतो. मग नाथाघरी पाणी भरायला अथवा जनाबाईची लुगडी धुवायला त्याला संकोच वाटत नाही. कर्णाला सारथ्याचा पुत्र म्हटले तरी राग येत असे; पण भगवान कृष्ण अर्जुनाच्या रथाचे सारथी होतात. सख्य भक्तीमध्ये भगवंत भक्तासाठी काय करत नाही? समर्थ म्हणतात-

'भक्ते जे जे मनी धरावे। देवे ते ते आपणचि करावे।
तेथे वेगळेपण भावावे। न वचे कदा।।
मनी धरावे ते होते। विघ्न अवघेचि नासोन जाते।
कृपा केलिया रघुनाथे। प्रचित येते।।'

सख्य भक्तीतील प्रेमाचे एक वैशिष्ट्य आहे. नारद ज्याला परमप्रेम म्हणतात ते हेच होय. अशा प्रेमात भक्त प्रत्येक गोष्ट भगवंताला आवडेल अशीच करत राहतो. भक्ताला स्वत:ची आवड-निवड शिल्लक राहत नाही. व्यवहारात जो आपल्या मनासारखे वागतो त्याच्यावर आपण प्रेम करतो. स्वत:चे मन किंवा स्वत:च्या आवडी-निवडी शिल्लक नसणे हे खरे प्रेमाचे लक्षण आहे. येथे भक्त भगवंताला प्रिय होण्यासाठी सतत धडपडत असतो आणि त्याची ही धडपड पाहून भगवंत त्याच्याशी कायमचा बांधला जातो. 'माझे सर्व जावो तुझे नाम राहो। हाचि माझा भावो अंतरीचा।' ही भक्ताची अवस्था असते. प्रेमाच्या यज्ञात तो स्वत:च्या इच्छांची आहुती देतो. केवळ अशाच भक्तासाठी भगवंत सगळी कामे सोडून धावत जातो. समर्थ म्हणतात-

'देवाच्या सख्यत्त्वासाठी। पडाव्या जिवलगांसी तुटी।

सर्व अर्पावे सेवटी। प्राण तोंहि वेचावा।।
आपुले आवघेचि जावे। परी देवासी सख्य राहावे।
ऐसी प्रीती जीवे भावे। भगवंती लावावी।।
देव म्हणिजे आपुला प्राण। प्राणासी न करावे निर्वाण।
परम प्रीतीचे लक्षण। ते हे ऐसे असे।।
ऐसे परम सख्य धरिता। देवास लागे भक्ताची चिंता।
पांडव लाखाजोहरी जळता। विवरद्वारे काढिले।।'

एखादी गोष्ट मनाविरुद्ध घडली तरी भक्ताच्या मनात भगवंताविषयी विकल्प निर्माण होत नाही. खरे तर मनाविरूद्ध घडले असे म्हणायला त्याचे स्वत:चे मन कुठे शिल्लक आहे? देवाची इच्छा हीच त्याची इच्छा असते. जे घडते ते भगवंताच्या इच्छेने घडते आणि आपल्या कल्याणाचे घडते अशी भक्ताची श्रद्धा असते. त्यामुळे तो कधी विपरित तर्क करत नाही. ज्ञानेश्वर महाराज म्हणतात-

'माळिये जेवूती नेले। तेवूते निवांतची गेले।
त्या पाणिया ऐसे केले। होवावेजी।।'

पाण्याला स्वत:ची आवड-निवड काही नसते. पाणी उसाच्या वाफ्यात सोडा नाहीतर मिरचीच्या वाफ्यात सोडा. आणि भक्तीची मजा अशी की एवढा जो भगवंताशी अनन्य होतो त्याचे कधीही अकल्याण होत नाही. उलट असा भक्त दीर्घकाळ कीर्तिरूपाने उरतो.

### आत्मनिवेदन भक्ती

आत्मनिवेदन भक्ती ही ज्ञानप्रधान आहे. येथे भक्त भगवंताशी एवढा एकरूप होतो की भक्त आणि भगवंत यांच्यातील द्वैत संपुष्टात येते. भक्तीतून ज्ञान जन्माला येते ते असे. म्हणून समर्थांनी दासबोध लेखनासाठी अनेक ग्रंथ वाचले. पण ज्ञानप्राप्तीसाठी त्यांनी भक्ती केली. त्यांना अभ्यासाने ज्ञान प्राप्त झाले नाही. अभ्यासाने माहिती मिळते. ज्ञानासाठी भगवंताची कृपा हवी किंवा सद्गुरूंची कृपा हवी. समर्थ म्हणतात-

'रघुनाथभजने ज्ञान जाले। रघुनाथभजने महत्त्व वाढले।
म्हणौनिया तुवा केले। पाहिजे आधी।।
जे नेणवे पुराणी। जेथे सिणल्या वेदवाणी।
तेचि आता येचि क्षणी। बोधीन गुरूकृपे।।
पाहिले नसता संस्कृती। रीग नाही मऱ्हाष्ट ग्रंथी।

हृदई वसल्या कृपामूर्ती। सद्गुरूस्वामी।।
आता नलगे संस्कृत। अथवा ग्रंथ प्राकृत।
माझा स्वामी कृपेसहित। हृदयी वसे।।'

चोखामेळा, गोरा कुंभार, रोहिदास चांभार या संतांनी केव्हा अभ्यास केला? कशाचा अभ्यास केला? केवळ भक्तीतून त्यांना ज्ञान प्राप्त झाले. भगवंत ज्ञानस्वरूप आहे. भक्ती करताना भगवंताशी एकरूप झालेला भक्त आपोआप भगवंताप्रमाणे ज्ञानस्वरूप होतो. आत्मनिवेदन भक्तीमध्ये भक्ताचे अस्तित्त्वच शिल्लक राहत नाही. समर्थ प्रश्न विचारतात-

'येक मुख्य परमेश्वरु। दुसरी प्रकृती जगदाकारू।
तिसरा आपण कैचा चोरू। आणिला मधे।।'

वस्तुत: फक्त भगवंतालाच अस्तित्त्व आहे आणि आपण भगवंताच्या अस्तित्त्वाचा एक हिस्सा आहोत. अहंकारामुळे किंवा देहबुद्धीमुळे आपण आपले स्वत:चे स्वतंत्र अस्तित्त्व प्रस्थापित करतो. वस्तुत: या स्वतंत्र अस्तित्वाच्या संकल्पनेमुळेच आपल्या वाट्याला नाना दु:ख येतात. समर्थ म्हणतात-

'आपण मिथ्या साच देव। देव भक्त अनन्यभाव।
या वचनाचा अभिप्राव। अनुभवी जाणती।।
या नाव आत्मनिवेदन। ज्ञानियांचे समाधान।
नवमे भक्तीचे लक्षण। तें हें निरोपिले।।'

अशाप्रकारे श्रवण भक्तीच्या डोंगरावर उगम पावलेली नवविधा भक्तीची गंगा आत्मनिवेदनाच्या सागरात विलीन होते. समर्थांचा भक्तीयोग ज्ञानपर्यावसानी आहे.

## दासबोधातील ज्ञानयोग

ग्रंथराज दासबोधमध्ये ज्ञानमार्गाची चर्चा करताना समर्थांनी जीव, जगत्, आत्मा आणि ब्रह्म यांचा विचार केला आहे. समर्थांच्या मते आत्मा आणि ब्रह्म हे दोन वेगवेगळे नाहीतच. आत्मा म्हणजे सोपाधिक ब्रह्म होय. ब्रह्माला शरीराची उपाधी प्राप्त झाली म्हणून त्याच्या त्या अंशाला आत्मा असे म्हटले. जगताचा विचार करताना समर्थ प्रारंभी पूर्वपक्ष म्हणून जगताचे अस्तित्त्व स्वीकारतात. मात्र अखेर सिद्धांत सांगताना अजातवाद सांगून जग झालेच नाही असे म्हणतात. जीवाला अस्तित्वच नाही. फक्त ब्रह्म अस्तित्वात आहे. जीव जर ब्रह्मामध्ये विलीन झाला तर आत्माही उरत नाही आणि जगही राहत नाही.

एकदा जीव जगत आणि आत्मा या तिन्हींचा निरास झाल्यावर ब्रह्म हा शब्द वापरण्याचे प्रयोजनच उरत नाही. जीवाने ब्रह्मात विलीन होण्याच्या प्रक्रियेला समर्थ आत्मनिवेदन असे म्हणतात.

समर्थांचे बहुसंख्य शिष्य ब्रह्मचारी होते. ते ज्ञानमार्गाची कास धरून होते. त्यामुळे अशा शिष्यांनी विचारलेले बरेचसे प्रश्न ज्ञानमार्गासंबंधीचे होते. समर्थांनी दासबोधात आत्मा निरूपण, अंतरात्मा निरूपण, अंतरदेव, अंतःकरण येक, मायोद्भव, स्थिती, पचप्रलय, तत्त्व निरूपण, स्थूल पंचमहाभूत, सूक्ष्म पंचमहाभूत, मायाब्रह्मनिरूपण, विमलब्रह्म, शुद्धज्ञान, ब्रह्मपावन, शून्यत्त्व निरसन, द्वैतकल्पना निरसन या नावाचे जे विविध समास लिहिले आहेत, त्यात ज्ञानमार्गाची चर्चा आहे. श्रीमद् दासबोधात आत्मा हा शब्द काही ठिकाणी ब्रह्म या अर्थाने आला आहे तर काही ठिकाणी मन या अर्थाने आला आहे. शरीराच्या सहवासात आत्म्याला सुखदुःख भोगावे लागते, असे जेव्हा समर्थ म्हणतात तेव्हा आत्मा हा शब्द मन या अर्थाने ते वापरतात. ब्रह्माला सुखही नाही आणि दुःखही नाही. कारण ते आनंदस्वरूप असून सुख-दुःखाचे साक्षी आहे.

ज्ञानमार्गात समर्थ पंचीकरण प्रक्रिया आणि महावाक्य विवरण याला फार महत्त्व देतात. शास्त्रामध्ये असा संकेत आहे की सांसारिक माणसाने कर्म आणि भक्ती या मार्गाने जावे तर संन्याशाने ज्ञान किंवा ध्यान मार्गाने जावे. महावाक्याचे विवरण संन्याशानेच करावे हे सांगताना समर्थ म्हणतात-

'महावाक्याचा विचारू। तेथे सन्यासीच अधिकारू।।'

दैवी कृपेचा जो नरू। तो ही विवरोन पाहे।।'

दासबोधामध्ये तत्त्वझाडा, तत्त्वनिरास किंवा तत्त्वांचा निवाडा असे शब्दप्रयोग वारंवार येतात. हे सारे शब्दप्रयोग पंचीकरण प्रक्रियेचे आहेत. आपले हे शरीर वेगवेगळ्या स्थूल आणि सूक्ष्म तत्त्वांचे मिश्रण आहे. समर्थांनी देहाचे पृथ्यक्करण करून एकूण ८२ तत्त्वे सांगितली आहेत. ही ८२ तत्त्वे नाशिवंत असून जड आहेत. हे सगळे स्पेअर पार्टस् एकत्र जुळून आपल्याला जीवदशा प्राप्त झाली. तत्त्वझाडा म्हणजे केर समजून ही सर्व ८२ तत्त्वे झाडून टाकणे होय. तत्त्वनिरास म्हणजे देखील ही सारी तत्त्वे बाजूला सारून अंतस्थ चैतन्याचा शोध घेणे होय. तत्त्वांचा निवाडा म्हणजे देखील धान्य निवडताना खडे बाजूला टाकतो तद्वत परमात्मा निवडताना ही तत्त्वे खड्याप्रमाणे फेकून देणे म्हणजे तत्त्वांचा निवाडा. पंचीकरणामध्ये विविध कोष्टकाद्वारे १७व्या दशकात समर्थांनी या ८२ तत्त्वांचे विवेचन केले असून ज्या ब्रह्माच्या अधिष्ठानावर ते काम

करतात ते ब्रह्म हेच माझे खरे स्वरूप आहे ही पंचीकरण प्रक्रिया होय. 'अहं ब्रह्मास्मि' हे महावाक्य असून त्याचे विवरण करावयाचे म्हणजे आत्मनिवदेनाद्वारे मी देह, मन अथवा इंद्रिय नसून आनंदस्वरूप ब्रह्म आहे. हे जाणून घ्यावयाचे आहे. समर्थ म्हणतात-

'पाहाता देहाचा विचार। अवघा तत्त्वांचा विस्तार।
तत्त्वे तत्त्व झाडितां सार। आत्माच उरे।।
आपणासी ठावचि नाही। येथे पाहाणे नलगे काही।
तत्त्वे ठाईचा ठाई। विभागून गेली।।
बांधली आहे तो गांठोडी। जो कोणी विचारे सोडी।
विचार पाहाता ही गांठोडी। आडळेना।।
तत्त्वांचे गांठोडे शरीर। याचा पाहाता विचार।
येक आत्मा निरंतर। आपण नाही।।'

आपण या तत्त्वांनाच स्वत:चे खरे अस्तित्त्व समजतो. चित्ताच्या या दशेला देहबुद्धी असे म्हणतात. ही सारी तत्त्वे नश्वर असून ज्या ब्रह्माच्या अधिष्ठानावर गोळा होऊन ती जीवदशा निर्माण करतात ते ब्रह्म हे माझे खरे स्वरूप आहे. या बोधाला आत्मबुद्धी असे म्हणतात. देहबुद्धी असते तेव्हा बुद्धी इंद्रियांच्या आधीन असते आणि इंद्रिय विषयांच्या आधीन असतात. आत्मबुद्धीमध्ये बुद्धी आत्मस्वरूपाशी लीन असते आणि इंद्रिय बुद्धीच्या आज्ञेत असतात. देहबुद्धीचा पगडा असलेल्या माणसाला इंद्रिये विषयांच्या दिशेने फरफटत ओढत नेतात. त्यामुळे जेवढी वासना जास्त तेवढी फरपट जास्त. याउलट आत्मबुद्धीच्या पातळीवर जीवन जगणारा माणूस इंद्रिये ताब्यात ठेवतो आणि शास्त्राला अनुसरून वासनांचा नियंत्रित भोग घेतो. त्याचे मानसिक संतुलन चांगले राहते.

ज्ञानमार्गात आपले पंचभौतिक शरीर, पाच ज्ञानेंद्रिये, पाच कर्मेंद्रिये, पाच विषय आणि अंत:करण पंचक यांची चिकित्सा केली जाते. केनोप्निषदामध्ये हीच चर्चा आहे. ऋषी प्रश्न विचारतात-

'केनेषितं पतति प्रेषितम् मन:।
केन प्राण: प्रथम: प्रैति युक्त:।
केनोषितां वाचमिमां वदंति।
चक्षु: श्रोत्रं कउ देवो युनक्ति।।'

कोणाच्या सत्तेने प्रेरित होऊन आपले मन, आपले प्राण, आपली वाणी, आपले डोळे काम करतात? कारण आधुनिक वैद्यकशास्त्राने हे सिद्ध केले आहे की स्कुटरचे जसे वेगवेगळे भाग असतात तशी आपली सर्व इंद्रिये किंवा

अवयव आपल्या शरीराचे निरनिराळे भाग असून त्यांना स्वतंत्र अस्तित्व नाही. स्वतंत्ररित्या हात काही काम करू शकणार नाहीत किंवा पाय चालू शकणार नाहीत. मन आणि आत्मा यांच्याशी जोडले गेल्यामुळे त्यांना चेतना प्राप्त होते. समर्थ म्हणतात-

'तस्मात् विचार करावा। देव कोण तो वोळखावा।
आपला आपण शोध घ्यावा। अंतर्यामी।।
आपला आपण शोध घेता। आपली तो माईक वार्ता।
तत्त्वांती उरले तत्त्वता। निर्गुण ब्रह्म।।
विवेके देहाकडे पाहिले। तो तत्त्वे तत्त्व वोसरले।
आपण काही नाही आले। प्रत्ययासी।।'

ही सारी तत्त्वे जड आहेत. ती एकत्रित आल्यावर ब्रह्माचे प्रतिबिंब त्यातील बुद्धी तत्त्वात पडते. त्यामुळे देहाला 'मी जीव आहे' असा बोध प्राप्त होतो. याला समर्थ सगुण निर्गुण कालवले असे म्हणतात. जड आणि चेतन यांच्या मिश्रणातून चेतनाचा स्वीकार करणे आणि जडाचा निरास करणे यालाच आत्मनिवदेन म्हणतात. अत्यंत तर्कशुद्ध पद्धतीने समर्थ तत्त्वांचा निरास कसा करतात ते पाहा-

'माझे शरीर ऐसे म्हणतो। तरी तो जाण देहावेगळांची तो।
मन माझे ऐसे जाणतो। तरी तो मनहि नव्हे।।
पाहाता देहाचा विचार। अवघा तत्त्वांचा विस्तार।
तत्त्वे तत्त्व झाडितां सार। आत्माच उरे।।
आपणासी ठावचि नाही। येथे पाहाणे नलगे काही।
तत्त्वे ठाईचा ठाई। विभागून गेली।।'

आपण बोलताना माझे मन म्हणतो याचा अर्थच मी म्हणजे मन नव्हे. मन माझ्याहून निराळे आहे. मग हा मी कोण? याच पद्धतीने माझे शरीर, माझा हात, माझा पाय असे आपण म्हणत असताना माझा म्हणजे नेमका कुणाचा किंवा मी म्हणजे निश्चित कोण याचा शोध घेतला पाहिजे. या प्रक्रियेलाच समर्थ आत्मनिवदेन म्हणतात.

## पंचभूतांचा निरास

आपले शरीर पृथ्वी, आप, तेज, वायु आणि आकाश या पाचांचे मिश्रण आहे. माझ्या शरीराला वजन आहे. माझ्यातील हे जडत्व म्हणजे माझ्यातील पृथ्वीतत्त्व होय. व्यवहारात आपण राहतो त्या भूमीला पृथ्वी असे म्हणतात. पण

पंचीकरणात प्रत्येक वस्तूच्या जडत्वाला पृथ्वी असे म्हणतात. माझे शरीर जसे जड आहे तसे त्यामध्ये रक्त, लाळ, रेत, मूत्र, घाम हे देखील आहेत. याला आपतत्त्व असे म्हणतात. शरीरात ओलसरपणा आहे म्हणून हाडे लवचिक आहेत. आता पृथ्वी जड आहे, आप मृदू आहे म्हणजे दोघांमध्ये चेतना नाही. तरी शरीर हालचाल करते. शरीरातील या जडत्वांचा निरास करून चेतना तत्त्वाशी मला एकरूप व्हावयाचे आहे.

माझ्यामध्ये उष्णता देखील आहे. तापमापक लावल्यास ९७ ते ११० डिग्री या तापमानात मी जगत असतो. निरोगी अवस्थेत माझे तापमान ९७ डिग्री सें. किंवा ९८ डिग्री सें. असते. याचा अर्थ माझ्या शरीरात तेज देखील आहे. शरीरातील उष्णतेला तेज म्हणतात. मी २४ तास श्वासोच्छ्वास करीत असतो. भोजनानंतर मी ढेकर देतो. आपण वायुचा त्याग करतो. याचा अर्थ माझ्या शरीरात वायुतत्त्व देखील आहे. आता तेज आणि वायु ही दोन्ही तत्त्वे जड आहेत. त्यांना जाणिव नाही. स्वत:ची बुद्धी नाही. मग कुणाच्या अधिष्ठानावरती त्यांचे कार्य चालते. माझ्या शरीरात २४ तास रक्ताभिसरण सुरू असते. आता पोकळी आहे म्हणून रक्त धावू शकते. वारा येऊ जावू शकतो. याचा अर्थ त्याला धावायला आत आकाश आहे. पण आकाश कितीही सूक्ष्म असले तरी त्याला स्वत:ची चेतना नाही. ज्या पंचमहाभूतांनी माझे शरीर बनले आहे, त्या सर्वांचे जडत्व किंवा नश्वरत्व लक्षात घेऊन ज्या चैतन्यापासून त्यांना प्रेरणा मिळते ते चैतन्य ब्रह्माचे असून तेच माझे खरे स्वरूप आहे. हे जाणून घ्यावयाचे आहे. यालाच शंकराचार्य आत्मषट्कात 'चिदानंदरूप शिवोऽहम्' म्हणतात.

ज्या पद्धतीने पंचमहाभूतांचा निरास केला त्याच पद्धतीने पाच ज्ञानेंद्रिये आणि पाच कर्मेंद्रिये यांचा निरास करता येईल. १) हात २) पाय ३) गुद ४) शिस्न ५) जीभ ही पाच कर्मेंद्रिय होत तर १) नाक २) रसना ३) डोळे ४) त्वचा ५) कान हे पाच ज्ञानेंद्रिय होत. ही दाही इंद्रिये पंचभौतिक असल्यामुळे जड आहेत. शिवाय माझ्या देहाचे ते स्पेअर पार्टस् आहेत हे आपण यापूर्वीच पाहिले. एखाद्याचा हात किंवा पाय कापला गेला तरी तो जिवंत राहतो. याचा अर्थ हात आणि पाय हे काही माझे खरे अस्तित्व नाही.

## विषयाचा अन् अंत:करण पंचकाचा निरास

१) शब्द २) स्पर्श ३) रूप ४) रस आणि ५) गंध हे पाच विषय असून ज्ञानेंद्रियांच्या आणि कर्मेंद्रियांच्याद्वारे आपण या विषयांचे सेवन करत राहतो. पण हे विषयदेखील माझे खरे स्वरूप नाही. कारण बालपणी ज्या शब्दांचा आश्रय

घेतो ते विद्यार्थीदशेत विसर्जित होतात. तारुण्यातील शब्द विषय निराळा तर म्हातारपणाचा शब्द विषय निराळा. तारुण्यातील शब्दात आशावाद आणि उत्साह भरलेला असतो तर वृद्धापकाळच्या शब्दात निराशा आणि निष्क्रियता भरलेली असते. बालपणी मातेच्या रूपाचे आकर्षण असते. तरुणपणी वेगळीच रूपे आकर्षून घेतात. म्हातारपणी कशातच स्वारस्य वाटत नाही. यातील कोणते विचार म्हणजे माझे खरे स्वरूप आहे? हे सारे सतत बदलत आहे पण कोणते तरी तत्त्व स्थिर आहे. म्हणून हा बदल तिथे नोंदवला जातो. माझ्यातील आत्मतत्त्व किंवा ब्रह्मचैतन्य स्थिर आणि शाश्वत असल्यामुळे त्याच्या अधिष्ठानावर मला या परिवर्तनाचा बोध होतो.

१) अंत:करण २) मन ३) बुद्धी ४) चित्त ५) अहंकार यांना अंत:करण पंचक म्हणतात. याला माझे सूक्ष्म शरीर असे देखील म्हणतात. हे सूक्ष्म शरीर वैचारिक अथवा वासनात्मक असून वायुस्वरूप आहे. हे विचारतरंग तरी कायम असतात का? बालपणी मन निरागस असते तरूणपणी मनाच्या आकाशात विकारांचे ढग जमा होतात. वृद्धापकाळी मन संशय भीती यांनी ग्रस्त असते. आचार्य रजनीश म्हणतात- ''बेईमान बालक मिलना मुश्किल है। ईमानदार बुढा मिलना मुश्किल है। जिंदगी इतनी बेईमानी सिखा देती है जिसकी कोई हद नही।'' मन हळूहळू विकारग्रस्त होत जाते. पण संतांचे मन कितीही वय वाढले तरी निरागस आणि निष्पाप असते. याचे कारण संत सगळे व्यवहार आत्म्याच्या किंवा भगवंताच्या अनुसंधानात करतात. सामान्य मनुष्य देह, मन, आणि इंद्रिय यांनाच आपले खरे अस्तित्व मानून त्याच्या आधीन होतो. त्यामुळे मनासारखे घडले की सुख आणि मनाविरूद्ध घडले की दु:ख अशा द्वंद्वात आयुष्यभर राहतो. आपले आत्मस्वरूप किंवा ब्रह्म द्वंद्वातीत आहे.

एखाद्या मृत देहाची चिरफाड करावी त्याप्रमाणे समर्थ पंचमहाभूतांची अधिक चिरफाड करतात. उदाहरणार्थ पृथ्वी तत्त्वामध्ये हाडे, मांस, त्वचा, नाडी, रोम या पाच घटकांचा अंतर्भाव करतात किंवा आपामध्ये रेत, रक्त, लाळ, मूत्र आणि घाम यांचा अंतर्भाव करतात. अशा पद्धतीने अधिकाधिक विश्लेषण करीत समर्थ ८२ तत्त्वे शोधून काढतात. देहाचे सुद्धा स्थूल, सूक्ष्म, कारण आणि महाकारण असे चार प्रकार ते पाडतात. तत्त्वांच्या संख्येला फार महत्त्व नाही कारण ज्ञानदेवांनी ३६ तत्त्वे सांगितली तर समर्थांनी ८२ तत्त्वे सांगितली. तत्त्वे मुळातच सापेक्ष असल्यामुळे त्यांची संख्या बदलतच राहणार. मात्र ब्रह्म हे एकमेवाद्वितीय सत्य असल्यामुळे शंकराचार्यांपासून विवेकानंदांपर्यंत सर्वच संतांनी ब्रह्माचे सारखेच वर्णन केले आहे. भगवत्‌गीतेपासून तो

दासबोधापर्यंत आत्म्याची किंवा ब्रह्माची जी विविध लक्षणे सांगितली आहेत त्यामध्ये संतांमध्ये कुठेही मतभेद नाही. साधकाने इंद्रियांचे नियमन करून मन सतत आत्मस्वरूपाच्या अनुसंधानात ठेवून आपल्या मूळ स्वरूपाचा शोध घ्यावा. ही अंतर्यात्रा हेच ज्ञानमार्गाचे रहस्य आहे. ही यात्रा फार सोपी नाही, खडतर आहे. पण सततच्या प्रयत्नाने आणि वैराग्याने साधक यशस्वी होऊ शकतो.

## सोऽहं बोध आणि अखंड ध्यान

याठिकाणी एक महत्त्वाची गोष्ट लक्षात ठेवली पाहिजे की केवळ ८२ तत्त्व नश्वर आहेत आणि ब्रह्म फक्त शाश्वत आहे हे बौद्धिक स्तरावर समजावून घेण्याने भागणार नाही. त्याची प्रत्यक्ष अनुभूती घ्यावी लागेल. त्यासाठी उपासनेच्या दिव्यातून जावे लागेल. पंचिकरणाच्या या प्रक्रियेसाठी समर्थांनी दासबोधात दोन प्रकारच्या साधना सांगितल्या, १) सोऽहं साधना २) अखंड ध्यानाची साधना. कोष्टक तयार करणे, ती समजावून घेणे हा भाग अत्यंत स्थूल आहे. त्याने मेंदूला जरा व्यायाम होईल आणि आपल्याला ज्ञान झाल्याचा खोटा आभास निर्माण होईल. साधना माणसाला सूक्ष्मात नेते. ब्रह्म अत्यंत सूक्ष्म असल्यामुळे त्याच्या प्राप्तीसाठी सूक्ष्मातूनच जावे लागेल.

समर्थांनी श्रीमद् दासबोधात सतराव्या दशकातील पाचव्या समासात सोऽहं साधना सांगितली आहे. त्याला अजपाजप किंवा अजपा गायत्री सुद्धा म्हणतात. सोऽहं साधना ही मनाला सूक्ष्मात नेणारी प्रक्रिया आहे. या प्रक्रियेनुसार साधकाला एके ठिकाणी शांत बसावे लागते. त्याने मन विचारांबरोबर भरकटू न देता लक्ष आपल्या श्वासाकडे ठेवायचे आहे. आपण जर मोठ्याने सूक्ष्म श्वास घेतला तर सः असा ध्वनी होतो. आणि श्वास बाहेर सोडला तर हं असा ध्वनी होतो. आपल्या श्वासात अनेक विकार भरले असल्यामुळे आपल्याला हा सोऽहं नाद ऐकू येत नाही. आपल्या मनाने एवढी ध्वनी प्रदूषणे लावून घेतली आहेत की दृष्य जगातील या विविध स्पंदनात सोऽहं ध्वनी गुदमरून गेला आहे. म्हणून समर्थ

> 'येकांती उगेचि बैसावे। तेथे हे समजोन पाहावे।
> अखंड घ्यावें सांडावे। प्रभंजनासी।।
> धरिता सो सांडीता हं। अखंड चाले सोऽहं सोऽहं।'

असे म्हणतात. आपल्या वृत्ती जेव्हा पूर्ण शांत झाल्या असतील किंवा मन जेव्हा पूर्ण निर्विचार झाले असेल तेव्हा सोऽहं ध्वनी ऐकू येईल. अशा पद्धतीने दिवसातून काही काळ मुद्दाम वेळ काढून सोऽहं साधना करावी लागेल.

सततच्या प्रयत्नाने या साधनेला एक खोली प्राप्त होईल. त्याबरोबर मनात सोऽहं बोध ठसत जाईल. एकदा सोऽहं बोध ठसला म्हणजे जपाची यांत्रिकता संपून जाईल. सोऽहं हे महावाक्य आहे. आणि महावाक्याबद्दल समर्थ म्हणतात-

'महावाक्य उपदेश भला। परी त्याचा जप नाही बोलीला।
तेथींचा तो विचारची केला। पाहिजे साधके।।'

आपण देह नसून ब्रह्म आहोत याचे जर सतत भान ठेवले तर आपले सगळे व्यवहार बदलून जातील. स्वामी विवेकानंद म्हणायचे 'जर शेतकऱ्याला कळले की तो ब्रह्म आहे तर तो आदर्श शेतकरी होईल. जर एखाद्या कामगाराला कळले की आपण ब्रह्म आहोत तर तो पाट्या टाकल्यासारखे काम करणार नाही. म्हणून वेदांताचा हा विचार देशाच्या कानाकोपऱ्यात पोहोचला पाहिजे.' समर्थांच्या मते ही सोऽहं साधना अत्यंत सहज आहे. जिथे श्वासोच्छ्वास आहे तिथे सोऽहं साधना चालू आहेच. आपण फक्त प्रयत्नपूर्वक ते ऐकायचे आहे. म्हणून सोऽहं जपाला अजपाजप म्हणतात. समर्थ सांगतात-

'ऐसी ही अजपा सकळासी। परंतु कळे जाणत्यासी।
सहज सांडोनी सायासी। पडोची नये।।
सहज देव असतची असे। सायासे देव फुटे नासे।
नासिवंत देवासी विश्वासे। ऐसा कवणु।।'

समर्थांनी दशक १४ समास ८ मधे अखंड ध्यानाची साधना सांगितली आहे. मी देह नसून आत्मा आहे हा नियम जसा मला लागू आहे तसा सर्व जगाला लागू नाही का? माझ्याप्रमाणेच यच्चयावत जीवसृष्टि परमात्मस्वरूप आहे. जीवनात मला अनेक लोकांशी व्यवहार करावे लागतात. जर मी परमात्म्याशी व्यवहार करतो आहे अशी धारणा असेल तर दुसऱ्याला फसवता येईल का? माझ्या एका डॉक्टर मित्राने त्याच्या हॉस्पिटलमध्ये गोंदवलेकर महाराजांचे मंदिर बांधले आहे. पेशंटच्या प्रत्येक कॉटजवळ जपाची माळ आणि महाराजांच्या प्रवचनाचे पुस्तक ठेवले आहे. पेशंट तपासण्याच्या खोलीत त्यांनी पाटी लावली आहे. 'माझ्यासमोर बसलेला प्रत्येक पेशंट प्रत्यक्ष महाराज आहेत असे समजून मी त्याला तपासत असतो.' अशी भावना असल्यास रुग्णाकडून खोटे पैसे घेतले जातील का? म्हणून समर्थ म्हणतात की सर्वांच्या अंतर्यामी परमात्मा पाहण्याची ही साधना अखंड करता येईल हेच अखंड ध्यान होय आणि या ध्यानासाठी डोळे मिटण्याची गरज नाही. सद्गुरू दिगंबरदास महाराज म्हणत असत- 'मला उघड्या डोळ्यांनी ध्यान करणारा मनुष्य हवा आहे. अखंड सावधानता हेच अखंड ध्यान होय.' श्रीमद् दासबोधात समर्थ म्हणतात-

'प्राणिमात्री जगदांतरे। म्हणोनि राखावी अंतरे।
दाता भोक्ता परस्परे। सकळ काही।।
देव वर्तती जगदांतरी। तोचि आपुले अंतरी।
त्रैलोकीचे प्राणिमात्री। बरे पाहा।।
अंतरनिष्ठ जो पुरूष। तो अंतरनिष्ठेने विशेष।
जगामध्ये जो जगदीश। तो तयास वोळखे।।
नयनेचि पाहावा नयन। मने शोधावे मन।
तैसाचि हा भगवान। सकळा घटी।।
अखंड ध्यानाचे लक्षण। अखंड देवाचे स्मरण।
याचे कळता विवरण। सहजचि घडे।।'

साधक जेव्हा एकीकडे सोऽहं बोध ठेवेल आणि दुसरीकडे सर्वत्र परमात्मा बघेल तेव्हा हळूहळू त्याच्या लक्षात येईल की या जगात फक्त ते ब्रह्मच अस्तित्वात आहे. देह, मन आणि इंद्रिय यांच्या पातळीवरील आपले अस्तित्व केवळ भासमान आहे. जर प्रत्येकाच्या अंतर्यामी असलेल्या ब्रह्मतत्त्वाचे अनुसंधान असेल तर अभिव्यक्तीतील भेद व्यवहारापुरते पाळले जातील, त्या भेदाच्या भिंती उभ्या राहणार नाहीत. अभिव्यक्ती कशीही असली तरी त्यामुळे आत्मस्वरूप दुषित होत नाही. समर्थ म्हणतात-

'ब्राह्मणाचे ब्रह्म ते सोवळे। शूद्राचे ब्रह्म ते वोवळे।
ऐसे वेगळे आगळे। तेथे असेचिना।।
उंच ब्रह्म ते रायासी। नीच ब्रह्म ते परिवारासी।
ऐसा भेद तयापासी। मुळीच नाही।।'

समर्थांनी तर भजनाची व्याख्या केली आहे-

'भेटो कोणी येक नर। धेड महार चांभार।
त्याचे राखावे अंतर। या नाव भजन।।'

सगळ्याच संतांनी भक्तीमार्गात अशा प्रकारचा अद्वैत बोध निर्माण केला. ज्ञानदेवांनी देखील प्रत्येक जीवात भगवंत पाहणे यालाच भक्ती म्हटले आहे. संकीर्णता, जातीभेद, सांप्रदायिक कट्टरता, विद्वेष या सर्व गोष्टींना कोणत्याही संतांनी पाठिंबा दिला नाही. सामाजिक एकात्मतेची ही परंपरा ज्ञानदेवांपासून समर्थांपर्यंत सगळ्या संतांनी जतन केली. सर्वांची अंतरे राखून भजन साधले.

## जोपर्यंत जाणीव, तोपर्यंत अज्ञानच

समर्थांनी भक्तीमार्गामध्ये ज्याप्रमाणे अखंड नामस्मरण सांगितले, त्याप्रमाणे

ज्ञान मार्गात अखंड ध्यान सांगितले. अंतर्यामी अखंड सोऽहंचा बोध आणि बाहेर अखंड परमात्मस्वरूपाचा बोध ठेवायला समर्थ सांगतात. परमात्मस्वरूप अव्यक्त, अचिंत्य, नि:शब्द, नि:संग असे आहे. साधक जेव्हा परमात्मस्वरूपाचे चिंतन करतो तेव्हा तो द्वैतात असतो. पण परमात्मस्वरूप तर अद्वैत आहे. त्याचे चिंतन करता येत नाही. पण म्हणून चिंतन करावयाचे सोडून दिले तर मन शून्यामध्ये अडकण्याची शक्यता असते. म्हणून स्वत:ला विसरून परमात्म्याचे स्मरण करावे लागेल. परब्रह्माला जाणताना 'मी परब्रह्माला जाणतो आहे.' ही वृत्ती शिल्लक ठेवून चालत नाही. लौकिक व्यवहारातील सगळे अनुभव देहबुद्धीच्या पातळीवरील असतात. असे अनुभव घेताना मन पूर्णपणे मावळावे लागते. वृत्तीशून्य झाल्याशिवाय त्याची अनुभूती येणार नाही. मन मूळात येकदेशी आहे आणि परमात्मस्वरूप तर सर्वत्र आहे. त्यामुळे परमात्मस्वरूप जाणण्यासाठी मनाच्या साहाय्याने केलेला प्रत्येक उपाय हा अपाय ठरणार आहे. कल्पना करीत राहणे हा मनाचा स्वभाव आहे तर परमात्मस्वरूप कल्पनातीत आहे. मग परमात्म्याचे चिंतन करावे तरी कसे?

दशक ७ समास ७ मधे समर्थ म्हणतात की परमात्मस्वरूप निर्विकल्प आहे, त्याची कल्पना करावी, पण 'मी परमात्म्याच्या निर्विकल्प स्वरूपाचे चिंतन करतो' असे कर्तेपण किंवा अशी वृत्ती शिल्लक ठेवू नये. ध्यानाची साधना करावी पण 'मी ध्यान करतो आहे ही वृत्ती टाकून द्यावी' साधन देह करतो आहे आणि मी काही देह नाही असे समजून आपली भूमिका अकर्तेपणाची ठेवावी. जोपर्यंत जाणीवेचा प्रांत आहे तोपर्यंत अज्ञानच आहे. मला ज्ञान झाले ही जाणीवसुद्धा शिल्लक राहू नये. आत्मस्वरूपाचे वर्णन करता येत नाही ते अनुर्वाच्य आहे. कारण आत्मदर्शनात ब्रह्माचा अनुभव घेणारा ब्रह्मामध्ये विलीन होऊन जातो. केवळ आत्मस्वरूप शिल्लक राहते. ब्रह्मानुभवाच्या वेळी साधक संपूर्ण वृत्तीशून्य किंवा नि:ष्कंप, नि:स्पंद, नि:शब्द होतो. या स्थितीत तो अनुभवत असलेल्या अवस्थेचे वर्णन करू शकत नाही. ज्यावेळी तो वर्णन करू लागतो त्यावेळी अनुभवाची अवस्था संपलेली असते. त्याची स्मृती शिल्लक असते. एखादा मनुष्य गाढ झोपला असताना आपण जर त्याला विचारले की काय गाढ झोपला वाटते तर त्या माणसाने या प्रश्नाचे काय उत्तर द्यावे? तो जर हो म्हणाला तर याचा अर्थ तो गाढ झोपलेला नाही. सकाळी उठल्यानंतर रात्रभर मिळालेली विश्रांती त्याला जाणवेल व गाढ झोपेची त्याला आठवण होईल. तथापि जागेपणी गाढ झोपेचे केलेले वर्णन कधीही परिपूर्ण असणार नाही. ब्रह्मानुभवाच्या अनुभवाचे देखील असेच आहे. समर्थ म्हणतात-

'शब्दाकरिता कळे अर्थ। अर्थ पाहाता शब्द वेर्थ।
शब्द सांगे ते यथार्थ। परी आपण मिथ्या।।
शब्दाकरिता वस्तु भासे। वस्तु पाहाता शब्द नासे।
शब्द फोल अर्थ असे। घनवटपणे।।
शब्द बोलोनि राहे। अर्थ शब्दापूर्वीच आहे।
या कारणे न साहे। उपमा तया अर्थासी।।
भूस सांडून कण घ्यावा। तैसा वाच्यांश त्यजावा।
कण लक्ष्यांश लक्षावा। शुद्ध स्वानुभवे।।'

भावनांच्या अभिव्यक्तीचे शब्द हे अत्यंत प्रभावी साधन आहे. पण परमात्मस्वरूपाचे वर्णन करताना शब्द फार तोकडे पडतात. आत्मज्ञानाचे वर्णन शब्दाद्वारे पूर्णपणे करता आले नाही तरी त्याची थोडी झलक प्राप्त होऊ शकते. बोलून कळत नाही आणि बोलल्याशिवाय कळत नाही असे त्याचे यथार्थ वर्णन समर्थ करतात. यासाठी वाच्यांश आणि लक्ष्यांश या दोन शब्दांचा प्रयोग समर्थ करतात. वाच्यांशामध्ये केवळ शब्दार्थ असतो तर लक्ष्यांशामध्ये त्याचे मर्म असते. पारमार्थिक ग्रंथांचे नुसते श्रवण केल्याने वाच्यांश कळेल पण त्याचे मनन चिंतन केल्याने लक्ष्यांशाचे ज्ञान होईल. म्हणून श्रवणाबरोबर मनन, चिंतन आणि निदीध्यास या पायऱ्या समर्थ सांगतात.

## ज्ञानोत्तर भक्ती

महाराष्ट्रातील सर्वच संतांनी अद्वैतबोधाचा स्वीकार केला. परंतु हा अद्वैत बोध भक्तीतून जन्माला आला. म्हणून सर्व संतांनी ज्ञानोत्तर भक्तीही सांगितली. ज्ञानी माणसांनी सामान्य माणसांना मार्गदर्शन करावयाचे असते. असे मार्गदर्शन करताना स्वत: प्रत्यक्ष साधना करून आदर्श ठेवावा लागतो. मला ज्ञान झाले तेव्हा भक्तीची गरज नाही अशी भूमिका जर मार्गदर्शन करणाऱ्याने ठेवली तर सामान्य मनुष्य ही भक्ती करणार नाही म्हणून समर्थ सांगतात.

'प्रकृतीसारिखे चालावे। परी अंतरी शाश्वत वोळखावे।
सत्य होऊन वर्तावे। लोकांऐसे।।
शिष्यास न लाविती साधन। न करविती इंद्रिय दमन।
ऐसे गुरू अडक्याचे तीन। मिळाले तरी त्यजावे।।'

समर्थांनी या ठिकाणी तर्काचा वापर करून एक सुंदर मुद्दा मांडला. माणसाला जरी ज्ञान झाले असले तरी तहान लागते, भूक लागते. आपले कोण आहे, परके कोण आहे लक्षात येते. मग भजन केले तरी बिघडले कुठे? ज्ञान

झाले म्हणून संसार काही सोडला नाही, मग भक्तीच का सोडायची? उलट समर्थांच्या मते एखादा ज्ञानी मनुष्य ज्ञानानंतर भक्ती सोडून देईल तर त्याला लोकसंग्रहाच्या कार्यात यश मिळणार नाही. जर ज्ञान आणि भक्ती या दोन शक्ती एकत्र आल्या तर लोकसंग्रह आणि समाज संघटन यामध्ये त्याला यश येईल. समर्थ म्हणतात-

'निर्गुणी ज्ञान जाले। म्हणोन सगुण अलक्ष केले।
तरी ते ज्ञाते नागवले। दोहिंकडे।।
नाही भक्ती नाही ज्ञान। मध्येच पैसावला अभिमान।
म्हणौनिया जपध्यान। सांडूच नये।।
सांडील सगुण भजनासी। तरी तो ज्ञाता परी अपेसी।
म्हणौनिया सगुणभजनासी। सांडूचि नये।।
दोनी सामर्थ्ये येक होता। काळास नाटोपे सर्वथा।
तेथे इतरांची कोण कथा। कीटकन्याये।।'

अनेकदा केवळ ज्ञानमार्गाने अहंकार वृद्धी होऊ शकते. भक्तीमध्ये सारे काही भगवंताच्या कृपेने घडत असल्याचा भाव असतो. आपल्याला त्याच्या कृपेमुळे ज्ञान झाले याची भक्ताला जाणीव असते. त्यामुळे अहंकाराचा धोका टळतो. समर्थ म्हणतात-

'रघुनाथ स्मरोनि कार्य करावे। ते तात्काळचि सिद्धी पावे।
कर्ता राम हे असावे। अभ्यांतरी।
मी कर्ता ऐसे म्हणसी। तेणे तू कष्टी होसी।
राम कर्ता म्हणता पावसी। येश कीर्ती प्रताप।।'

अहंकारामुळे सत्कर्मांवर किंवा उपासनेवर बोळा फिरवला जातो. जे पदरात पडायला पाहिजे ते पडत नाही. ज्याला धर्मसंस्थापनेचे कार्य करावयाचे आहे, लोकांना सन्मार्गाला लावायचे आहे त्याने भक्तीमार्गाची कास धरावी. म्हणजे सामान्य माणसाची सोय होते. शंकराचार्य अद्वैतवादी होते, तरी देखील त्यांनी विविध देवदेवतांची स्तोत्र रचली ती यासाठीच. समर्थांनी देखील करूणेपोटी ज्ञानोत्तर भक्ती स्वीकारली.

## श्रीमद् दासबोधातील राजकारण

समर्थ रामदास केवळ संत नव्हते तर आचार्य देखील होते. आचार्यांवर धर्मसंस्थापनेची फार मोठी जबाबदारी असते. सामान्य माणसाला क्रियाशील करण्याचे उत्तरदायित्व त्यांच्यावर असते. मानवी जीवनाचा सर्वांगीण विचार

त्यांना करावा लागतो. म्हणून समर्थांनी आपल्या संप्रदायात ज्ञानोत्तर भक्तीबरोबर राजकारणाचा देखील अंतर्भाव केला. समर्थ संप्रदायाची चतु:सूत्री पुढीलप्रमाणे होती-

'मुख्य हरिकथा निरूपण। दुसरे ते राजकारण।
तिसरे ते सावधपण। सर्व विषयी।।
चवथा अत्यंत साक्षेप। फेडावे नाना आक्षेप।
अन्याये थोर अथवा अल्प। क्षमा करीत जावे।।'

वस्तुत: आपली सगळी दैवते राजकारणी होती. समर्थांचे सद्गुरू रामचंद्र हे तर राजघराण्यातलेच होते. त्यामुळे राज्यकारभार चालवण्यासाठी राजनीतिचा अवलंब करून दुष्टांचे निर्दालन करणे हे त्यांचे विहीत कर्मच होते. समर्थांच्या काळात यावनी सत्तेने हिंदुस्थानात अत्याचारांचा कळस गाठला होता. अशावेळी हिंदूंचे स्वतंत्र सिंहासन निर्माण होणे आवश्यक होते. त्यासाठी छत्रपती शिवाजी महाराजांनी आपल्या मातेच्या प्रेरणेने आणि पित्याच्या छुप्या पाठिंब्याने स्वराज्याच्या कार्याला प्रारंभ केला होता. शिवछत्रपतींचे अनेक नातलग यावनी चाकरीत गुंतले होते. त्यांना स्वराज्याच्या कार्यात ओढण्यात महाराजांना यश आले नाही. अशा वेळी जनसामान्यांच्या मनात शिवाजी महाराजांच्या स्वराज्य संस्थापनेच्या कार्याविषयी विश्वासाची भावना निर्माण करणे आवश्यक होते. समर्थांनी नेमके ते काम केले आणि त्यासाठी राजकारणाचा संप्रदायात अंतर्भाव केला. श्रीमद् दासबोधात राजकारणासंबंधीचे तीन समास येऊन जातात. १) दशक ११ समास ५ २) दशक १८ समास ६ ३) दशक १९ समास ९ श्रीमद् दासबोधात राजकारण हा शब्द २७ वेळा येऊन गेला आहे. याखेरीज राजकारण शब्दाचा प्रयोग नाही पण राजकारणाचा आशय किंवा सूचना आहे अशा अनेक ओव्या आढळतात. उदाहरणार्थ-

'करणे असेल अपाये। तरी बोलोन दाखवू नये।
परस्परेची प्रत्यये। प्रचितीस आणावा।।
नष्टास नष्ट योजावे। वाचाळास वाचाळ आणावे।
आपणावरी विकल्पाचे गोवे। पडोंचि नेदी।।
घटासी आणावा घट। उद्धटासी पाहिजे उद्धट।
खटनटासी खटनट। अगत्य करी।।'

याखेरीज दासबोधात चातुर्य लक्षण नावाचे तीन समास आहेत. त्या समासातील व्यवहार चातुर्याची शिकवण राजकारणी पुढाऱ्याला उपयोगी पडणारी आहे. समर्थांच्या दासबोधेतर वाङ्मयात तर राजकारणाचे संदर्भ खूपच येतात.

उदाहरणार्थ-

'बुडाला औरंग्या पापी। म्लेंच्छ संहार जाला।
मोडिली मांडिली क्षेत्रे। आनंदवनभुवनी।।
बुडाले सर्वही पापी। हिंदुस्थान बळावले।
अभक्ताचा क्षयो जाला। आनंदवनभुवनी।।'

या ओव्यांमध्ये राजकारण हा शब्द कुठेही नसला तरी तत्कालीन राजकारणाचा उघड उघड संदर्भ येथे आढळतो.

'देवद्रोही तितुके कुत्ते। मारोनी घालावे परते।
देवदास पावती फत्ते। यदर्थी संशयो नाही।।
धर्माकरता मरावे। मरोनी अवघ्यासी मारावे।
मारता मारता घ्यावे। राज्य आपुले।।
मराठा तितुका मेळवावा। आपला महाराष्ट्र धर्म वाढवावा।
येविषयी न करता तकवा। पूर्वज हांसती।।'

या ओव्या तत्कालीन राजकीय उलाढालींचा स्पष्ट आलेख सादर करतात. 'महाराष्ट्र धर्म' हा शब्द समर्थांचे राजकारणावर प्रकाश टाकतो.

'महाराष्ट्र धर्म' हा शब्द समर्थांनी शिवछत्रपतींनी महाराष्ट्रात जी स्वराज्याची चळवळ उभारली त्याला उद्देशून वापरला आहे. म्हणून छत्रपतींना लिहिलेल्या पत्रात- 'महाराष्ट्र धर्म राहिला काही। तुम्हा कारणे।।' असे समर्थ लिहितात. यावनी सत्तेचे दुष्परिणाम संपूर्ण हिंदू समाज भोगत होता. इंग्रजांच्या राजवटीतही सावरकर, टिळक, वासुदेव बळवंत, मदनलाल धिंग्रा या देशभक्तांचे कसे हाल झाले ते आपण पाहतो. तेव्हा निदान महाराष्ट्रात तरी राजकीय सत्ता हिंदूंच्या हातात असली पाहिजे हा समर्थांचा आग्रह होता. सुदैवाने भोसले घराण्यातील पुण्यश्लोक जिजाबाई, शिवछत्रपती आणि शहाजी राजे त्याच उद्योगाला लागले होते. म्हणून त्यांच्या या उद्योगाला पाठिंबा देणे समर्थांना आवश्यक वाटले. म्हणून दासबोधात राजकारणाच्या तीन समासांचा अंतर्भाव त्यांनी केला.



# समर्थांच्या आरत्या

आरती हा वाङ्मय प्रकार मराठी भाषेत फार पूर्वीपासून चालत आलेला आहे. संत नामदेवांनी विठ्ठलाची केलेली 'युगे अठ्ठावीस विटेवरी उभा' ही आरती प्रसिद्ध आहे. परंतु अलिकडे देवांच्या ज्या महत्त्वाच्या आरत्या म्हटल्या जातात, त्यातील बऱ्याच आरत्या समर्थांनी रचलेल्या असल्यामुळे आरती म्हटलं की समर्थांचीच आठवण होते. भगवंताचे पूजन केल्यावर किंवा चिंतन केल्यावर भक्ताचे अंत:करण आर्तभावाने दाटून येते. त्यावेळी त्याने भगवंताच्या रूपाचे आणि गुणांचे केलेले गायन म्हणजे आरती होय. अध्यात्म म्हणजे काही रूक्ष गोष्ट नव्हे. आपले सारे संत रसिक आणि प्रेममय होते. आपली संस्कृती भावमयी आणि रसप्रधान आहे. काकड आरती म्हणून देवाला उठवणे, शेजारतीचे गायन करून देवाला झोपविणे तसेच दुपारचा नैवेद्य दाखवून झाला म्हणजे भगवंताची आरती म्हणणे हा सर्व प्रकार काव्यमय, आनंदमय आणि भावमय आहे. आपल्याकडे देव आणि भक्त यांचे नाते संगीतमय आहे. अनेक मंदिरात सकाळी भुपाळ्या लावल्या जातात. होनाजी बाळा यांची 'घन:शाम सुंदरा' ही भूपाळी आजही ताज्या फुलाप्रमाणे मन मोहित करते.

समर्थांनी काकड आरती, शेजारती आणि नैवेद्याच्या वेळेची आरती अशा सर्व प्रकारच्या आरत्या रचल्या आहेत. सगुण प्रेम समर्थांच्या वाङ्मयात आपल्याला जागोजागी दिसून येते. काकड आरतीत त्यांनी केलेले रामाचे हे वर्णन किती गोड आहे पाहा-

'उठोनिया प्रात:काळी। मूर्ति चिंतावी सावळी।  
शोभे योगियांचे मेळी। हृदयकमळी साजिरी।।ध्रु.।।  
राम सर्वांगे सुंदर। कासे मिरवे पितांबर।  
चरणी ब्रीदाचा तोडर। करूणाकर भक्तांचा।।१।।  
राम आनंदाची राशी। राम कैवारी देवांसी।

राम भक्तांचे मानसी। अहिर्निशी शोभत।।२।।
राम तापसा आधार। राम पुण्याचे माहेर।
राम ध्यातो गौरीहर। निरंतर मानसी।।३।।
राम विश्रांतीचे स्थळ। राम आनंद केवळ।
रामदास सर्वकाळ। कंठी वेळ ऐसाचि।।४।।'

समर्थांच्या बहुतेक काकड आरत्या रामचंद्रांच्या असून त्यामध्ये रामचंद्रांचे प्रासादिक वर्णन आढळते. एकच काकड आरती हनुमंताची आहे तर एका काकड आरतीत अनेक देवांची आणि ऋषींची नावे आहेत. भगवंताच्या चिंतनात स्नान हा प्रभात समयीचा एक उपचारच असतो. आश्चर्याची गोष्ट म्हणजे अशाच एका काकड आरतीत प्रात:काळच्या स्नानाचा उल्लेख करून समर्थांनी चक्क पन्नास नद्यांची नावे दिली आहेत. यावरून समर्थांची स्मृती किती तल्लख असेल याची कल्पना करता येते. संगीतावरील अशाच एका काव्यात समर्थांनी बेचाळीस वाद्यांची नावे दिली आहेत तर पाकशास्त्रावरील मानसपूजा प्रकरणात खाद्यपदार्थांचे सत्तर-ऐंशी प्रकार दिले आहेत. समर्थांची अद्‌भूत प्रतिभा आणि स्मृती पाहून मन थक्क होते. एक काकड आरती साधकांसाठी लिहिली आहे तर सांसारिक लोकांसाठी केलेल्या काकड आरतीत दोषांचा त्याग करून नरदेहाचे सार्थक करायला सांगितले आहे.

समर्थांनी शेजारत्यादेखील लिहिल्या आहेत. एका शेजारतीत स्त्रिया भगवंताला झोपवित आहेत अशी कल्पना करताना चत्वार मुक्ती आणि नवविधा भक्ती अशा त्या स्त्रिया असून मानस मंचकावर त्या रामचंद्रांना निजवित आहेत. एका शेजारतीत रात्री निजणे म्हणजे भगवंताशी ऐक्य साधणे अशी कल्पना करून अद्वैत बोध मांडला आहे. समर्थ म्हणतात-

'परमात्मा श्रीराम महामाया जानकी।
विश्रांती पावली गजर न कीजे सेवकी।।१।।
आरती आरत ऐक्यभावे ओवाळू।
प्रकाश स्वयंज्योती निजतेजे बंबाळू।।२।।
स्नेह ना भाजन नाही वाती पावक।
सबाह्य अभ्यंतरी अवघा निघोर दीपक।।३।।
ऐक्याचे सुमन शेजे आत्मा रघुपती।
वाचा वरूणली शब्द न बोलवे पुढती।।४।।
राम आणि दास दोघे पहुडले रामी।
हे ही बोलावयासी दुजा न उरे धामी।।५।।'

या शेजारतीत समर्थांचे मन आणि इंद्रिये आत्मस्वरूपात विलीन झाली आणि त्यांना अद्वैत बोध प्राप्त झाला ते दिसून येते. याचा अर्थ रामाच्या सगुण रूपाचा आश्रय घेऊन समर्थ निर्गुणाची प्राप्ती करून घेतात. आणखी एका शेजारतीत अशाच प्रकारे समर्थांनी भगवंताची निद्रा म्हणजे भक्ताची मौनवाचा आणि समाधी स्थिती असे म्हटले आहे. झोपेतील शांतता, एकांत, मौन या सर्व गोष्टींचा समर्थ अद्वैत बोधासाठी किंवा देव भक्तांच्या ऐक्यासाठी उपयोग करतात. काकड आरती आणि शेजारती यामध्ये आपल्याला राम, लक्ष्मण, सीता आणि हनुमान यांच्याभोवती समर्थांचे भावविश्व कसे गुंफले होते ते दिसून येते. आपण ज्याला मूर्ती म्हणतो ते साक्षात भगवंत असून माणसाप्रमाणेच भगवंत झोपतात, भगवंत उठतात किंवा भगवंत जेवतात ही कल्पना किती काव्यमय आहे. अनेक मंदिरांमध्ये शेजारतीच्या वेळेला शेजघरात भगवंताला झोपवण्याचा भावपूर्ण उपचार सादर केला जातो. समर्थांनी काकडआरती आणि शेजारती त्याप्रमाणे दुपारच्या नैवेद्याच्या वेळी म्हणावयाच्या आरत्याही खूप रचल्या आहेत. अशा आरत्यांची संख्या सुमारे ७० ते ७५ भरेल. विशेष म्हणजे समर्थांनी श्रीराम आणि हनुमान या त्यांच्या आराध्य दैवतांखेरीज विठ्ठल, शंकर, खंडोबा, व्यंकटेश, गणपती, बुद्धदेव, तुळजाभवानी, शांतादुर्गा, नरसिंह, सूर्यनारायण या सर्व देवांच्या आरत्या केल्या आहेत. याचा अर्थ समर्थांच्या मनात दैवतांच्या संदर्भात कोणताही दुजाभाव नव्हता. एका आरतीत त्यांनी निवृत्ती, ज्ञानदेव, सोपान, मुक्ताबाई, चांगदेव, सुरदास, मीराबाई, जसवंत, कान्होपात्रा, कुर्मदास, चोखामेळा, रोहिदास, बंका या सर्व संतांना वंदन केले आहे. याखेरीज समर्थांनी आळंदीला गेले असताना ज्ञानेश्वर महाराजांची स्वतंत्र आरती केली आहे. गोरठे येथील दासगणू महाराजांच्या समाधी मंदिरात ही आरती दर गुरूवारी म्हटली जाते. वारकरी मंडळीसाठी ही आरती मुद्दाम या ठिकाणी देत आहोत-

'कलीयुगी त्रासुनी गेले सज्जन भव उष्णे।  
ते समयी अवतारा घेऊनि श्रीकृष्णे।।  
तोषविले सज्जन त्या नाना प्रश्ने।  
तेणे निरसुनि गेले अज्ञान तृष्णे।।  
जय देव जय देव जय ज्ञानदेवा।  
मंगल आरती करतो दे स्वपद ठेवा।।ध्रु.।।  
गीतादेवी केली सोपी सकळाला।  
निर्जरगुरू परिसुनिया घोटिती मुखलाळा।।  
टीकारूपी घालुनी दासाला माळा।  
तेणे छेडूनि नेली अज्ञान ज्वाळा।।१।।

करिता वाद द्विजांशी रेडा बोलविला।
विप्रांचा गर्वनिधी तेणे कालविला।।
अज्ञानांध:कार ज्ञाने घालविला।
ब्रह्मज्ञाने मत्सरदीप मालविला।।२।।
दासांचा सारथी म्हणवुनी मी तुजला।
बाहता दीनदयाळा न पवसि का मजला।।
नुल्लंघिसी या मां ते अज्ञविपिन मजला।
दास म्हणे मम जीव हा तद्योगे बुजला।।३।।'

सर्व संतांच्याबद्दल समर्थांच्या मनात कसा पूज्यभाव होता ते यावरून दिसून येते. हनुमंत आणि राम हे तर समर्थांचे सद्‌गुरू आणि आराध्य दैवत होते. त्यामुळे ह्या दोघांच्या १७-१८ आरत्या समर्थांनी रचल्या. एका आरतीत समर्थांनी हनुमंताची जन्मकथा दिली आहे. पण ती वाल्मीकि रामायणातील हनुमंताच्या जन्मकथेशी सुसंगत नाही. दशरथाच्या यज्ञातील खीर घारीने पळविली असा उल्लेख वाल्मीकि रामायणात नाही. समर्थांनी ही कथा तुलसीदासांच्या रामचरितमानस वरून घेतली असावी. हनुमंताच्या आरत्यांमध्ये हनुमंताचे पराक्रम, त्याने केलेला राक्षसांचा संहार, त्याच्या शेपटीची करामत, हनुमंताचे उड्डाण या साऱ्यांचे पुन:पुन्हा वर्णन समर्थ करतात.

रामांच्या आरतीत समर्थ रामाच्या सगुण रूपाचे अत्यंत गोड वर्णन करतात. एका आरतीत रामाच्या निर्गुण स्वरूपाचे वर्णन करताना सर्वत्र रामच नटलेला आहे असा चिद्‌विलासवाद समर्थ मांडतात. उलट हे संबंध विश्व प्रभू रामच असून विश्वातील विविधतेने रामाचे एकत्व खंडित होत नाही असे समर्थ म्हणतात. 'सत्राणे उड्डाणे हुंकार वदनी' ही त्यांची मारुतीची आरती वीररसाचे उत्कट उदाहरण आहे. रामकथा सांगून झाल्यावर म्हणावयाची स्वतंत्र आरती समर्थ रचतात. 'सुखकर्ता दु:खहर्ता' ही गणपतीची आरती, 'लवथवती विक्राळा ब्रह्मांडी माळा' ही शंकराची आरती, 'दुर्गे दुर्घट भारी तुजविण संसारी' ही तुळजाभवानीची आरती समर्थांनीच रचली असून ह्या तिन्ही आरत्या अत्यंत लोकप्रिय ठरल्या आहेत. समर्थांनी दशावतारांच्या आरत्या केल्या आहेत. त्यातील कलंकी अवतार हा यवनांचा नाश करणारा अवतार आहे असे समर्थ म्हणतात. व्यंकटेश बालाजीची आरती करताना तिरूपती येथील सोन्याचा लखलखाट समर्थांच्या नजरेतून सुटला नाही. समर्थांनी गणपतीची आणखी एक आरती रचलेली आहे. त्यामध्ये गणपतीने चंद्राला दिलेल्या शापाची कथा तर आहेच पण त्याचबरोबर भगवान श्रीकृष्णांना हा शाप कसा भोवला तेदेखील समर्थ सांगतात.

श्रीकृष्णाने भाद्रपद शुद्ध चतुर्थीला चंद्राकडे पाहिल्यामुळे त्यांच्यावर स्यमंतक मणी चोरल्याचा आळ आला होता. समर्थांनी मत्स्य, कूर्म, वराह, नरसिंह, वामन, परशुराम यांच्यादेखील आरत्या केल्या आहेत. आपल्या भक्ताला कुणी त्रास दिलेले भगवंताला आवडत नाही म्हणून भक्ताच्या रक्षणासाठी भगवंत वारंवार अवतार घेतो असे ते म्हणतात. समर्थांच्या घराण्यात सूर्योपासना परंपरेने चालत आलेली असल्यामुळे समर्थांनी सूर्याची देखील आरती केलेली आहे. आपल्या वंशात सूर्योपासना चालत आलेली आहे याचा समर्थांना अभिमान वाटतो.

भारतभ्रमण करीत असताना समर्थांनी वेगवेगळ्या तीर्थक्षेत्री अनुष्ठान केले. तेथील जागृत दैवताची त्यांनी आरती केली. तुळजापूरला आले असताना 'दुर्गे दुर्घट भारी' ही तुळजाभवानीची आरती केली. कोल्हापूरला अंबाबाईचे दर्शन घेतले असताना 'मर्दिला कोल्हासूर ख्याती केली की थोर' ही महालक्ष्मीची आरती केली. गोव्यात गेले असताना शांतादुर्गेची तर लाडकारंजा येथे आले असताना नृसिंह सरस्वतीची आरती केली. नृसिंह सरस्वतींच्या आरतीमध्ये समर्थांनी गुरूचरित्रातील काही प्रसंगाचे संदर्भ दिले आहेत. समर्थांनी सद्‌गुरूच्या दोन आरत्या केल्या आहेत. त्यातील एका आरतीत आपले सद्‌गुरू राम असल्याचा स्पष्ट उल्लेख आहे. श्रीरामांचे कर्तृत्व वर्णन करताना समर्थ म्हणतात-

'होऊनि सकृप मूढां तू हाती धरिसी।
अघनग भस्म करोनि त्याते उद्‌धरिसी।।
स्पर्शुनि मस्तकी पाणी त्या ब्रह्म करिसी।
आत्मस्वरूपा दाविसी होऊनिया अरसी।।'

कोल्हापूर-रत्नागिरी रस्त्यावर केदाराचे मंदिर आहे. समर्थांनी तेथील शंकराचे दर्शन घेतल्यावर केदाराची देखील आरती केली. मूळातील केदार हिमालय पर्वतात आहे म्हणून रत्नागिरीजवळील केदाराचा उल्लेख करताना 'उत्तरेचा देव दक्षिणे आला' असे समर्थ म्हणतात. या केदाराने रत्नासूर राक्षसाचा वध केला म्हणून त्या गावाला रत्नागिरी हे नाव पडले. दत्तात्रयांच्या आरतीत समर्थांनी अनुसूयेने तिन्ही देवांना बालक केल्याची कथा दिली आहे. समर्थांनी भगवद्‌गीतेची देखील अतिशय सुंदर आरती केलेली आहे. या आरतीत भगवद्‌गीतेची फलश्रुती सांगताना समर्थ म्हणतात-

'एकनिष्ठे प्राणी भगवद्‌गीतेस।
पारायण करिता तो पावे भाग्यास।।
अंति सायुज्जता पावे मुक्तीस।
त्याला देखुनि कंप सुटे यमास।।

श्लोक श्लोकार्धासि नित्य उच्चारी।
प्राणी तो कदापि न पडे अंधारी।।
त्याचे संन्निध नित्य राहे मुरारी।
दास म्हणवोनि ध्यातो अंतरी।।'

समर्थ भगवद्गीतेला कृष्णाच्या मुखातून बाहेर पडलेली कन्या म्हणतात. समर्थांचा कार्यारंभ कृष्णाकाठी झाला. कृष्णानदी ही त्यांची अत्यंत आवडती नदी. म्हणून त्यांनी कृष्णानदीची देखील स्वतंत्र आरती केली आहे.

समर्थांनी भगवान शंकराच्या आरतीत प्रारंभीच 'लवथवती' असे क्रियापद वापरले आहे. जेजुरीजवळ लवथवेश्वर नावाचे भगवान शंकरांचे ठिकाण आहे. तिथे समर्थ रात्री थांबले होते. लवथवेश्वरच्या मंदिरात रात्री कुणी मुक्काम करीत नसे कारण जो कोणी त्या मंदिरात रात्री थांबेल तो रात्रीच मंदिरात मरण पावेल अशी त्या मंदिराची ख्याती होती. सकाळी ग्रामस्थ मंडळी भीतभीतच मंदिराकडे आली तेव्हा समर्थ भगवान शंकराची पूजा करीत होते. पूजा झाल्यावर समर्थांनी 'लवथवती विक्राळा' ही आरती केली. याखेरीज समर्थांच्या शंकराच्या ३-४ आरत्या आहेत. एका शंकराच्या आरतीत ते म्हणतात-

'जे नर भक्ति-पुरस्सर जप तप स्तव करिती।
त्याते अष्टही सिद्धी स्वबलाने वरिती।।
शिव शिव या उच्चारे जे प्राणी मरती।
चारी मुक्ती येऊनि त्यांचा कर धरती।।'

भगवान शेषाने पृथ्वी मस्तकावर धारण केली म्हणून समर्थ शेषाची देखील आरती करतात. अशाप्रकारे आरती माध्यमातून समर्थांनी अनेक देवतांना आवाहन केले आहे. आरत्यामध्ये समर्थ स्वतःची बिरूदावली कधी दास म्हणून करतात तर कधी रघुकुलटिळक रामदास म्हणून करतात. याखेरीज रामी रामदास किंवा निजदास म्हणूनही ते आरतीमध्ये स्वतःचा उल्लेख करतात. 'दुर्गे दुर्घट भारी' या देवीच्या आरतीत 'प्रसन्न वदने प्रसन्न होसी निजदासा' असा स्वतःचा उल्लेख ते करतात तर आरतीच्या शेवटी आपला तुळजापूरचा शिष्य नरहरी याचा उल्लेख करतात.



# भौगोलिक स्थानांची वर्णन

समर्थांच्या काव्याला बहर यायला साधेसुधे निमित्त पुरते. भारतभ्रमणात जिथे त्यांचे मन रमले अशा अनेक भौगोलिक स्थानांचे वर्णन त्यांनी करून ठेवले आहे. समर्थ केवळ निसर्ग कवी नव्हते तर निसर्गप्रेमी देखील होते. नद्यांच्या उगम आणि नद्यांचा संगम हा त्यांच्या जिव्हाळ्याचा विषय होता. डोंगर, दऱ्या, कडे, कपारे, घळी याठिकाणी ते मनसोक्त हिंडले. अंगावरील एका वस्त्राने त्यांनी हिमालयाची बर्फाच्छादित शिखरे तुडवली. त्यांनी वर्णन केलेली काही भौगोलिक स्थाने ध्यानात येतात तर काही स्थाने लक्षात येत नाहीत. शिवथर घळीचा धबधबा समर्थांनी पाहिला आणि त्यांचे मन मोहरले. त्या धबधब्याचे त्यांनी केलेले हे सुंदर वर्णन पहा-

'गिरीचे मस्तकी गंगा। तेथुनि चालिली बळे।
धबाबा लोटती धारा। धबाबां तोय आदळे।।
गर्जतो मेघ तो सिंधु। ध्वनि कल्लोळ उठीला।
कड्यासी आदळे धारा। वात आवर्त होतसे।।
तुषार उठती रेणु। दुसरे रज मातले।
वातमिश्रित ते रेणु। सीतमिश्रित धुकटे।।
दराच तुटला मोठा। झाडखंडे परोपरी।
निबीड दाटली छाया। त्यामध्ये वोघ वाहाती।।
गर्जती स्वापदे पक्षी। नाना स्वरे भयंकरे।
गडद होतसे रात्री। ध्वनि कल्लोळ उठती।।'

ज्यांनी प्रत्यक्ष घळ आणि धबधबा पाहिला आहे, त्यांना समर्थांच्या विलक्षण प्रतिभाशक्तीचे निश्चितच कौतुक वाटेल. चंद्रगिरीच्या डोंगरात समर्थ अधूनमधून जाऊन राहत. या डोंगराचे देखील त्यांनी केलेले हे गोड वर्णन पहा-

'कृष्णा कोयना दोन्हीकडे। मध्ये पर्वताचे कडे।

मंजुळ पाहतां चहूंकडे। समाधान।।
तळी असती शेते भाते। त्यात फिरती आऊते।
नाना परीची मार्गस्थे। येती जाती।।
वरती सेरडे मेंढरे। गुरे सिंगरे वासरे।
ठायी ठायी गुराखी पोरे। क्रीडा करिती।।
भोवती डोंगराची थाटे। दिसती कडे आणि कपारे।
सवेंचि येती जाती धुकटे। झांकोळती।।
तळी पाहता आकाश। दिसे दुसरे कैलास।
तेथे जावया संतोष। वाटतसे।।'

समर्थांचे निरिक्षण किती सूक्ष्म होते ते या वर्णनावरून लक्षात येते.

आपण अनेक भौगोलिक स्थाने पाहतो. त्याचे गद्य भाषेतदेखील एवढे सुंदर वर्णन आपल्याला करता येणार नाही. चाफळच्या मंदिराचे वर्णन करताना मंडपाची लांबी, खांबांची संख्या, नक्षीकाम असलेल्या कमानींची संख्या समर्थ सांगतात. चाफळच्या रामनवमी उत्सवाचे वर्णन करताना १८ वाद्यांची नावे त्यांनी दिली आहेत. समर्थ रामनवमी उत्सवाला चाफळात थांबत नसत. चाफळ जवळील रामघळीत ते त्या काळात राहत असत. समर्थ उत्सवाचे वर्णन करताना लिहितात-

'उदंड यात्रेकरू आले। रंगी हरिदास मिळाले।
श्रोते वक्ते कथा चाले। भगवंताची।।
नाना पुष्पे माळा तुरे। पाहो जाता भडस पुरे।
रंग स्वर्गीचा उतरे। ठाई ठाई।।
गंधे सुगंधे केशरे। उदंड उधळती धुसरे।
जगदांतरे हरिहरे। वस्ति केली।।
दिवट्या हिलाल चंद्रज्योती। नळे आर्डाती उठती।
बाण हवाव्या झरकती। गगनामध्ये।
उदंड मनुष्यांची थाटे। दिसताती लखलखाटे।
येकमेकासी बोभाटे। बोलाविती।।
रथ देवाचा वोढिला। यात्रेकरां निरोप जाला।
पुढे जायाचा गलबला। ठाई ठाई।।
दास डोंगरी राहातो। यात्रा देवाची पाहतो।
देव भक्तासवे जातो। ध्यानरूपे।।'

समर्थांनी उत्तरेतील रथाची परंपरा महाराष्ट्रात आणली. चाफळचा

रामनवमीचा उत्सव किती भव्य प्रमाणात होत असेल याची कल्पना या वर्णनावरून येते.

महाबळेश्वरला एका झाडाखाली पावसात उभे असताना भोवतालच्या निसर्गाचे समर्थांनी टिपलेले हे शब्दचित्र पाहा-

'पसरले सरले गिरि साजरे। सरवटे धुकटे भरीते भरे।
बहुत वात झाडांत झडाडितो। वर तरू वरता चि कडाडितो।।
झिरपती झरती झरती झरे। न धरिता धरता निर वावरे।
बहुत पाभळ वोघ महीतळी। नभकटे धुकटे कटपाभळी।।
सरस रम्य रसाळ वनांतरा। हरित रंग सुरंग दिसे बरा।
दिसतसे रमणीय वसुंधरा। नूतन पल्लव हा तरू साजिरा।।'

जवळच्या दोन शब्दांत अनुप्रास साधल्यामुळे एक प्रकारची लयबद्धता या कवनात साधली आहे.



# एकवीस समासी : जुना दासबोध

एकवीस समासी ऊर्फ जुना दासबोध हा ग्रंथ समर्थांनी साधक दशेत असताना नासिक येथे लिहिला आहे. समर्थांचे भारतभ्रमणापूर्वीचे ग्रंथ भक्तीप्रधान आणि निवृत्तीप्रधान आहेत तर भारतभ्रमणानंतरचे ग्रंथ कर्मप्रधान अथवा प्रवृत्तीप्रधान आहेत. समर्थांना लहानपणापासूनच विश्वाची चिंता लागली होती. त्यावेळी ती चिंता ऐकीव माहितीवरती आधारित होती. भारतभ्रमणानंतर त्यांनी आपल्या डोळ्यांनी देशस्थिती पाहिली. परिस्थितीचे गांभीर्य त्यांच्या ध्यानात आले. उपासनेची शक्ती मिळाली. भगवंताचा आदेश प्राप्त झाला. त्यामुळे भारतभ्रमणानंतरच्या वाङ्मयात 'राघवाचा वर। पावलो सत्वर। जनाचा उद्धार। करावया।।' हा आत्मविश्वास होता. करूणाष्टके, आत्माराम आणि एकवीस समासी हे तीन ग्रंथ समर्थांनी नाशिकच्या वास्तव्यात लिहिले.

एकवीस समासी या ग्रंथाला एकवीस समासी किंवा जुना दासबोध हे नाव कुणी दिले ते कळणे कठीण आहे. समर्थांनी या ग्रंथाला स्वत:चेच म्हणजे रामदास हे नाव दिले होते असे याच ग्रंथाच्या नवव्या समासातील पहिल्या तीन ओव्यांवरून अथवा दहाव्या समासाच्या पहिल्या ओवीवरून दिसून येते. समर्थांच्या दासबोध या ग्रंथाला खूप लोकप्रियता मिळाल्यामुळे अन्य ग्रंथांनाही दासबोध म्हणावयाची पद्धत रूढ झाली असावी. 'सप्तसमासी' हे अकरा लघुकाव्यातील स्वतंत्र प्रकरण आहे. त्यातील प्रत्येक समासाचा शेवट श्रीमद् दासबोधाप्रमाणे 'इति श्री दासबोधे। गुरूशिष्य संवादे।' अशा चरणांनी केला आहे. समर्थांनीच सप्तसमासीला दासबोध का म्हणावे ते कळत नाही. पंचसमासी या प्रकरणाला मात्र 'इति श्री पंचसमासी' असे म्हटले आहे. एकवीस समासीच्या प्रत्येक समासाचा शेवट 'इति श्री रामदास म्हणे' या चरणानी केला आहे. समर्थांच्या अकरा लघुकाव्यात एकवीस समासी हे प्रकरण सर्वात मोठे असून त्याच्या १३४० ओव्या आहेत. श्रीमद् दासबोधातील

सद्‌गुरू लक्षण (द.५ स.२), सत्‌शिष्य लक्षण (द.५ स.३), आत्मनिवेदन (द.१५ स.५) आणि वैराग्य निरूपण (द.३ स.१०) हे ४ समास एकवीस समासीमध्ये पुन्हा येऊन गेले आहेत. याचा अर्थ वीस दशकी दासबोध लिहिताना हे समास लिहिले गेले होते आणि ते एकवीस समासीतून तसेच अंतर्भूत केले गेले. हे हेतुत: घडले की योगायोगाने घडले ते सांगणे कठीण आहे. श्रीमद् दासबोधामध्ये देखील दोन ओव्या दोन ठिकाणी येऊन गेल्या आहेत. एकवीस समासीमध्ये देखील एक ओवी दोन वेळा येऊन गेली आहे. अर्थात ओवीच्या पुनरावृत्तीपेक्षा समासाची पुनरावृत्ती ही गोष्ट जरा आश्चर्यकारकच म्हणावी लागेल.

एकवीस समासी या ग्रंथातील काही मुद्दे अगदी वेगळे आणि वैशिष्ट्यपूर्ण आहेत. सोळाव्या समासात समर्थांनी स्वत:ची तुलना रामांशी केली असून आपण रामापेक्षा कुठेच कमी नाही असा दावा केला आहे. या ओव्या मोठ्या गोड आहेत. येथे भक्त देवाशी स्पर्धा करीत नसून आपणही देवासारखेच थोर झालेले आहोत असा भाव व्यक्त करीत आहेत. आपण दास्य केल्यामुळे हा अधिकार आपल्याला प्राप्त झाला असे समर्थ प्रारंभीच म्हणतात. दासाने शेवटपर्यंत दासच राहणे ही गोष्ट मालकाला कमीपणा आणणारी नाही काय? अनेक वर्ष राजाच्या सहवासात राहून एखादा मनुष्य जर गरीब राहिला तर तो राजाला कमीपणा नव्हे काय? सोळाव्या समासात समर्थ रामदास म्हणतात-

'तुवां पाषाण तारिले। तरी आम्ही जड जीव उध्धारिले।
तुवा देव मुक्त केले। बंधनापासुनी।।
तुवा जरी मरण केले दुरी। ते मुळीच नाही आमुचा घरी।
तू राजा अक्रा सहस्त्रवरी। तरी आम्हांसी संख्या चि नाही।।
तुवा पुरी नेली वैकुंठा। तरी आम्ही वैकुंठीच्या बारा वाटा।
करूनि मांडिला चोहटा। तया वैकुंठाचा।।
ऐसे बोलती रामदास। निघडे सर्वस्वे उदास।
वैभव वाटे जयास। कसपट जैसे।।
ऐसे बोलणे ऐकिले। रामे मंदहास्य केले।
धावोनिया ह्रदई धरिले। आपुल्या निजदासा।।
राम दासांमध्ये उभा। तेणे दासासी आली शोभा।
राम स्वरूपाची प्रभा। कोंदाटली सबाह्य।।
रामे आपणासारिखे केले। दास दासपणा मुकले।
रामासी गिळुनी येक चि जाले। येकपणा हि वेगळे।।
स्वामी सेवक आनंदले। हर्षे करुनी उचंबळले।

परस्परे गिळूनी ठेले। लोभ आला म्हणोनि।।'

स्वामी आणि सेवक अथवा सद्गुरू आणि सद्शिष्य यांच्या अभेद भक्तीचे याहून सुंदर वर्णन कुठे आढळेल? नवविधा भक्तीच्या द्वारे समर्थांनी ही उच्चतम अवस्था प्राप्त करून घेतली. केवळ मी पणामुळे भक्त भगवंतापासून विभक्त होतो; म्हणून समर्थांनी १३व्या समासात मी पणाचे निरसन केले आहे. मी पण काल्पनिक असून साधकाने भासमान मी टाकून द्यावा आणि खऱ्या मी चा शोध घ्यावा. हे मी पण निरसन प्रयत्नपूर्वक केले पाहिजे म्हणजे मन, त्रिगुण, पंचमहाभूतं आणि चत्वार देह या पलिकडील आपले खरे अस्तित्व आपल्या ध्यानात येईल. ज्याप्रमाणे नदीला स्वतःचे अस्तित्व नष्ट केल्याखेरीज सागरत्व प्राप्त होत नाही. त्याप्रमाणे 'मी' चे विसर्जन केल्याखेरीज आत्मस्वरूपाचा आनंद प्राप्त होत नाही. विराटाच्या प्राप्तीसाठी क्षुद्र 'मी'ची आहुती द्यावी लागते. समर्थ म्हणतात-

'जेही विवेके आपुली। वस्तुसी आहुती दिधली।
तयासीच वस्तु लाधली। येरा अप्राप्त।।
जेणे जीवावरी उठावे। तेणे चि आनंदासी लुटावे।
आनंदी भोगुनी असावे। कल्पकोटी।।
जो का आपुली कुर्वंडी। वोवाळूनी परती सांडी।
तयासी च वस्तूची जोडी। इतरां न घडे।।
जो सद्गुरूसी शरण गेला। अद्वैतनिरूपणे बोधला।
मग जरी तो वेगळा केला। तरी तो होणार नाही।।'

समर्थांनी नाशिकच्या वास्तव्यात रामाची जी उपासना केली त्यातून ही उच्च अवस्था त्यांना प्राप्त झाली. पंधराव्या समासात समर्थांनी शिष्याला आपल्यासारखाच रामनामाचा जप करायला सांगितला. जो कोणी 'श्रीराम जय राम जय जय राम' या त्रयोदशाक्षरी मंत्राचा जप करेल त्याला रामाशी असे एकरूप होता येईल असे आश्वासन समर्थ देतात.

साधना करीत असताना साधकाला काही अनुभव येतात. छोटाश्या अनुभवामुळे तो स्वतःला साक्षात्कार झाला असे समजू लागतो किंवा आपण फार मोठे साधक आहोत असा अभिमान बळावतो. अनेकदा लोकांमध्ये मान आणि प्रतिष्ठा मिळावी म्हणून असे अनुभव दुसऱ्याला सांगितले जातात. अशा घटनांमुळे नकळत मी पणाचीच जोपासना होते म्हणून समर्थ सांगतात-

'ऐसे अखंड नाम स्मरावे। परी दुसऱ्यासी कळो नेदावे।
ऐसा निजध्यास जालिया राघवे। पाविजे तात्काळ।।

काही साक्षात्कार जाला। तो सांगो नये दुसऱ्याला।
जरी आळकेपणे सांगितला। तरी पुन्हा होणार नाही।।
पुन्हा साक्षात्कार कैचा। जाला तरी वरपंगाचा।
हा मी आपुले जीवीचा। अनुभव सांगतो।।'

याचा अर्थ मी पणाचा धोका फक्त ज्ञानमार्गात आहे असे नाही तर भक्तीमार्गात देखील आहे. मी पणा सोडणे इतके सोपे नाही. म्हणून तर समर्थांना आत्माराम हे पंचसमासी प्रकरण लिहावे लागले. प्रखर वैराग्य असले म्हणजे साधक कसल्याही प्रलोभनाला बळी पडणार नाही.

११ व्या समासात समर्थांनी एक महत्त्वाचा मुद्दा सांगितला. कलियुगात माणसे श्रवण करतील पण त्यानुसार आचरण करणार नाहीत. आज आपण पाहतो की दूरदर्शनवर सतत अध्यात्मिक प्रवचने सुरू असतात. काही प्रवचनांचे मोठ्या मंडपात आयोजन केले जाते तिथे हजारो श्रोते असतात. पण लोकांच्या वागण्यात काही बदल होत नाही. श्रवण केल्यानंतर आचरण जर केले नाही तर समर्थ म्हणतात की औषध घेऊनही माणसाने पथ्य पाळले नाही तर औषध वाया जाते तसे श्रवणही वाया जाते. समर्थांच्या मते कलियुगात सत्वगुण, श्रद्धा, विश्वास, विवेक, वैराग्य यांचा दुष्काळ पडेल. माणसाचा अहंकार आणि विषयांचा ओढा एवढा वाढेल की सत्य सांगितल्यावर त्याचा विश्वास बसणार नाही. मात्र असत्य त्याला लगेच खरे वाटेल. कलियुगात माणसे राजहंसापेक्षा कावळ्यावर जास्त विश्वास ठेवतील. स्त्रिया नवऱ्याशी भांडत राहतील आणि मुले आईवडिलांना सांभाळणार नाहीत. अध्यात्माचेसुद्धा कसे पतन होईल ते सांगताना समर्थ म्हणतात-

'शब्दज्ञान उदंड जाले। कवित्व घरोघरी केले।
समाधान निःशेष गेले। हारपोनिया।।
हरिदास साहित्ये वोढविले। हरिदास्य सांडुनी कळावंत जाले।
देव सांडुनी फिरो लागले। मनुष्याभोवते।।
करूनि नाना उपाव। केला संस्कृती रिघाव।
तेथे जडला अहंभाव। जाणिवेचा।।'

आज आपण पाहतो की सर्वत्र शब्दज्ञान खूप झाले आहे. याच समासात समर्थांनी प्रपंच आणि परमार्थ एकत्र कधी जमणार नाही असे स्पष्टपणे सांगितले आहे. ज्याला परमार्थ करावयाचा आहे त्याला प्रपंच सोडूनच द्यावा लागेल. प्रपंच शाश्वत नाही हे लक्षात घेऊनच आपण प्रपंचाचा त्याग केला, असे समर्थ म्हणतात. हा विचार कठोर असला तरी हिताचा असल्यामुळे माणसाने न

चिडचिड करता ऐकून घ्यावा. प्रवचनकारांना समर्थ स्पष्टपणे बजावतात-

'आपण करूनि दाखवावे। तरीच दुसऱ्यासी सांगावे।
ठाकेना तरी राहावे। मेलेसे आपुले ठाई।।
झाकावे आपणासी। आणि सिकवावे पुढिलासी।
ऐसा हा सकळ सृष्टीसी। दंडक चि आहे।।'

ज्यावेळी सांगणारा मनुष्य जगत असतो तेव्हा त्याच्या सांगण्याचा समाजावर प्रभाव पडतो. लोकदेखील त्याच्या आचरणाने प्रभावित होतात.

तिसऱ्या समासात समर्थांनी मुद्दाम श्रोता आणि वक्ता यांची लक्षणे सांगितली आहेत. आध्यात्मिक निरूपण करणारा वक्ता भगवंताचा प्रेमळ भक्त, शुद्ध ज्ञानी आणि करुणामय असावा, त्याचे हृदय गंगेसारखे शुद्ध असावे. तापट वक्ता कामाचा नाही. तसेच वक्त्याला जर पैशाचा लोभ असेल तर तो सत्य सांगण्याऐवजी लोकांना आवडेल असेच बोलत राहील. एका वक्त्याने दुसऱ्या वक्त्याचा द्वेष करू नये. श्रोत्यांनी जर शंका विचारल्या तर त्यांचे समाधान केले पाहिजे. वक्ता केवळ पुस्तकी पोपट नसावा. श्रोत्यांवर चिडचिड करणे, त्यांना आचरणात आणता येणार नाहीत असे कठोर नियम सांगणे किंवा आपण फार ज्ञानी आहोत असा तोरा मिरवणे योग्य नाही. वक्त्याइतकीच श्रोत्यांवर जबाबदारी असते. श्रोता जर चांगला नसेल तर सारे वक्तृत्व वाया जाईल. आदर्श श्रोत्याचे फार सुंदर वर्णन समर्थ तिसऱ्या समासात करतात-

'श्रोता आदरे श्रवण करी। तेणे उचंबळे आनंदलहरी।
श्रोता वक्ते अर्थांतरी। मिळोनि जाती।।
आर्तभूत श्रोता मिळे। आणि आदरे श्रवणी निवळे।
तेणे सकळिकांचा गळे। देहाभिमान।।
मुखाकडे लक्षी आदरे। बाहेरी निघता चि उत्तरे।
प्राशन करी कर्णद्वारे। विवरे स्वये।।'

समर्थांनी वाईट श्रोत्याची लक्षणेसुद्धा सांगितली आहेत. काही श्रोते वक्त्याचे दोष पाहण्यासाठी टपलेले असतात. भांडकुदळ श्रोते एकदम उठून वक्त्याच्या भोवती गोळा होतात आणि कोल्हेकुई करतात. काही श्रोत्यांना संसारात खूप रस असतो. ते श्रवण करताना वक्त्याच्या बोलण्याचा सोईस्कर अर्थ लावतात किंवा मतलबाचे तेवढे ऐकतात. प्रवचन करताना झोपणाऱ्या श्रोत्यांचे वर्णन करण्यासाठी समर्थांनी सुमारे २० ओव्या वेचल्या आहेत.

काही लोक संतांमध्ये दोष पाहतात आणि त्यांना नावे ठेवतात. १२ व्या समासात समर्थ म्हणतात की सत्पुरूष स्तुती आणि निंदा यांच्या पलिकडे

असतात. कुणी निंदा केली तर ती या देहाची निंदा केली. आपण देह नसल्यामुळे या निंदेचा आपल्याशी काहीही संबंध नाही अशी संतांची भूमिका असते. संत आपल्या निंदकावरही प्रेम करतात. समर्थ म्हणतात-

'संत विश्वाचे मायेबाप। संतासी नाही पारिखे आप।
रूप आणि अरूप। याहीवेगळे जे।।
संत दोष आच्छादिती। आपण स्वये न करिती।
मर्यादा उलंघिता न येती। देहबुद्धीसी सर्वथा।।
संत शांतीचे सागर। संत सर्वस्वे उदार।
ज्ञानवरूषते जळधर। सर्वस्वावरी।।'

७व्या समासात ईश्वरप्राप्तीचा राजमार्ग समर्थ सांगतात. माणसाने सर्वप्रकारच्या इच्छा किंवा आशा सोडून दिल्या पाहिजेत. माणूस आशेवर जगतो हे खरे आहे. माणसाला महत्त्वाकांक्षा असावी; पण त्याने आशेत गुंतुन पडू नये. माणसाच्या जशा इच्छा असतील तशी त्याची प्राप्ती असेल. सतत प्रपंचाचे चिंतन करून मनुष्य प्रपंचात अडकून पडतो. या समासातील सुमारे १५ ओव्यांमध्ये समर्थांनी देहाची निंदा केली आहे. श्रीमत् दासबोधामध्ये देखील तिसऱ्या दशकात समर्थांनी देहाला नरकाचे कोठार म्हटले आहे. सगळ्याच संतांनी नरदेहाची स्तुतीपण केली आहे आणि निंदादेखील केली आहे. मनुष्याचे शरीर ही एक संधी आहे. भगवत् प्राप्तीसाठी अथवा परोपकारासाठी त्याचा वापर शक्य आहे. म्हणून संत देहाची स्तुती करतात. पण माणसे देहाशी तादात्म्य पावून देहाचा वापर केवळ स्वतःच्या इंद्रियांचे चोचले पुरवण्यासाठी करतात म्हणून संत देहाला नरकाचे कोठार म्हणतात.

१५व्या समासात रामचंद्रांचे फार सुंदर ध्यान समर्थांनी वर्णन केले आहे. आदर्श सगुण ध्यानाचा तो एक मानदंड म्हणावा लागेल. त्या ओव्या वाचल्या म्हणजे समर्थांना रामचंद्रांचे कोणत्या रूपात दर्शन झाले असेल याची कल्पना करता येते. प्रारंभी रामांची देहयष्टी, त्यांचे विविध अवयव, त्यांचे सुंदर अलंकार, त्यांनी परिधान केलेली वस्त्रे यांचे मोहक वर्णन समर्थ करतात. राम कसे करूणासागर होते याचे वर्णन समर्थ किती मधुर शब्दात करतात ते पाहा-

'राम सर्वांगे सुंदरु। राम करूणेचा सागरू।
दीन अनाथाचा उद्धारू। येक श्रीराम कर्ता।।
राम जीवीचा जिव्हाळा। राम मनीचा कोवळा।
राम जाणे अंतर्कळा। निजदासांची।।
राम पुण्यपरायेण। राम लोकत्रयाचा प्राण।

रामे दास बिभीषण। अक्षयी केला।।'

अशाप्रकारे २१ समासी किंवा जुना दासबोध या नावाने प्रसिद्ध असलेल्या या ग्रंथांतील नव्या दासबोधापेक्षा वेगळ्या आणि वैशिष्ट्यपूर्ण मुद्यांचा आपण परामर्श घेतला.



# काही स्फुट प्रकरणे

समर्थांच्या स्फुट रचनांची संख्यासुद्धा अफाट आहे. एकाच ग्रंथात सर्वांचा परामर्श घेणे कठीण आहे. त्यातील काही रचनांचा परामर्श प्रस्तुत प्रकरणात घेऊ.

## १) बहुधा गोसावी-

या प्रकरणाला बहुधा गुरू असे देखील नाव आहे. समर्थांनी श्रीमद् दासबोधात सद्गुरूंची लक्षणे सांगताना दांभिक गुरूंवर चांगलेच आसुड ओढले आहेत. तेवढे त्यांना पुरेसे वाटले नसावेत म्हणून बहुधा गोसावी या प्रकरणात त्यांनी दांभिक गुरूंची चांगलीच हजेरी घेतली आहे. आपल्याला ज्ञान झाले नसताना दुसऱ्याला अनुग्रह देऊन गुरूबाजी करणे म्हणजे आपण स्वत:शी शत्रुत्व करणे आहे. ज्या माणसाला पोहता येत नाही तो पाण्यात बुडणाऱ्या इतरांचे प्राण कसे वाचवणार? या प्रकरणात समर्थांनी ओरडणारे गाढव, माजलेला बोका, उन्मत्त रेडा, भुंकणारा कुत्रा अशा परखड शब्दात या गुरूंची हजेरी घेतलेली आहे. काही बावळट आणि मूर्ख शिष्य एकत्र येतात आणि आपले गुरू काय काय चमत्कार करू शकतात ते परस्परांना सांगतात. चमत्कार करणे म्हणजे गुरूपदी आरूढ होणे नव्हे. काही माणसांना सिद्धी प्राप्त होतात. त्या सिद्धीच्या बळावर ते काही अद्‌भूत चमत्कार करू शकतात. सिद्धी प्राप्त होणे निराळे आणि आत्मसिद्ध होणे निराळे. समर्थांनी शिष्यांच्या तोंडी जी वाक्य घातली आहेत त्याद्वारे उपहासात्मक पद्धतीने गुरूंची चांगलीच टिंगल टवाळी केली आहे. कोणी म्हणते आमचे गुरू विष्ठेचा अंगिकार करतात तर कुणी म्हणते आमचा गुरू माणसाने केलेली उलटी प्राशन करतो. हे सगळे प्रकार सांगताना समर्थांच्या खालील ओव्यांवरून वारकरी मंडळी नाराज झाली-

'आमुचे गुरू भविष्य सांगती। रेड्याकरवी वेद म्हणविती।
गधड्या करवी पुराण सांगविती। सामर्थ्यबळे।।
कुतऱ्याकरवी रागोद्धार। कोंबड्या करवी तत्त्वविचार।
खेचर आणि भूचर। सकळ वांधे।।
व्याघ्रावरी बैसे निशंक। हाती सर्पाचा चाबुक।
वांचले होते सहस्त्र येक। सामर्थ्य बळे।।'

वारकरी मंडळींना असे वाटते की या ओव्यांमध्ये समर्थांनी ज्ञानेश्वर महाराज आणि चांगदेव यांची टिंगल केली आहे. समर्थांच्या आरत्या पाहताना आपण बघितले की समर्थांनी ज्ञानेश्वर महाराजांची आरती केली आहे. संतांच्या आरतीत चांगदेवासह सर्व जातीतील अनेक वारकरी संतांना वंदन केले आहे. जर समर्थांना ज्ञानदेवांची टिंगलच करावयाची असती तर त्यांनी त्यांची आरती केली नसती. तुकाराम महाराज आणि समर्थ यांचे संबंध किती जिव्हाळ्याचे होते हे त्या दोघांनी एकमेकांवर रचलेल्या अभंगांवरून लक्षात येते. अनेकदा स्वत:ला ज्ञानदेव किंवा चांगदेव यांचा अवतार समजणारे लबाड गुरू आपण असा चमत्कार करू शकतो असे आपल्या शिष्यांना सांगत असावेत आणि शिष्य वेड्यासारखे आपल्या गुरूंची जाहिरात करत असावेत म्हणून समर्थांनी ते बावळट शिष्य आणि पाखंडी गुरू या दोघांचा सडेतोड समाचार घेतला. वरील ओव्या ज्ञानदेवांना आणि चांगदेवांना उद्देशून आहेत, असे गृहीत धरल्यास या प्रकरणातील अनेक ओव्या समर्थांना देखील लागू पडतात. काही ओव्या गोंदवलेकर महाराज यांना लागू पडतात. समर्थ स्वत: वाघावर बसत असत. साप हातामध्ये धरत असत. समर्थांनी मेलेले प्रेत किंवा मेलेली घार उठवली त्याचाही उल्लेख या प्रकरणात आहे. मग समर्थांनी स्वत:चीच टिंगल करून घेतली असे म्हणायचे का? असा प्रचार त्या काळी चालू होता त्याचा समर्थांनी कडक शब्दात परामर्श घेतला. ज्ञानदेवांच्या आरतीत समर्थांनी ज्ञानदेवांचा रेड्याकरवी वेद बोलवण्याच्या चमत्काराचा मोठ्या गौरवाने उल्लेख केला आहे. कोणत्याही संतांच्या वाङ्मयात अन्य साधूंबद्दल निंदाव्यंजक ओव्या सापडणार नाहीत. श्रीमद् दासबोधात समर्थ म्हणतात-

'साधू दिसती वेगळाले। परी ते स्वरूपी मिळाले।
अवघे मिळोन येकची जाले। देहातीत वस्तु।।'

अशा चमत्कारांनी शिष्यांच्या जीवनाचे सार्थक होणार नाही. तसेच हे चमत्कार म्हणजे काही खरी अध्यात्म विद्या नव्हे, असे स्पष्ट मत प्रकरणाच्या शेवटी समर्थ नोंदवतात. या समासाचा शेवट 'इति श्री दासबोधे गुरू-शिष्य

संवादे' अशा चरणाने केला आहे. ज्या ग्रंथाला अथवा प्रकरणाला विशेष काही नाव नसेल त्याचा अंतर्भाव दासबोध या मथळ्यात करावयाचा असे समर्थांचे धोरण दिसते. जुन्या अथवा नव्या दासबोधात मात्र हे प्रकरण अंतर्भूत नाही.

## २) हरे राम हा मंत्र सोपा जपा रे-

समर्थांनी राममंत्राचे एकोणपन्नास श्लोक लिहिले आहेत. माणसे ईश्वरप्राप्तीसाठी नाना प्रकारचे साधन मार्ग स्वीकारतात. अनेकदा साधन पद्धतीचाच अभिमान अंतर्यामी बळावतो. विशेषत: कर्मकांडी माणसाचा आपण आचार धर्म पाळतो याचाच फार अभिमान बळावतो. वैदिक मंडळींना आपल्या वैदिक कर्माचा किंवा मंत्रांच्या शुद्ध उच्चारांचा अभिमान निर्माण होतो. काही माणसे अष्टांग योग, यज्ञ-याग व्रते आणि दान किंवा नाना तीर्थयात्रा यामध्ये अडकतात. आहार-विहाराचे नाना कडक नियम पाळतात. वस्तुत: या सर्व गोष्टी भावपूर्णतेने केल्या तर भगवंताला पोहचू शकतात पण मानवी मनाची ठेवणच अशी विचित्र आहे की त्याला अशा कर्मांचा अहंकार निर्माण होतो. पुराणामध्ये अहंकार निर्मुलनाच्या किंवा गर्वहरणाच्या अनेक कथा आपण वाचतो. अभिमानामुळे केलेले सत्कर्मही वाया जाते म्हणून साधकाने खूप काळजी घ्यावयाची असते.

या खेरीज सांसारिक माणसे आयुष्य कामिनी आणि कांचन यांच्या सेवेत घालवतात. इंद्रियांचे चोचले पुरवीत राहतात. काही माणसे कीर्ति, सन्मान, प्रतिष्ठा यासाठी धडपडत राहतात. समर्थांच्या मते हे सारे करत बसण्यापेक्षा माणसाने भगवंताच्या नामामध्ये आपले आयुष्य सार्थकी लावावे. समर्थ म्हणतात-

'कसी जन्मुनी माय त्वा वांझ केली।<br>
कसी लाज वंशा कुळा लावियेली।<br>
भूमीभार धोंडा पशू हा खरा रे।<br>
हरे राम हा मंत्र सोपा जपा रे।।<br>
कसा कोणता काळ येईल केव्हा।<br>
दिनासारिखा काळ नेईल तेव्हा।<br>
तुझे वित्त तारुण्य लोपेल सारे।<br>
हरे राम हा मंत्र सोपा जपा रे।।<br>
जरी क्षीणदेहो परी वृद्धकाळी।<br>
करिती स्त्रिया सूत नातू टवाळी।<br>
धना उचकी लागता गूचकी रे।

हरे राम हा मंत्र सोपा जपा रे।।
नको सोंग छंदे करू ढोंग काही।
नको शिष्यशाखा मठी सुख नाही।
महंतीमुळे नाश होतो तपा रे।
हरे राम हा मंत्र सोपा जपा रे।।
नको चाउटी वाउगी या जनांसी।
हरीचिंतनी ध्यास लावी मनासी।
अमोलिक हा काळ जातो वृथा रे।
हरे राम हा मंत्र सोपा जपा रे।।
कली साधने याविणे सर्व निंदी।
हरे राम हा मंत्र जो त्यासि वंदी।
हरे राम हे माळिका साधका रे।
हरे राम हा मंत्र सोपा जपा रे।।'

कलियुगात कर्मकांडाने काही होणार नाही. कारण कर्मकांड करताना पुरोहित वर्गाने किंवा कर्मकांड करणाऱ्या यजमानाने जे व्रतस्थ जीवन जगावयाचे असते ते आजच्या युगात शक्य होत नाही. म्हणून सामान्य माणसाने नामाची कास धरावी. अन्य साधन मार्गापेक्षा नामसाधन सर्वश्रेष्ठ आणि सर्वात सुलभ आहे असे सर्वच संतांनी सांगितले. येथे शेवटच्या चरणात समर्थांनी 'हरे राम हा मंत्र' असे म्हटले असले तरी त्यांना अभिप्रेत मंत्र 'हरे राम हरे राम राम राम हरे हरे।' हरे कृष्ण हरे कृष्ण कृष्ण कृष्ण हरे हरे।' असाच असावा.

### ३) मानसपूजा (पाक निष्पत्ती)-

समर्थांनी या प्रकरणात भगवंताची मानसपूजा कशी करावी ते सांगितले आहे. त्यांची रसिकता आणि व्यापकता येथे दिसून येते. मानसपूजेचे छोटे छोटे तेरा समास आहेत. प्रत्येक समासात साधारणत: अकरा ओव्या आहेत. मंदीर भव्य असावे, तेथे सर्व प्रकारची समृद्धी असावी, आल्यागेल्यांचे आदरातिथ्य व्हावे. नैवेद्याला विविध प्रकारच्या भाज्या, कोशिंबिरी, दुध-दुभते असावे आणि साग्रसंगीत भगवंताची पूजा व्हावी असे प्रत्येकाला वाटते. पण सांपत्तिक स्थितीमुळे म्हणा किंवा मर्यादित शारिरीक क्षमतेमुळे म्हणा, माणसाला भगवंताचे पूजन एवढ्या व्यापक प्रमाणात जमू शकत नाही. अशा वेळी माणसाने डोळे मिटून शांत बसावे आणि हे सारे उपचार मनाने भगवंताला अर्पण

करावेत. मग मनाने सगळी सामग्री, सगळे पदार्थ, स्वयंपाक करणाऱ्या स्त्रिया, नैवेद्य दाखवण्याची प्रक्रिया तसेच नाना परिमल द्रव्ये हे सारे मानसपूजेत भगवंताला अर्पण करावेत. पहिल्या समासात भगवंताच्या मंदिराची समर्थांनी केलेली कल्पना त्यांच्या प्रगल्भ बुद्धिमत्तेचे दर्शन घडवते. मंदिराच्या अवतीभोवती पुष्पवाटिका, नाना वृक्षं, सुंदर बागा, आकर्षक पशूपक्षी, सभामंडप, चित्रशाळा, अद्ययावत स्वयंपाकगृह, कोठ्या, यात्रेकरूंसाठी धर्मशाळा, भोजनशाळा, ध्यानगुंफा, नाट्यशाळा, होमहवन, दीपमाळा, बांधलेली तळी आणि सरोवरे, सरोवरात कमळे, मासे, कारंजे असे सर्व प्रसन्न वातावरण आहे अशी मनाने कल्पना करावी.

देवस्थानात राहणारे सेवेकरी आणि कार्यकर्ते यांचे अनेकदा विचित्र अनुभव आपल्याला येतात. पण समर्थांनी अशा कार्यकर्त्यांच्या नानाविध गुणांचे सुंदर वर्णन केले आहे. हे सारे मानसपूजेतच करावयाचे असल्यामुळे सेवेकरी मंडळी दूरदृष्टीची, अखंड सावधान आणि व्यवहार चतुर आहेत अशी कल्पना करायला काय हरकत आहे? तिसऱ्या समासात पाकशाळेतील स्वयंपाकिणी कशा सुगरण आहेत याचे वर्णन करताना समर्थ लिहितात-

'आता ऐका स्वयंपाकिणी। बहुत नेटक्या सुगरणी।
अचुक जयांची करणी। नेमस्त दीक्षा।।
रोगी अत्यंत खंगले। तेणे ते अन्न पाहिजे भक्षिले।
भोजनरूचीने गेले। दुखणे तयाचे।।
जेथे उत्तमचि आघवे। तेथे काये घ्यावे काये सांडावे।
जेविता जेविता जेवावे। ऐसे वाटे।।
सुवासेचि निवती प्राण। तृप्त चक्षु आणि घ्राण।
कोठून आणिले गोडपण। काही कळेना।।'

तिसऱ्या समासात स्वयंपाकासाठी कोणकोणते धान्य आणि भाज्या लागतील याची यादी देताना समर्थांनी ७० ते ८० भाज्यांची आणि धान्यांची नावे दिली आहेत. तसेच ५व्या समासात ४० ते ४५ भांड्यांची नावे दिली आहेत. भांडी कशी स्वच्छ असावीत, भाज्या कशा निवडाव्यात, स्वयंपाक कसा करावा याचे विस्तारपूर्वक वर्णन पुढील दोन समासात केले आहे. एका स्वतंत्र समासात देवाला दाखवलेल्या नैवेद्याचे वर्णन आहे. वस्तुत: भगवंत प्रत्यक्ष जेवण करीत नाही पण समर्थ म्हणतात-

'देव वासाचा भोक्ता। सुवासेचि होये तृप्तता।
येरवी त्या समर्था। काय द्यावे।।'

नवव्या आणि दहाव्या समासात भोजनासाठी बसलेल्या माणसांच्या पंक्ती आणि भोजनाचे वर्णन केले आहे. मंडळी जेवायला बसले असता त्याचे मिष्किल वर्णन समर्थ कसे करतात ते पहा-

'मग तो संकल्प सोडिला। तेणे मोठा आनंद जाला।
नामस्मरणे घोष केला। भोजन आरंभिले।।
भक्षे मोडिता गुदगुल्या होती। तुपामध्ये बुचकळिती।
वरपोवरपो जेविती। किती येक।।
आंबट तिखट खारट तुरट। शाखांबरी नेलेचेट।
तोंडी लाविती येथेष्ट। यथान्वये।।
पात्रांमध्ये वाढी रीती। होता सवेचि वाढिती।
कीतेक आग्रही करिती। परस्परे।।
शिखरणी वरपती सरारा। कढी वरपती फरारा।
ढेकर देती डरारा। सावकास।।
येक ते गुचक्या देती। उदके मागुती सेविती।
हात टेकून जेविती। कितीयेक।।
भोजने कंठमर्याद जाली। मग दध्योदने आणविली।
तक्रे वाघारून घेतली। द्रोणामध्ये।।
सकळ लोक तृप्त जाले। समस्तांसी विडे दिधले।
अस्तमान जाल्या लागले। मंडपी दीप।।'

या सर्व वर्णनावरून समर्थांची सूक्ष्मनिरीक्षण शक्ती, विनोदबुद्धी आणि प्रतिभाशक्ती या सर्वांची कल्पना येते. सायंकाळी दिवे लागण्याच्या वेळेला पुन्हा देवाचे पूजन केले जाते. ही मानसपूजा उत्सवकाळातील असल्यामुळे रात्री देवाची मिरवणूक निघते. समर्थांनी महाराष्ट्रात उत्तरेकडील रथयात्रेची परंपरा आणली. मिरवणुकीतील छत्र्या, मेघडंबऱ्या, निशाणे, पताका, झेंडे, ढाला, गुढ्या, तोरणे, चौघडे, दमामे, नगारे, दिवट्या, शंख, कर्णे, तुताऱ्या, ढोल, भेरी, झेंगट अशी विविध वाद्ये आणि दारूकाम याचे प्रभावी वर्णन वाचून समर्थ डोळ्यासमोर मिरवणूकीचे चित्रच उभे करतात. अनेकदा आपण तीर्थक्षेत्री उत्सवात जातो. समर्थ मानसपूजेत या सर्व उत्सवाचे वर्णन करतात. उत्सव काळातील भव्यता आणि दिव्यता रोजच्या पूजेत आढळणार नाही. म्हणून हे सर्व साग्रसंगीत वर्णन ते करतात. हे वाचल्यानंतर मंदीर कसे असावे, मंदिराचे विश्वस्त कसे असावेत, मंदिरात कोणकोणत्या वस्तू असाव्यात, पूजापरंपरा कशी व्यवस्थित सांभाळली जावी याचे आदर्श चित्र आपल्या डोळ्यासमोर उभे

राहते. मात्र प्रकरणाच्या शेवटी ही सर्व भव्यता सोडून हृदयात भगवंताची मूर्ती दृढ धरावी असे समर्थ सांगतात.

### ४) ऐका इटांचा प्रसंग-

समर्थ बहुश्रूत होते. जन्मत:च त्यांना अभ्यासदृष्टी प्राप्त झाली होती. केवळ निरिक्षणाने अनेक गोष्टींचे ज्ञान त्यांनी आत्मसात केले होते. त्यांचा शब्दसंग्रह अफाट होता. व्यवहारातील बारिक-सारिक गोष्टींचे ज्ञान त्यांना होते. ते केवळ संत नव्हते; तर कुशल संघटक आणि कडक प्रशासक होते. नेतृत्वाचे गुण त्यांच्यामध्ये होते. समर्थांनी शेकडो मंदिरे बांधली. हे बांधकाम करताना भरपूर विटा लागत. कुशल कामगारांशी संबंध येई. अशावेळी विटा कशा भाजाव्यात आणि कामगारांकडून कामे कशी करून घ्यावीत याचे समर्थांनी केलेले दिग्दर्शन वाचून आपली मती गुंग होते-

'ऐका ईटाचा प्रसंग। लांबरूंदी येथा सांग।
चौक नेमस्त वंग। आसौचि नये।।
ईट लांबी नवतसु। आणि रूंदी सात तसु।
उंची जाणीजे दीड तसु। पाटी पोट नेमस्त।।
खाली वरट वरी खळगा। तो ईट कामा नये।
धारे कोने पासी दगा। कामा नये।।
खणखणीत वाळवाव्या। झणझणीत भाजाव्या।
भट्या नेमस्त कराव्या। आणी दारी।।
वोले सर्पण कामा नये। कावळ काट्या कामा नये।
मोठे ढोंण कामा नये। नेमस्त आसावे।।
कामकऱ्यास गमु देऊ नये। काम घेता त्रासो नये।
कठीण शब्द बोलो नये। क्षणक्षणा।।
दिवस उगवल्या वरीये येऊ देऊ नये।
गमित माणूस कामा नये।
अशक्त पोर कामा नये। आणि म्हातारे।।
बळकट लोक निवडावे। काम पाहोन लावावे।
सगट मुशारे करावे। हे ही मुर्खपण।।
जेवणा पुरतेचि बसो द्यावे। सवेचि कामास लावावे।
दीसधारे सांभाळावे। क्षणक्षणा।।
हिशेब बरा राखत जावा। लिहिण्याचा आळस न करावा।

मुका बदला करीत जावा। उपसामग्री आसावी।।'

एखाद्या धबधब्याचे किंवा सुंदर दिसणाऱ्या निसर्गाचे वर्णन करणे आपण समजू शकतो. परंतु चौफेर संचार करणारी समर्थांची प्रतिभा बांधकामासारख्या रूक्ष विषयातसुद्धा चैतन्य आणि आनंद निर्माण करत होती. कल्याणस्वामींना सांगितलेले बाग प्रकरण अशाच प्रकारचे आहे.

**५) बाग प्रकरण**

सन १६५० मध्ये समर्थ परळीच्या किल्ल्यावर राहायला आले. त्यावेळी हा किल्ला आदिलशहाच्या ताब्यात होता. शिवछत्रपतींनी १६७३ साली हा किल्ला जिंकून त्याचे नाव सज्जनगड ठेवले. समर्थांनी सुमारे ३२ नावे धारण केली होती. 'दासविश्रामधाम' या ग्रंथात आत्माराम महाराजांनी ही सर्व नावे दिली आहेत. या नावातच सज्जन हे एक नाव आहे. हा किल्ला शिवाजी महाराजांनी समर्थांना दिला तेव्हा त्याचे सज्जनगड असे नाव ठेवले. गडावर पाण्याची टंचाई असल्यामुळे बागकाम करण्यास वाव नव्हता. म्हणून समर्थांनी सज्जनगडाच्या पायथ्याला परळी गावात मारूतीचे मंदीर स्थापन करून कल्याणस्वामींना तिथे बाग करायला सांगितली. कल्याणाने समर्थांना विचारले की, बागेत मी काय लावू? प्रश्न ऐकताच समर्थांचे मानस उद्यान फुलले आणि एका दमात त्यांनी सुमारे दोनशे तीस झाडांची नावे सांगितली. आज ती बाग अस्तित्वात नसल्यामुळे नेमकी किती झाडं लावली गेली हे ठाऊक नाही. पण या निमित्ताने समर्थांचा वनस्पतीशास्त्राचा व्यासंग किती गहन होता ते ध्यानात येते. विशेष म्हणजे ही यादी देताना समर्थांनी फळभाज्या, पालेभाज्या, फळं, फुलं, जंगली वनस्पती अशी वर्गवारी करून दिली आहे. एखाद्या वनस्पतीशास्त्राच्या प्राध्यापकाला देखील एवढ्या वनस्पतींची यादी देता येणार नाही. समर्थांना अभ्यास दृष्टी असल्यामुळे डोंगरात फिरताना त्यांनी वेगळी वेगळी झाडी पाहिली आणि त्यांची माहिती करून घेतली. अखंड सावधानता, अखंड भ्रमण आणि अखंड अभ्यास ही समर्थांच्या व्यक्तिमत्त्वाची खास वैशिष्ट्ये होती. याचा अर्थ त्यांची भटकंती ही कुणा भ्रमिष्टाची भ्रमंती नव्हती. तर समाज परिवर्तनाचा विडा उचललेल्या ध्येयनिष्ठ राष्ट्रभक्ताचा गंगौघ होता.

**६) अस्मानी-सुलतानी-**

देशस्थितीचे भान हे समर्थांच्या वाङ्मयाचे व्यवच्छेदक लक्षण सांगता येईल. सतत परिभ्रमण करीत असताना समर्थांनी तत्कालीन देशस्थितीचे निरीक्षण

केले. राष्ट्राची अवनत अवस्था पाहून त्यांच्या चित्ताचा किती क्षोभ झाला याची कल्पना 'अस्मानी सुलतानी' हे त्यांचे स्फूट प्रकरण वाचल्यावर येते. दुष्काळ किंवा अतिवृष्टी या संकटाला ते अस्मानी म्हणतात तर त्या काळी गादीवर बसलेल्या सुलतानांनी प्रजेची जी ससेहोलपट चालविलेली होती, त्याला समर्थ सुलतानी संकट असे म्हणतात. महागाई, चोऱ्या, शेतकऱ्यांच्या आत्महत्या, यवनांचा जुलूम या सगळ्यांचे हृदयद्रावक वर्णन समर्थ या प्रकरणात करतात.
'कितीयेक ग्रामेचि ते वोस जाली। पिके कर्म धान्येच नाना बुडाली।।
कितीयेक धाडीवरी धाडी येती। तया सैन्यकाचेनि संहार होती।।
कितीयेक ते मेघही मंद जाले। अनावृष्टि स्थळोस्थळी लोक मेले।।
कितीयेक अन्नाविसी भ्रष्ट जाले। कितीयेक लोकी जळी प्राण दिल्हे।।
कितीयेक ते धान्य लुटूनि नेती। कितीयेक ते पेव खाणोनि नेती।।
कितीयेक ते पूरिले अर्थ नेती। कितीयेक पूरिली अर्थपात्रेचि नेती।।
कितीयेक ते घ्राणकर्णेचि घेती। किती उत्तमा त्या स्त्रिया भ्रष्टवीती।।
किती मोट बांधूनि ते बूडवीती। पिछोडेचि बांधोनि हिरोनि नेती।।
किती गुज्रिणी ब्राह्मणी भ्रष्टवील्या। किती शामुखी जाहजी फाकवील्या।।
कितीयेक देशांतरी त्या विकील्या। किती सुंदरा हाल होऊनि मेल्या।।
जन बुडाले, बुडाले पोटेविण गेले। बहु कष्टले, कष्टले, कितीयेक मेले।।
वीसा लोकांत लोकांत येकचि राहिले। तेणे उदंड, उदंड दुखचि साहिले।।
काही मिळेना, मिळेना मिळेना खायला। ठाव नाही रे, नाही रे नाही रे जायला।।
हौस कैची रे, कैची रे, कैची रे गायाला। कोठे जावे रे, जावे रे जावे मागायला।।
देश नासला, नासला उठे तोचि कूटी। पिके होतांचि होतांची, होते लुटालुटी।।
काळाकरिता जीवलगा झाली तुटातुटी। अवघ्या कुटुंबा कुटुंबा होते फुटाफुटी।।
धान्य माहाग, माहाग, तैसे ही मिळेना। कैसे होईल, होईल, होईल कळेना।।'

लोकांची उडालेली दैना पाहून समर्थांच्या चित्ताची काय दशा झाली असेल त्याची आपण कल्पना करू शकतो. समर्थांच्या काळात मनूची, टॅव्हर्निअर, थॉमस रो हे विदेशी प्रवासी भारतात आलेले होते. त्यांनी तत्कालीन भारताचे केलेले वर्णन समर्थांच्या वरील वर्णनाशी चांगलेच मिळते-जुळते आहे. 'परचक्र निरूपण' या प्रकरणात समर्थ लिहितात-

'पदार्थ मात्र तितुका गेला। नुस्ता देशचि उरला।
येणे करिता बहुताला। संकट जाले।।
लोके स्थानभ्रष्ट जाली। कितेक तेथेचि मेली।
उरली ती मराया आली। गावावरी।।

माणसा खावया धान्य नाही। आंथरूण पांघरूण तेहि नाही।
घर कराया सामग्री नाही। विचार सुचेना काही।
अखंड चिंतेचा प्रवाही। पडिले लोक।।'

समर्थ रामाचे भक्त होते. रामाचे राज्य आदर्श होते. समर्थांना रामराज्याचे वेध लागले होते. प्रजेची दु:खातून सुटका करण्यासाठी त्यांना रामराज्य हवे होते.

### ७) रामराज्य-

अलिकडे महात्मा गांधींनी रामराज्य ही संकल्पना लोकप्रिय केली. मूळात रामराज्य हा शब्दप्रयोग भरताने रूढ केला. रावण वधानंतर रामचंद्र अयोध्येत परत आले. त्यांचा राज्याभिषेक झाला. त्यावेळी भरताने आपल्या भावाचे राज्य कसे लोककल्याणकारी आहे याचे वर्णन करताना रामराज्य हा शब्द वापरला. रामाच्या राज्यात अतिवृष्टी नाही, अनावृष्टी नाही, निरक्षरता नाही, दारिद्र्य नाही, दहशतवाद नाही हे वर्णन वाचून मन थक्क होते. अलिकडच्या काळात शिवाजी महाराजांच्या स्वराज्याची तुलना रामराज्याशी केली जाते. समर्थ या रामराज्याचे किती गोड वर्णन करतात ते पहा-

'राज्य या रघुनाथाचे। कळिकाळासि नातुडे।
बहुवृष्टि अनावृष्टि। हे कदा न घडे जनी।।
उद्वेग पाहता नाही। चिंतामात्र नसे जनी।
व्याधि नाही, रोग नाही। लोक आरोग्य नांदती।।
युद्ध नाहीच अयोध्या। राग ना मत्सरू नसे।
बंदनिर्बंदही नाही। दंडदोष कदा नसे।।
दरिद्री धुंडिता नाही। मूर्ख हा तो असेचिना।
परोपकार तो मोठा। सर्वत्र लोकसंग्रहो।।
अद्‌भूत पिकती भूमी। वृक्ष देती सदा फळे।
अखंड दुभती धेनु। आरोग्ये वाहती जळे।।
नद्या सरोवरे वापी। डोलती नूतने बने।
फळती फुलती झाडे। सुगंध वनवाटिका।।'

वाल्मीकि रामायणातील ही रामराज्याची संकल्पना केवळ कवी कल्पना नाही. राज्यकर्ते जर सदाचारी असतील आणि पराक्रमी असतील तर अशा प्रकारचा समाज निर्माण करणे कठीण आजिबात नाही.

### ८) सुंदरकांड आणि युद्धकांड-

समर्थ रामदास केवळ आशावादी किंवा आदर्शवादी नव्हते. ते प्रयत्नवादी होते. धर्मग्रंथात सांगितलेली जीवनमूल्ये समाजात रुजवण्यासाठी जो अखंड साक्षेप लागतो त्याचे समर्थ हे मूर्तीमंत उदाहरण होते. शंभराहून अधिक कीर्तनकार समर्थांनी तयार केले आणि त्यांना ''रामकथा ब्रह्मांड भेदून पैल्याड न्यावी।'' असा आदेश दिला. समर्थांच्या मते त्या काळी समाजाला रामकथेची जास्त गरज होती. रामायण काळी रावणाने सामान्य प्रजेवर जसे अनन्वित अत्याचार केले तसे अत्याचार मुघल राज्यकर्ते भारतीयांवर करत होते. अशावेळी रामाचा पराक्रम, त्यांचे संघटन कौशल्य, त्यांचा संयम आणि सदाचार जनमानसात रुजवणे आवश्यक होते. समर्थ म्हणतात-

'कथा शंकराची कथा कार्तिकाची।
कथा चंडिकेची कथा मोरयाची।
कथा वेंकटीची कथा विठलाची।
कथा मल्लयाची कथा भैरवाची।।
कथा नृसीह्मा वामना भार्गवाची।
कथा कौरवा पांडवा माधवाची।
कथा देव इंद्रादि ब्रह्मादिकांची।
समस्ता मधे श्रेष्ठ या राघवाची।।'

त्या काळात अनेक हिंदू स्त्रियांचे अपहरण होत होते. रामाच्या पत्नीचे सुद्धा अपहरण झाले. पण रामांनी धीर सोडला नाही. त्यांनी वनवासी, भिल्ल, गोंडाळ, वानर, अस्वल अशा जमातींची संघटना स्थापन करून पराक्रमाने आपल्या पत्नीची सुटका केली. समर्थ रामदास हे योद्धा संन्यासी होते. लोकांमधील क्षात्रतेज जागे करण्यासाठी त्यांनी सुंदरकांड आणि युद्धकांड अशी दोन स्वतंत्र प्रकरणे लिहिली. समर्थांनी संपूर्ण रामकथा न लिहिता केवळ सुंदरकांड आणि युद्धकांड ही दोन प्रकरणे निवडली. याचे कारण समाजात त्यांना वीररस निर्माण करायचा होता. सुंदरकांडात त्यांनी हनुमंताच्या पराक्रमाचे फार सुंदर वर्णन केले आहे. समर्थांना हनुमंताच्या शेपटीचे मोठे आकर्षण आहे. हनुमंत आपल्या शेपटीने राक्षसांची कशी फजिती करतो ह्याचे वर्णन करताना समर्थांनी हास्यरस निर्माण केला आहे. काही वर्णनात रामायणातील ऐतिहासिकता बाजूला ठेवून समर्थांनी हनुमंताच्या पराक्रमाचे काल्पनिक वर्णन केले आहे. उदाहरणार्थ, हनुमंताने रावणाला थप्पड मारली, रावणाच्या दाढी मिशा जाळल्या, रावणाच्या सभेतील सगळ्या लोकांना नागवे केले. या गोष्टींचा

उल्लेख वाल्मीकि रामायणात कोठेही नाही. रावणाने रामाचे शीर आणि मुख तयार करून सीतेपुढे ते ठेवल्याचे आणि आपण रामाला ठार केल्याचे खोटे वृत्त तिला सांगितले याचा वाल्मीकि रामायणात उल्लेख आहे. समर्थांनी ही कथा तर घेतली आहेच पण रावणाने सीतेचेदेखील मुख हुबेहूब तयार करून आपण सीतेला ठार केल्याचा दावा रामाजवळ केला. त्यावेळी रामांनी केलेला शोक या सर्व घटना वाल्मीकि रामायणात कुठेच नाहीत. हनुमंताने सीतेचा लावलेला शोध, अशोकवनाचा केलेला विध्वंस, लंका-दहन, बिभिषणाचे रामाच्या सैन्यात दाखल होणे, सेतूबंधन, शुक आणि सारण या दूतांचा रावणाला सल्ला, प्रत्यक्ष युद्धाचे वर्णन, राम-लक्ष्मण, हनुमान यांचा पराक्रम, राम-रावण युद्ध या सर्व प्रसंगांचे सविस्तर वर्णन समर्थांच्या युद्ध-कांडात येऊन जाते. अशा प्रकारे रामायणातल्या शेवटच्या दोन कांडांचे विस्तारपूर्वक वर्णन समर्थांनी केले आहे. युद्धकांडाच्या शेवटी समर्थांनी संपूर्ण युद्धकांडाचा सारांश समासवार दिला आहे.

### ९) समर्थांने पसायदान-

समर्थांनी आदर्श रामराज्याची कल्पना मांडली. रामाप्रमाणे पराक्रम करून कसे रामराज्य स्थापन करावे हे सुंदरकांड आणि युद्धकांडात सांगितले. समर्थांनी प्रयत्नाला प्रार्थनेची जोड दिली. रामराय त्यांची प्रार्थना ऐकतात हा त्यांचा अनुभव होता. म्हणून ज्ञानदेवांनी ज्याप्रमाणे निवृत्तीनाथांजवळ पसायदान मागितले, त्याप्रमाणे समर्थ देखील त्यांचे सद्‌गुरू प्रभू रामचंद्र यांच्याजवळ पुढील पसायदान मागतात-

'रघुनाथदासा कल्याण व्हावे।
अतिसौख्य व्हावे आनंदवावे।
उद्वेग नासो वर शत्रू नासो।
नानाविलासे मग तो विलासो।।
कोडे नसो रे कळहो नसो रे।
कापट्य कर्मी सहसा नसो रे।
निर्वाणचिंता निरसी अनंता।
शरणागता दे बहु धातमाता।।
अजयो न हो रे जयवंत हो रे।
आपदा नको रे बहुभाग्य हो रे।
श्रीमंतकारी जनहितकारी।

परउपकारी हरिदास तारी।।'

सगळ्या संतांचे हृदय कसे कनवाळू असते आणि समाजहितासाठी ते कसे तळमळत असते याची कल्पना वरील प्रार्थनेवरून येते.

**१०) समर्थ संप्रदायाची लक्षणे-**

एका स्फुट काव्यात समर्थ रामदासांनी समर्थ संप्रदायाची पुढील २० लक्षणे सांगितली आहेत-

१) लिहिता येणे २) वाचता येणे ३) निरूपण करता येणे ४) श्रोत्यांच्या शंकांचे निरसन करणे ५) साधना करून स्वतः अनुभव घेणे ६) गाता येणे ७) नाचता येणे ८) टाळ्या वाजवता येणे ९) शब्दांचे वेगवेगळे अर्थ कळणे १०) प्रबंध लिहिता येणे ११) सामाजिक प्रबोधन करणे १२) वैराग्य १३) विवेक १४) सगळ्या लोकांना राजी राखणे १५) राजकारणात जागरुक असणे १६) सतत उद्योगात असणे १७) प्रसंगावधान असणे १८) निस्पृहता असणे १९) सगळ्यांचे सारखे समाधान करणे २०) रामाची उपासना करणे.

समर्थ संप्रदाय हा प्रचारकांचा संप्रदाय होता. महंतामध्ये धर्माचा प्रचार करण्यासाठी जे गुण आवश्यक आहेत त्या सर्वांची यादी समर्थांनी इथे दिली आहे. माणसाने वैयक्तिक साधना करून स्वतःच्या जीवनाचे सार्थक करावे. त्याचबरोबर समाजातही लोकसंग्रहाद्वारे सद्‌विचार आणि सदाचार रूजवावेत. दृश्य जगत् माया आहे, ते केवळ भासमान आहे याची समर्थांना देखील जाण होती. परंतु व्यवहारामध्ये प्रत्येकाने आपापली कर्मे व्यवस्थित करावीत अन्यथा समाजाची घडी विस्कळीत होईल. म्हणून समर्थांनी ही लक्षणे सांगितली. धर्मप्रचार आणि धर्म संस्थापनेसाठी समर्थ भगवंताजवळ काय काय मागतात ते पुढील काव्यात आपण पाहू.

**११) चौपदी- कोमळ वाचा दे रे राम-**

ज्याला सामाजिक पुनरूत्थानाचे कार्य करायचे आहे अशा महंताने भगवंताजवळ काय मागावे त्याची सुंदर यादी चौपदी या प्रकरणात समर्थ रामदास देतात-

(१)

कोमळ वाचा दे रे राम। विमळ करणी दे रे राम।।धृ।।
प्रसंग ओळखी दे रे राम। धूर्तकळा मज दे रे राम।।१।।
हितकारक दे रे राम। जनसुखकारक दे रे राम।।२।।
अंतरपारखी दे रे राम। बहुजनमैत्री दे रे राम।।३।।

विद्यावैभव दे रे राम। उदासिनता दे रे राम।।४।।
मागो नेणे दे रे राम। मज न कळे ते दे रे राम।।५।।
तुझी आवडी दे रे राम। दास म्हणे मज दे रे राम।।६।।

(२)

संगीत गायन दे रे राम। आलाप गोडी दे रे राम।।धृ।।
धातमाता दे रे राम। अनेक धाटी दे रे राम।।१।।
रसाळ मुद्रा दे रे राम। जाड कथा मज दे रे राम।।२।।
दस्तक टाळी दे रे राम। नृत्यकला मज दे रे राम।।३।।
प्रबंध सरळी दे रे राम। शब्द मनोहर दे रे राम।।४।।
सावधपण मज दे रे राम। बहुत पाठांतर दे रे राम।।५।।
दास म्हणे रे सद्‌गुण धाम। उत्तम गुण मज दे रे राम।।६।।

(३)

पावन भिक्षा दे रे राम। दीनदयाळा दे रे राम।।धृ।।
अभेदभक्ती दे रे राम। आत्मनिवेदन दे रे राम।।१।।
तद्रुपता मज दे रे राम। अर्थारोहण दे रे राम।।२।।
सज्जनसंगती दे रे राम। अलिप्तपण मज दे रे राम।।३।।
ब्रह्मअनुभव दे रे राम। अनन्यसेवा दे रे राम।।४।।
मजविण तू मज दे रे राम। दास म्हणे मज दे रे राम।।५।।

सर्वच संतांनी सकाम भक्तीचा निषेध केला, पण सगळ्या संतांनी देवाजवळ काहीतरी मागितले. त्यांनी भगवंताजवळ भौतिक समृद्धी मागितली नाही तर सद्‌गुणांची मागणी केली. समर्थांना धर्मसंस्थापनेच्या कार्यासाठी जे महंत तयार करायचे होते ते वर सांगितलेल्या गुणांनी युक्त असणे आवश्यक होते. साधकाने एकदेशी किंवा एककल्ली नसावे. त्याने चतुरस्त्र असावे. तो नुसता पुस्तकी पंडित नको. तो अजातशत्रू हवा. लोकसंग्रहाची कला त्याला अवगत असावी. त्याचा अफाट व्यासंग असावा. म्हणून समर्थ या विविध गोष्टी भगवंताजवळ मागतात.

### १२) महंती सुखाची नाही-

समर्थांनी आरंभिलेल्या धर्मसंस्थापनेच्या कार्यात त्यांना सहकार्य करणाऱ्या कार्यकर्त्याला ते महंत अशी पदवी देतात. महंत होणे म्हणजे सुळावरील पोळीसारखे जीवन होते. मुळातच माणसे बदलायला तयार नसतात. त्यांच्या स्वभावातील दोष हेच त्यांच्या दु:खाचे कारण असते. परंतु लक्षात येऊनसुद्धा

माणसे त्याच चुका पुन्हा पुन्हा करीत राहतात. अशावेळी त्यांचे दु:ख बघवत नाही आणि त्यांचे दोष सहन होत नाही अशा कात्रीत महंत सापडतो. समर्थ म्हणतात-

'महंती सुखाची नाही। येथे दु:खे उदंडही।
उदंड दु:ख लोकांचे। ऐकता ऊर फाटतो।।१।।
लोक हे विकारी नाना। फार अन्याय वर्तती।
पाहावे ते किती डोळा। ऐकावे श्रवणे किती।।२।।
वळिता दु:ख मानिती। अन्याये घात नेणती।
सांगता हित वाटेना। ऐकता त्रास मानिती।।३।।'

स्वामी विवेकानंद एका पत्रात आपल्या गुरूबंधूना लिहितात-'एखादा रूग्ण आजारी असूनही औषध घ्यायला तयार नसतो. अशा वेळी कुशल वैद्य त्याच्या छातीवर बसून आणि त्याचे नाक दाबून त्याला बळेच औषध पाजतो. हे सगळे करताना त्याला वाईटपणा देखील येतो. पण तो ते सारे निमूटपणे सहन करतो. कार्यकर्त्याने आपल्या मनाची अशी तयारी ठेवावी.' स्वामीजींनी सांगितलेली गोष्टच येथे समर्थ सांगत आहेत. समाजाचे अनेक अपराध पोटात घालून सामाजिक परिवर्तन घडवून आणावे लागते. त्यासाठी खूप धीर धरावा लागतो. समाजात चांगल्या माणसांचा नेहमीच दुष्काळ असतो. महंताने भगवंताच्या भरवशावर सारे सहन करावे.

## १३) यत्नाचा लोक भाग्याचा-

समर्थ प्रयत्नवादासाठी प्रसिद्धच आहेत. सामान्य माणूस दैवाधीन असतो. आत्मपरिक्षण करून आपल्या चुका न शोधता तो आपल्या नशिबाला दोष देतो. सुशिक्षित माणसे बुद्धिविलासात रमतात. परिस्थितीत कसा बदल व्हायला हवा याची सारेजण आपापसात चर्चा करीत राहतात. परंतु प्रत्यक्ष प्रयत्न कोणीच करत नाही. लोकांनी जर मनावर घेतले तर एखादे राज्यशासनही ते बदलू शकतात, पण त्यासाठी संकल्पशक्ती हवी. प्रयत्नाच्या सहाय्याने माणूस काय काय करू शकतो याचे वर्णन करताना समर्थ म्हणतात-

'भाग्यासी काय उणे रे। येत्नावांचूनि राहिले।
येत्न तो करावा कैसा। हेचि आधी कळेचिना।।
मुख्य येत्न विचाराचा। त्यावरी बोलणे बरे।
चालणे सत्य नेमाचे। नीतिन्याय चुको नये।।
करंटे मिळाले सर्वे। जो तो बुधीच सांगतो।

सांगावे ते आपणाला। आपणु करिता बरे।।
मोठे ते पाप लोकांचे। प्रभु तो जाणता नव्हे।
वर्त्तो सिकविल्या बोलें। तो काय म्हैसमंगळु।।
खबरदार बरा राजा। विवेकी सर्व साक्षेपी।
आज्ञेने सर्व हि चाले। तेंणे सौख्य बहु जना।।
येत्नाचा लोक भाग्याचा। येत्नेवीण दरिद्रता।
उमजला लोक तो धाला। उमजेना तो हपापिला।।
हिंडता शाहाणे होते। बोलता बोल सीकते।
वाचिता लिहिता येते। तेणे ते मान्य होतसे।।
घरीच बैसतां खोटे। ब्राह्मणु हिंडता बरा।
आळसी घातघेणा तो। कष्टला म्हणिजे बरा।।
प्रसंगे वर्तता आले। येथातथ्य चि सुचिले।
मनुष्य राखिले राजी। तो प्राणी शाहाणा बरा।।
समयी धीर सोडीना। येत्नी येत्न बरा करी।
हिंडता पारखी लोकां। कार्यकर्ता जिवी धरी।।
उदंड ओळखी होता। उदंड भाग्य होतसे।
उदंड कलह होता। उदंड लाथ खातसे।।
विचारे गोड बोलावे। बहुता मान्यसे बरे।
भांडता पुरवेना की। मैत्रिकी करिता बरे।।
करावे तेचि पावावे। हे आले आपणाकडे।
आपले आपणापासी। जनासी काय बोल हा।।'

प्रसंगावधान, लोकसंग्रह, सामाजिक प्रबोधन, आदर्श राज्यशासन, संकटकाळी धैर्य या सर्व संकल्पना समर्थ येथे मांडतात. समष्टीच्या पातळीवर जर प्रयत्न केला गेला तर देशाचे आणि समाजाचे चित्र बदलू शकते त्यासाठी प्रामाणिकपणे सतत प्रयत्न हवेत.



# समर्थांची लोकसाहित्य रचना

समाज प्रबोधन करताना महाराष्ट्रातील सर्वच संतांच्या समोर सामान्य माणूस होता. दिवसभर शेतात राबणारा, पोटाची खळगी भरण्यासाठी हलकी-सलकी कामे करणारा, शिक्षणाची फार पार्श्वभूमी नसलेला असा समाज समर्थांच्या काळी फार मोठ्या प्रमाणात होता. या लोकांना जीवनाचे स्वरूप किंवा तत्त्वज्ञान पांडित्यपूर्ण भाषेत सांगून उपयोग नव्हता. मायाब्रह्माचा गंभीर विचार देखील त्यांना त्यांच्या लोकभाषेत सांगणे गरजेचे होते. यातूनच लोकसाहित्य रचना निर्माण झाली. भारूड, वासुदेव, डफगाणे, गोंधळ, बहुरूपी, पांगूळ, दंडीगाणे, खेळीया, वाघ्या हे विविध काव्यप्रकार लोकसाहित्य रचनेत मोडतात. नृत्य, एखादे वाद्य, जरा विचित्र वेषभूषा करून विनोदीशैलीत लोकांना सदाचाराचा बोध करून जीवनाचे सार्थक करण्याचा संदेश समर्थ या काव्यप्रकाराद्वारे देतात. लोकसाहित्य रचनेतील सर्व काव्यप्रकारांना समर्थांनी स्पर्श केला. ग्रामीण भागात समर्थांचा जास्त संचार होता. त्यांची बहुजन समाजातील शिष्यसंख्या कमी नव्हती. अशावेळी समर्थांनी हा सवंग काव्यप्रकार वापरून रंजनात्मक पद्धतीने प्रबोधन केले. या प्रकरणात समर्थांच्या अशा रचनांचा विचार आपण करणार आहोत.

## १) डफगाणे

डफ हे एक चर्मवाद्य आहे. छातीशी धरून ते वाजवतात. गाण्यासाठी डफाचा उपयोग भारतभर केला जातो. राजस्थानातील डफगाणी फार पूर्वीपासून प्रचलित आहेत. महाराष्ट्रात होळीच्या दिवशी किंवा मिरवणुकीत डफ वापरला जाई. शिवाजी महाराजांच्या काळात शाहिरांच्या हातात डफ आला. शाहिरांचे दोन गट हातात डफ घेऊन एकमेकांना कोडी टाकीत किंवा कूट प्रश्न विचारीत. प्रश्नाचे उत्तर देता आले नाही म्हणजे त्या शाहिराने डफ खाली ठेऊन

शरणागती पत्करायची. चाफळजवळ समर्थांनी यवनांच्या उत्सवात जमलेल्या शाहिरांना प्रश्नांची सरबत्ती करून कसे जेरीला आणले ते पाहा-

'किती पृथ्वीचे वजन। किती आंगोळ्या गगन।
सांग सिंधूचे जीवन। किती टांक।।१।।
किती आकाशाच्या तारा। किती पर्जन्याच्या धारा।
तृण भूमिवरी चतुरा। संख्या सांगा।।२।।
वायुसरसे उडती। सांग अणुरेणु किती।
लक्ष चौऱ्यांशीची उत्पत्ती। संख्या सांगा।।३।।
अठराभार वनस्पती। भूमंडळी पाणी किती।
पुष्पे फळ जाती किती। संख्या सांगा।।४।।
बीज वडी आणि पिंपळी। किती आहे भूमंडळी।
सर्व धान्याची मोकळी। संख्या सांगा।।५।।
सर्व सरितांची वाळू किती। सिंधुसागरी वाळू किती।
हरखू आहे किती। संख्या सांगा।।६।।
सांग माझे डफगाणे। की डफ ठेवी शहाणपणे।
देहबुद्धिची लक्षणे। सोडवीन।।७।।
ऐक जे जे पुशिले तुज। ते ते आता सांगा मज।
अनंत ब्रह्मांडे बेरीज। किती जाहली।।८।।
रामदासाचा विनोद। सांडी अहंतेचे बीज।
मग स्वरूपी आनंद। सुखी राहा।।९।।'

मनुष्याला आपल्या ज्ञानाचा खूप अहंकार असतो. परंतु या जगात अशा कितीतरी गोष्टी असतात की ज्या त्याला ठाऊक नसतात. त्यात अलिकडचे युग तर विशिष्ट विषयातल्या प्राविण्याचे (Specialization) युग आहे. माणसाला आपल्या अज्ञानाचीच कल्पना यामुळे येते. समर्थांनी शाहीरांना 'अनंत' या शब्दातच या प्रश्नाचे उत्तर दिले. काही ठिकाणी 'रामदासांचे गणित। सारे काही अगणित।' असे म्हणून या डफ गाण्याचा समारोप केला आहे. या डफगाण्यात पहिले ३ चरण अष्टाक्षरी असून शेवटचा चरण चार अक्षरी आहे. त्यामुळे डफगाणे म्हणत असतानाच एक प्रकारचा ठेका किंवा ताल तयार होतो. समर्थांनी अशाप्रकारची अनेक डफगाणी लिहिली आहेत. एका डफगाण्यात समर्थांनी सृष्टीची उत्पत्ती, स्थिती आणि लय याचे रहस्य सांगितले आहे. दुसऱ्या एका डफगाण्यात अन्नाचे महत्त्व सांगताना समर्थांनी आपल्या खास शैलीनुसार विविध प्रकारच्या खाद्यपदार्थांची यादी दिली आहे. डफगाण्याच्या शेवटी समर्थ

म्हणतात-

'अन्न ब्रह्म हे जाणावे। अन्न खाता तरी वाचावे।
अन्न न मिळता मरावे। कोण्ही तरी।।
अन्न सकळामध्ये थोर। त्यास कर्ता परमेश्वर।
तेथे असावे तत्पर। अहर्निशीं।।
रामदास म्हणे कर्ता। त्याचे भजनी प्रवर्ता।
जेणे घडे सार्थकता। निश्चयेसी।।'

समर्थ जेव्हा परमेश्वरास अन्नाचा कर्ता म्हणतात त्यावेळेस त्यांना 'जगी पाहता देव हा अन्नदाता' हा विचार सांगायचा असतो. भगवंताच्या कृपेने आपल्याला अन्न मिळत असल्यामुळे आपण त्याचे भजन करायला हवे. समर्थांच्या समोर गोरगरीब, अशिक्षित जनता आहे. भगवंताच्या कृपेने जेवायला मिळते असे सांगून समर्थ त्यांच्यातील भक्तीभाव जागा करीत आहेत. एका डफगाण्यात समर्थांनी शंकराच्या लग्नाचे मोठे गोड वर्णन केले आहे. डफगाण्यात डफाचा वापर करून लोक गोळा करता येतात आणि त्यांना विनोदी शैलीने मानवी जीवनातील व्यंगाचे दर्शन घडवून उपदेश करता येतो.

## २) भारूड-

भारूड म्हटले की आपल्या डोळ्यासमोर संत एकनाथ उभे राहतात. कारण नाथांची भारूडे खूप लोकप्रिय ठरली. तथापि अन्य संतांनी देखील या काव्यप्रकाराचा वापर केला आहे. बहुरूढगीत यातून भारूड शब्द तयार झाला असे सांगितले जाते किंवा भारलेले गूढ व्यक्त झाले ते भारूड असेही म्हटले जाते. काहीजणांच्या मते भारूड या दोन तोंडाच्या पक्षावरून भारूड शब्द रूढ झाला. भारूडातील ओव्यांमध्ये वाच्यार्थ आणि लक्ष्यार्थ किंवा व्यावहारिक अर्थ आणि पारमार्थिक अर्थ किंवा शब्दार्थ आणि गूढ अर्थ असे दोन अर्थ असतात. हीच ती दोन तोंडे होत. जनतेचा उद्धार व्हावा आणि सामान्यजनात ज्ञानाचा प्रसार व्हावा हा भारूडांचा प्रमुख उद्देश आहे. सासुरवास, भाऊबंदकी, नणंद-भावजय नाते यावर उपहासात्मक पण विनोदी रचना करून समर्थ विविध नाते संबंधावर प्रकाश टाकतात आणि शेवटी फक्त भगवंतच आपला आहे असा निष्कर्ष काढतात. लोकांचे मनोरंजन करीत करीत त्यांच्यातील दोषांचे भजन करणे भारूडाच्याद्वारे सहज शक्य होते. भारूडात मुख्य गाणाऱ्याला अन्य लोक साथ देतात त्यामुळे त्याची रंजकता वाढते. खेळ, खेळीया, कानफाट्या, चेंडू, गोंधळ, जागल्या हे भारूडाचे विविध प्रकार आहेत. संत कधीकधी

आपले थोर आध्यात्मिक अनुभव भारूडाद्वारे सांगून जातात. अंजन या भारूडात समर्थांनी आपुली उच्चतम आध्यात्मिक अनुभूती कशी सांगितली आहे ते पहा-

'डोळा हा गाळोनी साधिले अंजन। निजी निजधन प्राप्त जाले।।
पायाळाचे दिले बळीदान अंग। अंगी अंगसंग संगावीण।।
लाभ ना अलाभ वृत्ती ना निवृत्ती। शुद्धबुद्ध ज्ञप्ति मावळली।।
आकाश हरपले चिद्रूप संचले। सूर्यावीण पाहिले सदोदित।।
नाद बिंदू कळा ज्योति विश्रमली। रामदासा जाली वस्ती तेथे।।'

अध्यात्मात दृष्टी प्राप्त होण्यासाठी डोळ्यात अंजन घातले जाते. मनुष्य मूळात आनंदरूप आणि ज्ञानरूप आहे. अज्ञानामुळे माणूस स्वत:ला जीव समजून दु:खी होतो. एकदा माणसाला दृष्टी प्राप्त झाली की त्याला निजधन प्राप्त होते. समर्थांना आत्मप्रकाश प्राप्त झाल्याने सूर्यप्रकाशाशिवाय ते सारे काही पाहू शकतात. साधकाला साधना करताना नाद, बिंदु, ज्योती, कळा असे बारीक-सारीक अनुभव येतात त्यालाच तो फार मोठा पारमार्थिक लाभ समजतो. साधक जर तिथेच थांबला तर त्याला आत्मानुभूती येणार नाही. म्हणून समर्थ या सर्व अनुभवांच्या पलिकडे जातात आणि उच्चतम अवस्था प्राप्त करून घेतात.

'जागल्या' हा भारूड प्रकारही समर्थांनी वापरला. त्यावेळी समाजात रात्री जागे राहून गावाचे संरक्षण करणारा वर्ग होता. त्यांना जागल्या असे म्हणत. महार, मांग, भिल्ल, कोळी, रामोशी, मुसलमान या समाजातील लोक जागल्याचा व्यवसाय करीत. हे जागले गाव स्वच्छ ठेवण्याचेही काम करतात. समर्थांनी हिंदी भाषेत केलेली ही जागल्या काव्यरचना पाहा-

'जाग जागो रे भाई। जमसे करो लड़ाई।।धृ।।
जागो जागो मनमे बुझो मायाधंदा झूटा।
अलख पलख परयंकर देखो आया काल चपेटा।।१।।
दृढ भक्ति के सिले पेनो एक भावका घोडा।
रामनामजपमाला लेवो भगाव कालका पीडा।।२।।
रामदास प्रभुजीके सेवक कहा सुनो तुम भैया।
मनुषदेहसो व्यर्थ गवाया अंतकाल पस्ताया।।३।।'

माणूस दृश्य जगत आणि संसार यांना सर्वस्व मानून मायेत अडकतो. ही एक प्रकारची झोपच होय. या झोपेतून त्याला जागे करण्याचे काम संत जागल्याद्वारे करतात. मनुष्याच्या मनात दैवी संपत्ती आणि असुरी संपत्ती यांचे युद्ध सतत सुरू आहे. त्याच्या मनावर असुरी संपत्तीचा प्रभाव असल्यास दुष्कर्मे घडतात तर दैवी संपत्तीचा प्रभाव असल्यास सत्कर्मे घडतात. जर त्याने श्रद्धेने

रामनाम घेतले तर आपले मानवी शरीर विषयाधीन होऊन व्यर्थ गमावले असा त्याला पश्चाताप होणार नाही हा संदेश समर्थ येथे देतात.

आणखी एका मराठी जागल्यामध्ये समर्थांनी शरीराला नगरीची उपमा दिली आहे. जीवाला गावचा पाटील म्हटले आहे. पंचमहाभूते म्हणजे या पाटलाची पाच पोर, बुद्धी ही या पाटलाची पत्नी आहे; तर वासना ही लबाड कारभारीण आहे. समर्थ जिवाजी पाटलाला जागे करतात आणि मनोरूपी कुलकर्ण्याचे ऐकू नको असे सांगतात. मनात येईल तसे वागत गेल्यास देहनगरीचा नाश होईल असा धोक्याचा इशाराही ते देतात. वृद्धापकाळी डोळे, कान, नाक, दात या इंद्रियांची शक्ती कशी क्षीण होईल हे समर्थ विनोदी पद्धतीने सांगतात आणि जिवाजी पाटलाला जागे करतात.

'बहुरूपी' हा देखील भारूडाचाच प्रकार आहे. ही महाराष्ट्रातील भिक्षेकऱ्यांची एक जात आहे. हे भिक्षेकरी वेगवेगळ्या देवांची रूपे घेतात आणि लोकांची करमणूक करतात. त्या बदल्यात लोक त्यांना धन आणि धान्य देतात. विशेषतः सुगीच्या दिवसात हे भिक्षेकरी गावोगाव हिंडतात. विक्षिप्त आणि विनोदी गाणी म्हणून किंवा विविध पशुपक्ष्यांचे आवाज काढून ते लोकांची करमणूक करतात. सुगीच्या दिवसात त्यांना भरपूर धान्य मिळते. समर्थांनी दोन मराठी आणि एक हिंदी बहुरूपी रचना लिहिली आहे. आपल्या रचनेत समर्थांनी छान रूपक तयार केले आहे. समर्थ म्हणतात की भगवंत हाच मोठा बहुरूपी आहे. आपल्याला दिसतात त्या साऱ्या जीवांच्या रूपाने भगवंतच नटलेला आहे. हा दृष्य जगताचा खेळ भगवंत अखंड खेळतो आहे. विशेष म्हणजे एवढा खेळ खेळून भगवंत दमत नाही. ही रचना वाचताना ज्ञानदेवांचा चिद्विलास आठवतो. एका विनोदी बहुरूपीमध्ये समर्थांनी गुणांमधील भेदामुळे वस्तूच्या रूपांचे मूल्य कसे बदलते ते मोठ्या खुबीने दाखवले आहे.

'दूधगा' ही कडू वनस्पती म्हणते, की मला केळीच्या भावाने विका. वृंदावन नावाचे कडू फळ म्हणते की मला आंब्यासारखा मान द्या. अग्या नावाची विषारी वल्ली म्हणते की तुम्ही गळ्याला बुक्का लावता त्याऐवजी आम्हाला लावत जा. ढेकणं म्हणतात आम्हाला फुलांची शेज पाहिजे. शेवटी समर्थ म्हणतात की रूपावर काही अवलंबून नाही. माणसाचे गुण जसे असतील तसे त्याला महत्त्व मिळेल. 'मी जातीचा सोनार' या भारूडात समर्थांनी सुंदर रूपक तयार केले आहे. आत्मस्वरूप हेच सोने असून मी ते सोने चोरणारा सोनार आहे असे समर्थ म्हणतात. देह हे दुकान, अंतःकरणपंचक म्हणजे पाच रंगाच्या विटा, त्रिगुणाची मूस, सोऽहंची आहुती असा सोनारी व्यवसायाचा अर्थ

त्यांनी लावला. ही रचना वाचताना अशाच आशयाचा नरहरी सोनारांचा अभंग आठवतो.

३) गोंधळ-

समर्थांनी एका गोंधळाची रचना देखील केली आहे. घरातील मंगल कार्य निर्विघ्नपणे पार पडल्यावर कुलदेवतेच्या उपकाराचे स्मरण म्हणून गोंधळ घालण्याचा धार्मिक विधी प्रचलित आहे. हे काम करणाऱ्या मंडळींना 'गोंधळी' असे म्हणतात. या गोंधळींच्या भोवताली चार साथीदार असतात. ते मुख्य गोंधळ्याला प्रश्न विचारून विनोदी प्रसंग निर्माण करतात. गोंधळींचे मुख्य स्थान माहूर आणि तुळजापूर आहे. समर्थांनी आपल्या गोंधळात सृष्टी उत्पत्तीचा क्रम दिला आहे. ब्रह्मापासून मूळमायेचा उगम झाला. ही मूळमाया म्हणजेच रामवरदायिनी तुळजाभवानी होय. तीच माहूरची अथवा कोल्हापूरची देवी. या मूळमायेपासून त्रिगुण निर्माण झाले. मग नाना प्रकारची शरीरे, नाना प्रकारचे जीव, नाना धर्मग्रंथ, नाना साधनप्रकार, विविध देवदेवता, नाना योगी हे सगळे मूळमायेपासून निर्माण झाले. देवीचे स्तवन करताना समर्थ म्हणतात-

'अंबे नाम तुझे चांगले। मन माझे रंगले।।
मी तरी तुझे वो बाळक। न करी जनपांगिले।।धृ।।
पवित्र ठाणक माहोर। दुसरे तुळजापूर।
तेथे नांदती सुंदर। संतांचे माहेर।।१।।
तिसऱ्याने गाइन मी आऊंद। लागला तुझा छंद।
मूळ पीठ शिखरी भवानी। तू माझी स्वामिनी।।२।।
चौथ्याने गाइन मी रेणुका। सप्तश्री चंडिका।
गोंधळ घालिन मी भवानी। ध्यान तिही लोका।।३।।
तुज मी ध्यातसे अंतःकरणी। तू माझी स्वामिनी।
दास करीतसे विनवणी। दोन्ही कर जोडुनी।।४।।'

४) वासुदेव-

वासुदेव ही देखील भिक्षेकऱ्यांची एक जात आहे. डोक्यावर मोरपिसाची मुकूटाकार टोपी, घोळदार अंगरखा, गळ्यातून पुढे सोडलेला शेला, हातात टाळ अथवा चिपळ्या अशा आकर्षक रूपात वासुदेव गावोगाव हिंडत असतो. लोक त्यांना त्यांचे गाणे ऐकून भरपूर धन आणि धान्य देतात. समर्थांचा वासुदेव अनुभवातून शहाणा झालेला आहे. तो म्हणतो की मी पृथ्वीवर पुष्कळ फिरलो.

त्यामुळे मला खूप शीण आला, मात्र रामाच्या दारात मला विश्रांती मिळाली. माझ्या लक्षात आले की रामच खरा दाता आहे. बाकीचे लोक आपल्याला काय देणार? रामाजवळ मी मागायला गेलो तर त्याने मला रामरूपच करून टाकले. समर्थांना आता काही मागायची इच्छाच राहिली नाही. जो मागण्याची इच्छाच संपवून टाकतो तोच खरा दाता होय.

याखेरीज समर्थांच्या वाघ्या, भुत्या, जोहार, पांगुळ, चेटूक, डांका, डवरी अशा विविध रचना आहेत. त्यातील पांगुळाचा विचार करून आपण लोकसाहित्य रचनेचे प्रकरण पूर्ण करू. जोहारामध्ये जमिनीला हात लावून वंदन करण्याची पद्धत आहे. नाथांप्रमाणेच समर्थांनी आपल्या जोहारात स्वतःला महार म्हणवून घेतले आहे. पांगूळ ही देखील भिक्षेकऱ्यांचीच जात आहे. पहाटे भिक्षा मागताना धर्म जागविण्याचे मोठे काम ते करतात. समर्थांच्या पांगुळात देशभक्ती आणि देवभक्ती यांचा सुंदर मिलाप पाहायला मिळतो.

भरत खंडामाजी। शरयूतीर गावो। धर्माचे नगर तेथे। राज्य करी रामरावो। पांगुळा पाय देतो। देवी जानकीचा नाहो। जाईन मी तया ठाया। देवा दुर्लभ ठावो।।१।। राघवाचा धर्म जागो। अधर्म रे भागो। अज्ञान निरसुनिया। विज्ञानी लक्ष लागो।।२।। मीपणाचे मोडले पाय। म्हणोनि पांगुळ जालो। तूपणाची कीर्ति देई। ऐकुनिया शरण आलो। मीतूपणे निरसी माझे। भक्तिभिंतीवरी बैसलो। प्रेमफडके पसरूनिया। कृपादान मागो आलो।।३।। जगी एक तूचि दाता। म्हणोनि आलो मागावया। मागणे निरसे जेणे। ऐसे दे गा रामराया। नवविधा दुभते देई। भाव हलगा बैसावया। ज्ञानकाठी देई करी। वैराग्यवोली पांघराया।।४।। तुझे कृपेचा कांबळा। दे मज पांगुळाकारणे। मायामोह हीव वाजे। हे निवारेल जेणे। निष्कामभाकरी देई। कामनाक्षुधा हरे जेणे। बोधाचे ताक पाजी। शब्द खुंटे धालेपणे।।५।। दासीहाती देववीसी। ते मी नेघे सर्वथा। द्वैतदान नेघे जाण। दोही वेळ आणिता। आपणाऐसे दान देई। तू तव इच्छेचा दाता। अपूर्ण दान नेघे। पूर्ण करी निष्कामता।।६।। रामदास पांगुळासी। रामे दिधलिया दान। देणेची निरसे जेथे। कैची घेण्याची खूण। देणे घेणे निरसुनिया। अपूर्ण करी परिपूर्ण। दाता ना याचकु। तेथे सहजी सहज संपूर्ण।।७।।

अत्यंत गोड असे हे मागणे आहे. पांगुळ हा भिक्षेकरी असला तरी त्याचे मागणे अपूर्व आहे. मानवी जीवनाचे पूर्ण सार्थक या मागण्यात आहे. ज्ञानदेवांच्या पसायदानाची उंची या रचनेने गाठली आहे. ज्ञानदेवांनी 'निवृत्तीचा धर्म गाजो' अशी अपेक्षा व्यक्त केली तर समर्थांनी 'राघवाचा धर्म जागो' हे मागणे मागितले. दोघेजण आपापल्या गुरूंची धर्मदिंडी निस्पृहतेने मिरवित आहेत.

समर्थांनी मी पणाचे पाय मोडण्याला पांगुळ म्हटले आहे. खरा भक्त अगतिक होतो. आपल्या हातात काहीच नाही हे त्याच्या ध्यानी येते. सारे काही भगवंताच्या सत्तेने घडते आहे हे ज्ञान झाल्यावर मीपणाचे तुणतुणे आपोआप बंद पडते. भावयुक्त नवविधा भक्ती, वैराग्ययुक्त ज्ञान, मायामोहाचे निराकारण, बोधयुक्त निष्कामता हे मागणे समर्थ मागतात. रामाकडून या गोष्टी मिळाल्या म्हणजे समर्थच राम होणार आहेत. मग दाता आणि याचक हे द्वैत संपेल. पूर्ण झाल्यावर अपूर्णाला कुणाजवळ काही मागण्याचे प्रयोजनच राहणार नाही. हे पूर्णत्वाचे दान फक्त रामरायच देऊ शकतो.



# धन्य ते गायनी कळा

समर्थ रामदासांच्या अभ्यासपूर्ण चिंतनाचा स्पर्श ज्याप्रमाणे राजकारण, समाजकारण, व्यवस्थापन, वास्तुशास्त्र, साहित्य, कला, मानसशास्त्र, आरोग्यशास्त्र, प्रपंचकारण या विविध विषयांना झाला त्याचप्रमाणे संगीत, गायन, वादन, नृत्य यांना देखील झाला आहे. संप्रदायाच्या वीस लक्षणांमध्ये 'सहावे ते गाणे सातवे नाचणे। टाळी वाजविणे आठवे ते।' यांचा समावेश आहे. चौपदीमध्ये भगवंताजवळ विविध गुण मागताना संगीत गायन, नृत्यकळा, दस्तक टाळी, आलापगोडी हे सारे ते मागतात. डॉ. कमलाकर परळीकर या थोर संगीत शास्त्रज्ञाने समर्थांच्या संगीतकले वर अभ्यासपूर्ण ग्रंथ लिहिला असून त्यांच्या मते समर्थ रामदास हे संगीताचे फार मोठे जाणकार होते. समर्थांनी विविध रागात अनेक चिजा बांधल्या आहेत. समर्थ रामदास, संत नामदेव, संत तुकाराम हे सारे संत उत्तम कीर्तनकार होते आणि कीर्तन म्हटले की संगीत आलेच. त्यामुळे या सर्व संतांचा संगीताचा चांगला अभ्यास होता. समर्थांचे मामा तसेच वडील उत्तम कीर्तनकार होते. त्यामुळे संगीताचे हे ज्ञान त्यांना घरातच प्राप्त झाले असणार. संतांनी संगीताचा विचार केवळ कला म्हणून कधीच केला नाही. भगवद्प्राप्तीचा मार्ग आणि लोकांना भगवद्भक्तीला लावण्याचे साधन म्हणून ते संगीताकडे पाहातात. गायनाने मानवी जीवनात आमूलाग्र बदल घडू शकतो.

एकदा समर्थ मनाने खूप विषण्ण झाले. चाफळजवळील एका रानात ते मौन धारण करून बसले. ते लोकांशी संपर्क साधेनात. लोकांना तर त्यांच्या दर्शनाची आणि भाषणाची ओढ लागली होती. अशावेळी एकतारी वाद्य घेऊन एक जोगी त्यांच्या जवळ आला. त्याने आपल्या मधुर कंठाने एक सुंदर राग समर्थांना गाऊन दाखविला. त्यामुळे समर्थांची विषण्णता दूर झाली. प्रसन्न होऊन समर्थांनी त्या भैरवी जोग्याला शंभर होनांची सोन्याचे नक्षीकाम असलेली शाल

भेट दिली. यावरून समर्थांच्या जीवनात संगीताचे काय स्थान होते ते ध्यानात येते. भक्तांचे मनोरथ पूर्ण करणारी आणि भगवंताच्या गुणांचे वर्णन करणारी गायनी कळा समर्थांना धन्य वाटते. गीत, वाद्य, आणि नृत्य यांच्या त्रिवेणी संगमाला संगीत म्हणतात. हरीण, मोर, नाग या प्राण्यांवरही संगीताची मोहिनी दिसून येते. लहान मूल रडू लागले म्हणजे त्याला शांत करण्यासाठी आई गाऊ लागते. अंगाईगीताने मुलाला झोपविणे तर जगभर प्रचलित आहे. अशा गायनी कलेचे स्तवन करताना समर्थ म्हणतात-

'संगीत गायनी विद्या। सर्व सद्या मनोरथा।
विदेश पाहता नाही। धन्य ते गायनी कळा।।१।।
आवडी सकळै लोका। प्रीतीने भजती जनी।
इच्छिले पूर्विती सर्वे। धन्य ते गायनी कळा।।२।।
वेधिली सर्व ही चित्ते। बोधिली लोक भाविके।
अद्भूत गुण देवांचे। धन्य ते गायनी कळा।।३।।
येकाकी महंती येते। उदंड कीर्ति वाढते।
विख्यात सकलै लोकी। धन्य ते गायनी कळा।।४।।
राहाती लोक ते राजी। आवडी उपजे मनी।
वर्णिता कीर्ति देवाची। धन्य ते गायनी कळा।।५।।
बारीक उठती कीळा। नाना तंत परोपरी।
ऐकता गुदगुल्या होती। धन्य ते गायनी कळा।।६।।
बालके स्वापदे पक्षी। लोथती वेधनी मनी।
चित्त निश्चित होता हे। धन्य ते गायनी कळा।।७।।
भक्तीची आवडी मोठी। करूणा कीर्तने बरी।
भक्तांची आवडी भक्ता। धन्य ते गायनी कळा'।।१२।।'

तालबद्ध असलेले संगीत मनुष्याच्या मनाला आनंद देते. खुद्द भगवंताने स्वत:चा पत्ता सांगताना- 'मद्भक्ता: यत्र गायत्नि तत्र तिष्ठामि नारद' असे सांगितले आहे. 'प्रेमळ भक्तांचे गायन। आवडे देवा।।' असे समर्थही म्हणतात. भक्ताची लक्षणे सांगताना समर्थ म्हणतात-

'कार्यकर्ता निराभिमानी। गायक आणि वैष्णवजनी।
वैभव आणि भगवद्जनी। अत्यादरे।।'

श्रवणभक्ती करत असताना काय काय ऐकावे याची मोठी यादी समर्थ देतात. त्यामध्ये भक्ताने-

'रागज्ञान ताळज्ञान। नृत्य ज्ञान वाद्य ज्ञान।

अमृत वेळ प्रसंग ज्ञान। कैसे ते ऐकावे।।'

अशी अपेक्षा ते व्यक्त करतात. अमृत वेळ आणि प्रसंग ज्ञान यामध्ये कोणता राग केव्हा गावा याचे भक्ताला भान असले पाहिजे असे समर्थांना वाटते. एकदा कल्याणस्वामींनी सुमधूर, मनमोहक स्वरालाप काढले तेव्हा ते ऐकताना श्रोता मूर्छित होऊन पडला. त्यावेळी समर्थांनी वेणाबाईंना उताराचे गाणे म्हणायला सांगितले. त्यावेळी तो मनुष्य पुन्हा शुद्धीवर आला. कीर्तनकाराने कीर्तन करताना-

'ताळ मृदंग हरीकीर्तन। संगीत नृत्य तान मान।
नाना कथानुसंधान। तुटोचि नेदावे।।
संगीत रसाळ हरिकीर्तन। तालबद्ध तान मान।
प्रेमळ आवडीचे भजन। अंतरा पासुनी''।।

गाणाऱ्याचा गळा आणि ऐकणाऱ्याचे कान तयार असले म्हणजे कीर्तनात भक्तीचा रंग चढतो. कीर्तनकाराने कीर्तनात कसे गावे आणि कसे गाऊ नये याचे सुंदर दिग्दर्शन समर्थ करतात. गाताना खाकरत किंवा घसा साफ करत गाऊ नये. समर्थ म्हणतात-

'गर्व गाणे गाऊ नये। गाता गाता गळो नये।
गौष्य गुज गर्जो नये। गुण गावे।।
घष्टणी घिसणी घस्मरणे। घसर घसरू घसा खाणे।
घुम घुमोचि घुमणे। योग्य नव्हे।।'

कोमल कुशल गाता यावे म्हणून समर्थ भगवंताजवळ कोमळ वाचा मागतात. कठीण आणि कर्कश आवाज नसावा. गळा तयार होण्यासाठी गायकाला सतत रियाज करावा लागतो. हा रियाज म्हणजे संगीताची उपासना आहे. ही उपासना जाणत्या माणसाच्या जवळ बसूनच करावी लागते. समर्थ म्हणतात-

'ज्याची जैसी उपासना। तेचि गावे चुकावेना।
रागज्ञाना तालज्ञाना। अभ्यासावे।।
जाणत्या पासी गावे गाणे। जाणत्या पासी वाजविणे।
नाना आलाप सिकणे। जाणत्या पासी।।'

गुरूशिवाय संगीतातील नाना प्रकारचे आलाप गायकाला आत्मसात करता येणार नाहीत. गातानाचे हावभाव, हातवारे, चेहऱ्यावरील भावना, नृत्यकलेतील हस्तन्यास आणि पदन्यास हे सारे पाहाताना श्रोत्यांना आनंद वाटावा. कीर्तनकारांसाठी समर्थांनी अनेक रागदारी पदांची रचना केली. आपल्या

स्त्रीशिष्यांनाही त्यांनी कीर्तनाचा अधिकार दिला. रियाजाचे महत्त्व सांगताना-

'गाईले चि गावे जीवे सर्व भावे। तेचि ते म्हणावे रात्रं दिवस।।१।।
रात्रंदिवस नाम तेचि ते मागुते। आवडी स्वहित गात जावे।।२।।
गात जावे परि वीट मानू नये। दास म्हणे सोय राघवाची'।।३।।'

असे समर्थ म्हणतात. भीमसेन जोशी रोज अठरा अठरा तास रियाज करीत म्हणून ते भारतरत्न ठरले. समर्थ ज्याप्रमाणे कीर्तनकराला 'मोले कीर्तन करू नये' अशी सूचना देतात त्याचप्रमाणे गायकाला 'पोटासाठी गाऊ नये' म्हणून बजावतात. गाताना श्रृंगारिक चाळे त्यांना मान्य नाहीत. ते बजावतात-

'वर्णी स्त्रियांचे आवेव। नाना नाटके हावभाव।
देवा विसरे जो मानव। तो येक पढत मूर्ख।।
लावण्य स्त्रियांचे ध्यान। कामाकार जाले मन।
कैचे आठवील ध्यान। ईश्वराचे।।'

अलिकडे काही कीर्तनकार सवंग लोकप्रियतेसाठी कीर्तनामध्ये श्रृंगाररसाचा जास्त वापर करतात. काही कीर्तनकार विनोदाच्या नावाखाली स्त्री निंदा करतात. समर्थांनी हे सर्व प्रकार निषिद्ध मानले आहेत. एवढेच नव्हे तर कीर्तनात संगीताचा अतिरेकही समर्थांना मान्य नाही. गायन हे साधन आहे आणि भगवंत हे साध्य आहे. जेव्हा भगवंतापेक्षा संगीताला कीर्तनात जास्त महत्त्व दिले जाते तेव्हा समर्थ बजावतात-

'सांडोनि देव सर्वज्ञ। नादामध्ये व्हावे मग्न।
हे तो प्रत्यक्ष विघ्न। आडवे आले'।।

जे मन भगवंताला अर्पण करायचे ते स्वरांमध्ये कसे अडकवून ठेवता येईल?

समर्थांचा शास्त्रीय संगीताचा गाढा व्यासंग होता. त्याबाबतीत समर्थ सुधारणावादी किंवा उदारमतवादी होते. सुघराई, हुसेनी, कानडा हे राग मोघली असूनसुद्धा समर्थांनी त्यांचा स्वीकार केला. समर्थांनी कीर्तनकारांसाठी पावक, गौडी, कल्याण, केदार, अहेरी, धनाश्री, सारंग, देसी, जयजयवंती, शंकराभरण, वैराळी, आसावरी, मारू, काफी, हुसेनी, वसंत या विविध रागात पदांची रचना केली. मठताल, एकताल, त्रिताल, दुताल यांचा वापरदेखील समर्थ मोठ्या कौशल्याने करतात. मृदुंगवादनाचा समर्थांचा अभ्यास गाढा होता. नृत्य करणाऱ्या गणपतीचे त्यांनी जे वर्णन केले आहे त्याचे हे बोल पहा-

'द्राम द्राम धिकिट द्राम द्राम धिकिट द्राम द्राम धिकिट थोंगा तग थोंगा थैया।

आरंभी नाचतु से। गणाधीश आरंभी नाचतुसे।।१।।
थोंगी थोंगी थरिकट थोंगी थोंगी थरिकट।
थोंगी थोंगी थरिकट तक थोंगी थोंगी।।२।।
ताग्ड ताग्ड धिधिकट ताग्ड ताग्ड धिधिकट।
ताग्ड ताग्ड धिधिकट थेया तग थेया दास।।३।।'

अशा समर्थांच्या अनेक तालबद्ध रचना आहेत. आश्चर्य म्हणजे एका काव्यात समर्थांनी सर्व प्रकारच्या वाद्यांची नावे दिली आहेत-

'मृदांग तुंबरे टाळा। वीणे झल्लरी घघरी।
दमामे नगारे घंटा। शंख शृंगे परोपरी।।१।।
किन्नरी चंग सारंगी। दंडी पावे नागसरे।
तुतारे काहाळा वाके। प्रचीत पाहणे बरी।।२।।
समेळ चौंडके डांका। डौर डफरीये बाजू।
कमाचे रबाब हाते। कालू कर्णेचे चौपडे।।३।।
सनया ढालई राणी। सुंदरे सार मंडळे।
चोपोळ्या जेंगटे ताने। डफ घुमुस टीपरी।।४।।
तुड्डुम दुंदभी भेरी। उपांग नडगी सिळा।
आवृत्त्या मुखविणे ते। चटक्या घोळ घागरी।।५।।
घन तंत स्वादिक ते। नाना वाद्ये परोपरी।
दळी ते गर्जती वाटे। कानडा हाक मारिती।।६।।'

वाद्यांची एवढी नावे संगीताचे वर्ग घेणाऱ्या शिक्षकांनाही झटकन सांगता येणार नाहीत. या सर्व गोष्टी समर्थांच्या व्यासंगाचे द्योतक म्हणावे लागेल.

समर्थांनी संगीतकलेचा उपयोग केवळ वैयक्तिक साधनेसाठी केला नाही तर सामुदायिक उपासनेसाठी केला. प्रभू रामचंद्र हाच त्यांच्या गायनाचा केंद्रबिंदू होता. समाजात भक्तिभाव वाढवणे हेच त्यांच्या भजनाचे प्रयोजन होते. ते म्हणतात-

'आपण अवचित मरोन जावे। मग भजन कोणे करावे।
या कारणे हरिभजनासी लावावे। बहुत लोक।।'

लोकसंग्रह, समाज संघटन, सामाजिक प्रबोधन यासाठी समर्थांनी संगीतकला वापरली. लोकांची राष्ट्रीय अस्मिता जागी करून संगीताच्या माध्यमातून स्वदेश आणि स्वधर्म यांची स्थापना त्यांनी केली. व्यवसाय किंवा कला म्हणून त्यांना संगीताकडे कधीच पाहिले नाही. त्यामुळे संगीताला फार मोठी सामाजिक प्रतिष्ठा समर्थांनी प्राप्त करून दिली. त्यांच्या विविध प्रकरणातून

संगीतातील अनेक पारिभाषिक शब्द आपल्याला पाहायला मिळतात.

दुर्देवाने रामदासी संप्रदायात आज समर्थांची ही स्वर साधना पाहायला मिळत नाही. ईश्वरप्राप्ती हेच मानवी जीवनाचे एकमात्र प्रयोजन असून संगीताद्वारे ते साधता येते. ही समर्थांची प्रामाणिक धारणा त्यांच्या संगीत चिंतनात आढळते. गाणारा आधी निष्ठावान भक्त असावा आणि मग कलावंत असावा याची त्यांनी काळजी घेतली. कल्याणस्वामी, उद्धवस्वामी, गिरिधरस्वामी, आक्काबाई, वेणाबाई असे अनेक भक्त त्यांनी तयार केले. संगीत क्षेत्रातील समर्थांचे योगदान कोणालाही नाकारता येणार नाही.



# समर्थांचे अभंग

अभंग हा शब्दच किती गोड आहे! जो कधी भंग पावत नाही तो अभंग. अभंगांचा गाथा हे संत वाङ्मयाचे अविभाज्य अंग आहे. सगळ्याच संतांच्या अभंग रचना उपलब्ध असून भक्तीमार्गात अभंगाच्या गायनाला असाधारण महत्त्व आहे. गाथा हा शब्द तर ऋग्वेद कालापासून प्रचलित आहे. अभंगांच्या किंवा पदांच्या संग्रहाला गाथा असे म्हणतात. या अभंगांना अनुभवाचे अधिष्ठान असते. भगवंताची स्तुती करणे, भगवंतांची करूणा भाकणे, साधकाला मार्गदर्शन करणे, भक्तीला पूरक असा उपदेश करणे हा अभंग लेखनाच्या पाठीमागील प्रधान हेतू सांगता येईल. इतिहासाचार्य राजवाडे यांनी भिन्न भिन्न छंद आणि रचना प्रकारावरून प्रतिष्ठा अभंग, सुप्रतिष्ठा अभंग, अनुष्टुभ अभंग, बृहती अभंग, पंक्ती अभंग, जगती अभंग असे अभंगांचे नाना प्रकार सांगितले आहेत. अभंगामध्ये छंद भंग नसतो किंवा स्वरभंग नसतो, म्हणून ते ऐकायला गोड वाटतात. तुकाराम महाराजांच्या अभंगांबद्दल संत दासगणू महाराज म्हणतात-

'जया भंग नाही अशा त्या अभंगा। रचोनि सदा गाईले पांडुरंगा'।। संत ज्ञानेश्वर, संत नामदेव, समर्थ रामदास, संत तुकाराम या सगळ्यांचे अभंग गाथा उपलब्ध आहेत. तथापि अभंगाचा गाथा म्हटले म्हणजे तुकाराम महाराजांचाच गाथा डोळ्यासमोर येतो.

अनेकदा अभंग रचनेत भगवंताच्या स्तुती बरोबरच समाजातील दांभिकतेचा परखडपणे समाचार घेतलेला असतो. संतांनी अभंगाद्वारे सामाजिक समरसता निर्माण केली. समाजात श्रद्धा, प्रेम, सद्भाव, सदाचार यांचा प्रसार करणे तसेच लोकांमध्ये विवेक आणि वैराग्य निर्माण करणे हे कार्य संतांनी अभंगाद्वारे केले. संत नामदेवांनी काही अभंगाद्वारे संत ज्ञानदेवांचे चरित्र कथन केले आहे. संत निळोबारायांच्या काही अभंगात संत तुकाराम महाराजांची स्तुती

आढळते तर तुकाराम महाराजांच्या काही अभंगात ज्ञानदेवांची स्तुती आढळते. अशा प्रकारे अभंग वाङ्मयाद्वारे तत्कालीन सामाजिक परिस्थितीलाही स्पर्श केला जातो.

समर्थांचे अभंग वारकरी संतांच्या अभंगांएवढे लोकप्रिय नसले तरी समर्थ संप्रदायात सर्व मठात ते रोज म्हटले जातात. समर्थांच्या अभंगांची संख्या सुमारे दोन हजार भरेल. काही अभंगातून समर्थांचे संगीत प्रेम दिसून येते. दास, रामदास, रामी रामदास, राघवदास, देवदास अशा विविध नाममुद्रा वापरून समर्थांनी आपले अभंग रचले आहेत. अभंग रचना करताना समर्थांनी त्यांच्या खास वैशिष्ट्यानुसार समाजातील विविध अंगांना स्पर्श केला आहे. त्यांच्या ज्या विविध प्रकारच्या लोकसाहित्य रचना आपण पाहिल्या तो अभंग वाङ्मयाचाच एक प्रकार आहे. समर्थ रामभक्त असले तरी अत्यंत उदारमतवादी होते. त्यामुळे रामाबरोबरच भगवान श्रीकृष्ण, विठ्ठल, शंकर, खंडोबा, व्यंकटेश, नृसिंह, सूर्य, दत्तात्रय, गणपती, दशावतार, अंबामाता, अष्टभूजा, महालक्ष्मी, महाकाली, सरस्वती अशा विविध देवतांचे अभंग त्यांनी रचले. जेव्हा एखाद्या विशिष्ट देवतेचे समर्थ वर्णन करू लागतात तेव्हा त्या देवतेशी ते इतके एकरूप होतात की अभंग वाचताना आपल्याला वाटू लागते की समर्थ या देवतेचे कट्टर उपासक आहेत.

गणेशाच्या अभंगात गणपतीचे फार सुंदर वर्णन समर्थ करतात. गणेशाच्या नृत्यातील चपलता समर्थ वारंवार वर्णन करतात. एका पंचवीस कडव्याच्या अभंगातील त्यांनी केलेले गणेशाचे वर्णन वाचताना श्रीमद् दासबोधातील गणेश स्तवनाचे स्मरण होते. रामाचे ध्यान वर्णन करताना समर्थांना सर्व दुःखांचा परिहार झाला असे वाटते. रामाच्या रूपाचे वर्णन करण्याची आपली असमर्थता ते प्रारंभी व्यक्त करतात-

'श्रीराम वाचे नवचे वर्णिला। श्रीराम मने नवचे कल्पिला।
श्रीराम नवचे चित्ती चिंतिला। आत्मरूप पाहिला नवचे नेत्री'।।

राम आठवावा आणि हृदयात साठवावा असे समर्थांना वाटते. ज्याप्रमाणे हनुमंताच्या चरित्राचे आणि गुणांचे वर्णन करण्याचा त्यांना छंद आहे त्याचप्रमाणे रामाचेदेखील ते सतत वर्णन करीत राहातात. एका पासष्ट कडव्यांच्या अभंगात तसेच एका एकशे पाच कडव्यांच्या अभंगात ते संपूर्ण रामचरित्राचे गायन करतात. जेव्हा त्यांना रामाचा विरह सहन होत नाही तेव्हा ते हनुमंताला रामाला सत्वर घेऊन येण्याची विनवणी करतात. अनेकदा हनुमंताशी संभाषण करून ते हनुमंताजवळ रामाचे कुशल विचारतात. एका अभंगात ते रामाचे स्त्री रूपात

वर्णन करतात. आई ज्याप्रमाणे आपल्या लहान मुलाला कधीतरी परकर-पोलकं घालते तसे समर्थ वात्सल्यभावाने रामाकडे पाहातात. समर्थांनी काही अभंगात हनुमंताचेही स्तवन केले आहे. हनुमंताची स्तुती ही त्यांना रामभेटीची गुरूकिल्ली वाटते. हनुमंताची स्तोत्रे लिहून समर्थांचे समाधान झाले नसावे. म्हणून त्यांनी अभंगात त्याचे चरित्रगायन केले.

## अभंगातील कृष्णभक्ती आणि विठ्ठलभक्ती-

समर्थ अनेकदा कृष्णाचे बालरूपातील चरित्र गातात. सूरदासाप्रमाणे प्रौढ वयातील श्रीकृष्ण त्यांना वर्ज्य असावा. गोकुळातील कृष्णाची मुरली हा समर्थांचा आकर्षण विषय दिसतो. कृष्णाच्या नुसत्या मुरलीवर त्यांचे अकरा अभंग आहेत. गवळणी, काला यांचेही वर्णन ते करतात. विशेषत: बालकृष्णाच्या खोड्या वर्णन करताना समर्थ रंगून जातात. कदाचित त्यांना त्यांचे बालपण आठवत असावे. काल्याच्या अभंगात कृष्णाच्या विविध सवंगड्यांची नावे तसेच त्यांनी आणलेल्या खाद्यपदार्थांची यादी समर्थ देतात.

विठ्ठलाची स्तुती करताना समर्थांना राम, विठ्ठल आणि कृष्ण हे तिघे एकरूप वाटतात. ते म्हणतात-

'राम अयोध्येचा वासी। तोचि नांदे द्वारकेसी।।१।।
कृष्ण नामाते धरिले। बहु दैत्य संहारिले।।२।।
सखया मारूती लागुनी। रूप दावी चापपाणी।।३।।
पुढे भूभार उतरिला। पांडवांसी सहाय्य जाला।।४।।
आता भक्तांचियासाठी। उभा चंद्रभागेतटी।।५।।
राम तोचि विठ्ठल जाला। रामदासासी भेटला'।।६।।

समर्थ अनेकदा पंढरपूरला गेलेले आहेत. त्यांनी पंढरपूरजवळील मेथवड्याचे मठपती मेथवडेकर बुवा यांना पंढरीची वारी करण्याचा आदेश दिला हे सर्वश्रुतच आहे. आजही ही वारी सुरू आहे. पंढरपूरचे वर्णन करताना एका अभंगात ते म्हणतात-

'पंढरीऐसे तिन्ही ताळी। क्षेत्र नाही भूमंडळी।।१।।
दुरूनि देखता कळस। होय अहंकाराचा नाश।।२।।
होता संतांचिया भेटी। जन्ममरणा पडे तुटी।।३।।
चंद्रभागेमाजी न्हाता। मुक्ति लाभे सायुज्यता।।४।।
दृष्टी न पडे ब्रम्हादिका। प्राप्त जाले ते भाविका।।५।।
रामदासा जाली भेटी। विठ्ठलपायी दिधली मिठी'।।६।।

हे अभंग वाचताना समर्थ वारकरी झाल्याचे जाणवते. 'येथे उभा का श्रीरामा। मनमोहन मेघःश्यामा।' या अभंगात त्यांना विठ्ठलाने रामरूपात दर्शन दिल्याची स्पष्ट नोंद आहे. पुढील अभंगात त्यांचा विठ्ठलाबद्दलचा आर्तभाव पहा-

'विठोबा तू आमचे कुलदैवत। आम्ही अनन्य शरणागत।
तुझे पायी असे चित्त। जीवी आर्त भेटीचे।।१।।
धावे पावे विठो माये। उडी घाली लवलाहे।
भेटावया जीव फुटो पाहे। खंती देही न समाये।।२।।'

भगवान शंकराचे एका अभंगात वर्णन करताना समर्थांनी बीभत्स रसाचा वापर कसा केला आहे ते पहा-

'कराळे विक्राळे भुतेनानापरी। तेथे क्रीडा करी महादेव।।
भुते मांस खाती रक्त तोंडी हाती। वर्डाती झोंबती येकमेका।।
कैचे भारेभार चालिले अपार। फुंपाती विखार आंगावरी।।
लवथविती ओली हत्तीची कातडी। गळती आतडी लवथवीत।।
घामावरी रक्त रक्तावरि राख। राखेवरी विख वाहतसे।।
भूतफौजा ऐशा भणभणती माशा। नंदीच्या गोमाशा भारेभार'।।

दैवतांच्या वर्णनाचे अभंग लिहिताना देखील समर्थांना तत्कालिन घटनांचे भान होते. सोरटी सोमनाथला शंकराचे उध्वस्त देवालय पाहून त्यांना दुःख झाले असावे, मात्र शिवरायांचे कुलदैवत असलेल्या शिखर शिंगणापूरला आल्यावर 'सोरटीचा देव माणदेशा आला' असे उत्स्फूर्त उद्‌गार त्यांच्या मुखातून बाहेर पडले.

देवीचे वर्णन करताना समर्थ तिला शक्ती म्हणतात. देवीची उपासना म्हणजे शक्तीची उपासना किंवा बलाची उपासना होय. हनुमंताप्रमाणेच दुष्टांचा संहार करणारी म्हणून त्यांना देवी पूजनीय वाटते. याचा अर्थ समर्थांची उपासना ही वैयक्तिक मोक्षासाठी नसून समाज आणि राष्ट्र यांच्या पुनरूत्थानासाठी होती. एका अभंगात त्यांनी शंकर आणि खंडोबा हे दोघे एकच होत असे म्हटले आहे. दोघांच्या अभिव्यक्तीत फरक असला तरी भगवान शंकराने खंडोबाचे रूप धारण केले असे समर्थांना वाटते. शंकराचे वाहन पांढरा नंदी आहे तर खंडोबा निळ्या घोड्यावर बसला आहे. शंकराच्या अंगाला भस्म आहे तर खंडोबाच्या अंगाला पिवळा भंडारा आहे. हा वरवरचा फरक समर्थांच्या दृष्टीने अत्यंत गौण आहे.

समर्थांनी वेगवेगळ्या देवतांच्या सवायादेखील लिहिल्या आहेत. सवाया वीर भावाने खड्या आवाजात म्हणावयाच्या असतात. भगवंत हा राजा असून

त्याचे भाट अथवा दास दरबारात त्याचे गुणगान गात आहेत अशा कल्पनेने समर्थ विविध देवतांचे स्तवन करतात. श्रीमद् दासबोधाप्रमाणेच समर्थ काही अभंगात नरदेहाचे स्तवन करतात तर काही अभंगात नरदेहाची निंदा करतात. शेवटी शरीर चांगलेही नाही आणि वाईटही नाही तर शरीराचा वापर आपण कसा करतो यावर अवलंबून आहे. सर्व संतांनी देह भगवद् उपासनेत लावून त्याचे सार्थक केले आहे. एका अभंगात समर्थांनी वार्धक्याचे किती प्रभावी वर्णन केले आहे ते पहा-

'डोळे चिरीव चांगले। वृद्धपणी सरक्या जाले।।
ओले मातीचा भरवसा। काय धरिसी माणसा।।
मुख रसाळ चांगले। पुढे अवघे सुरकुतले।।
रम्य नासिक सरळे। सर्वकाळ पाणी गळे।।
कर्ण भूषणी सुंदर। पुढे जाहले बधिर।।
बरवी दंतांची पंगती। परी ते उन्मळोनि जाति।।
बरवे कर आणि चरण। परि ते जाले निष्कारण।।
अंगकांति होती बरी। जाली चिरगुटाचे परी।।
केस होताती पांढरे। लाळ गळता न धरे।।
बहुसाल होते बळ। पुढे जाहले निर्बळ।।
देह होते जे निर्मळ। तेचि जाहले ओंगळ।।
गर्व तारूण्याचा गेला। प्राणी दीनरूप जाला।।
रामीरामदास म्हणे। आता सावधान होणे'।।

म्हणून 'देही आरोग्य चालते। भाग्य नाही यापरते।' असा शेराही समर्थ मारतात. समर्थांनी एका अभंगात कलियुगाचे केलेले वर्णन सद्यस्थितीला अगदी लागू आहे-

'कामधेनू मोकलिले। घरी गाढव पाळिले।।
उपटूनि कल्पतरू। केला शेराचा आदरू।।
सांडूनिया चिंतामणी। वेची दहिवराचे पाणी।।
गेले हातीचे निधान। केले कवडीचे साधन।।
परीस रागे हुंडारिला। हाती पाषाण घेतला।।
सार अमृत सांडले। दैन्यवाणे कांजी प्याले।।
सोने सांडोनि आदरे। वेचो लागला खापरे।।
रत्ने टाकुनिया खडे। गेले म्हणोनि दुःखे रडे।।
केली साखर परती। सुखे तोंडी घाली माती'।।

याखेरीज सत्संग, सद्‌गुरू, दांभिक गुरू, पंचीकरण, विवेक-वैराग्य, नवविधा भक्ती, आध्यात्मिक उपदेश, सावधानता, प्रचिती, दांभिकता या विविध विषयांना समर्थ अभंगाद्वारे स्पर्श करतात. ज्या अभंगात समर्थांच्या जीवनात घडलेल्या एखाद्या घटनेचा संदर्भ आहे ते अभंग पाहून आपण हे प्रकरण पूर्ण करू.

संत कधी आत्मचरित्र लिहीत नाहीत. पण त्यांच्या जीवनातील आध्यात्मिक अनुभूतीचे मधुर प्रसंग ते अभंगात वर्णन करतात. अभंगातील या नोंदी ऐतिहासिक कागदपत्राप्रमाणे मौलिक मानल्या पाहिजेत. पंचवटीतील राममंदिरात समर्थ रामायणावर प्रवचन करीत असताना खुद्द मारुतीराय श्रवणाला येऊन बसत. हनुमान सीतेच्या शोधासाठी लंकेत पोहोचले हा प्रसंग चालू होता. रावणाच्या उद्यानात पांढरा जास्वंद होता असे समर्थांनी सांगताच मारुतीराय उठले आणि लंकेत रावणाच्या उद्यानात तांबडा जास्वंद होता असे सांगू लागले. अखेर प्रत्यक्ष लंकेत जाऊन या गोष्टीची चिरंजीव असलेल्या बिभिषणाकडून शहानिशा करायचे ठरले. दोघे लंकेत गेले. बिभिषणाला भेटले, तेव्हा बिभिषण हनुमंताला म्हणाले- 'हनुमंता, रावणाच्या उद्यानात पांढरा जास्वंदच होता पण तू अतिशय संतापला होतास म्हणून तुला ती फुलं लाल दिसली.' एका अभंगात समर्थांनी बिभिषणाचे स्तवन केले आहे. त्यात या प्रसंगाची नोंद आढळते. समर्थ म्हणतात-

'धन्य हे नगर धन्य बिभीषण। धन्य वरदान समर्थांचे।।
भेटीचा हा लाभ मारूतीच्या संगे। पुष्पाचिया योगे लाभ जाला।।
म्हणौनिया विनंती ऐका लंकापति। लोभ फार चित्ती असो द्यावा।।'

हा प्रसंग जरी चमत्कारयुक्त असला तरी या अभंगामुळे स्वीकारावा लागतो. सर्वच संतांच्या चरित्रात अशा प्रकारचे प्रसंग आढळतात. ज्ञानदेवांनी भिंत चालविल्याचा किंवा रेड्यामुखी वेद बोलविल्याचा उल्लेख त्यांना समकालीन असलेल्या नामदेवांच्या अभंगात आढळतो.

समर्थ वयाच्या १२ व्या वर्षी लग्नमंडपातून पळाले. पुढे २४ वर्षानंतर ते जांबेला परत येऊन आईला भेटले. त्यावेळी त्यांच्या मातेची दृष्टी गेलेली होती. पण समर्थांनी आपल्या हातांनी स्पर्श करताच त्यांच्या मातेला परत दृष्टी मिळाली. त्यावेळी 'अरे नारायणा, कोणते भूत वश केलेस बाबा?' असा प्रश्न आईने विचारला. समर्थांनी आपल्या मातेला अभंगात मोठे गूढ उत्तर दिले. दहा कडव्यांच्या या अभंगात संपूर्ण रामचरित्र येऊन गेले. समर्थ म्हणतात-

'होते वैकुंठीचे कोनी। शिरले अयोध्याभुवनी।

लागे कौसल्येचे स्तनी। तेचि भूत गे माये।।१।।
जाता कौशिकराऊळी। अवलोकिली भयंकाळी।
ताटिका ते छळूनि गेली। तेचि भूत गे माये।।२।।
मार्गी जाता वनांतरी। पाय पडला दगडावरी।
पाषाणाची जाली नारी। तेचि भूत गे माये।।३।।
जनकाचे अंगणी गेले। शिवाचे धनु भंगिले।
वैदेहीअंगी संचरले। तेचि भूत गे माये।।४।।
जेणे सहस्त्रार्जुन वधिला। तोही तात्काळचि भ्याला।
धनु देऊनि देह रक्षिला। तेचि भूत गे माये।।५।।
पितयाचे भाकेसी। कैकयीचे वचनासी।
मानुनी गेले अरण्यासी। तेचि भूत गे माये।।६।।
चौदा संवत्सर तापसी, अखंड हिंडे वनवासी।
सांगाती भुजंग पोसी। तेचि भूत गे माये।।७।।
सुग्रीवाचे पालन। वालीचे निर्दालन।
तारी पाण्यावरी पाषाण। तेचि भूत गे माये।।८।।
रक्षी भक्त बिभीषण। मारी रावण कुंभकर्ण।
तोडी अमरांचे बंधन। तेचि भूत गे माये।।९।।
वामांगी स्त्रियेसी धरिले। धावूनि शरयूतीरा आले।
तेथे भरतासी भेटले। तेचि भूत गे माये।।१०।।
सर्व भूतांचे हृदय। नाव त्याचे रामराय।
रामदास नित्य गाय। तेचि भूत गे माये'।।११।।'

अत्यंत उत्स्फुर्तपणे घडलेली ही रचना आहे. समर्थांनी तुकाराम महाराजांना एका अभंगात आपली गुरूपरंपरा सांगितली आहे. त्यामध्ये आपल्या वडिलांना तसेच आपल्याला प्रत्यक्ष रामचंद्रांच्याकडून कसा अनुग्रह झाला ते दिले आहे.

एकदा समर्थांनी शिष्यांची परीक्षा पाहाण्यासाठी सज्जनगडावर वेड्याचे सोंग घेतले. सर्वांगाला कुंकू फासून आणि हातात तलवार घेऊन उग्र रूप धारण केले. ते कोणालाही जवळ येऊ देत नव्हते. कोणी जवळ येऊ लागला तर 'जवळ आल्यास या तलवारीने डोके उडवीन असे ओरडून बजावत. मात्र कल्याणस्वामींनी हे आव्हान स्वीकारले. गुरूच्या हस्ते मरण आले तर तो मोक्षच होय, या धारणेने कल्याणस्वामींनी पुढे येऊन समर्थांचे चरण धरले. तेव्हा समर्थांनी धारण केलेले वेड टाकून दिले आणि अत्यंत प्रेमाने कल्याणास

जवळ घेतले. 'पळा पळा ब्रह्मपिसा येतो जवळी। रामनामे हाक देऊन डोई कांडोळी।।' हा अभंग त्या प्रसंगाचा आहे.

शिवछत्रपती सामानगडावर दुष्काळी कामानिमित्त बांधकाम करीत होते. त्यामुळे शेकडो मजुरांना रोजगार मिळाला. 'आपल्यामुळे हे लोक अन्नपाण्याला लागले असा किंचितसा अभिमान महाराजांच्या मनात निर्माण झाला. असे सांगतात की नेमके त्यावेळी समर्थ तिथे गेले आणि त्यांनी एका बेलदाराकडून रस्त्यातील एक खडक फोडविला त्यावेळी त्या खडकात पाण्यासकट जिवंत बेडकी आढळली. त्यावेळी समर्थांनी लिहिलेला पुढील अभंग केवळ शिवछत्रपतींनाच नव्हे तर आपणा सर्वांना बरेच काही शिकवून जातो-

'आम्ही काय कुणाचे खातो। श्रीराम आम्हाला देतो।।धृ।।
बांधिले घुमट किल्याचे तट। तयाला फुटती पिंपळवट।
नाही विहीर आणी मोट। बुडाला पाणी कोण पाजीतो।। श्रीराम....
पहा पहा मातेचीये स्तनी। चिंतिता मांस-रक्त-मल-घाणी।
तयामध्ये विमल दुग्ध आणोनि। कोण निर्मितो।। श्रीराम....
खडक फोडिता सजिव रोडकी। पाहिली सर्वांनी बेडकी।
सिंधु नसता तिये मुखी पाणी। कोण पाजितो।। श्रीराम....
नसता पाण्याचे बुडबुडे। सदासर्वदा गगन कोरडे।
दास म्हणे जीवन चहुकडे। घालुनी सडे पीक उगवीतो।। श्रीराम'....

समर्थांनी भीमस्वामींसाठी लिहिलेला अभंग मोठा गोड आहे. समर्थांना त्यांना तंजावरला मठपती म्हणून पाठविले. त्यांना समर्थांचा विरह सहन होईना. तेव्हा या अभंगात समर्थ त्यांना समजावून सांगतात की तुमचा आमचा केव्हा वियोग झाला म्हणून तुम्ही भेटीची इच्छा बाळगता? आम्ही तुमच्या हृदयात कायमचे निवास करून आहोत. एका अभंगात समर्थ रामाला प्रार्थना करतात की माझ्या भक्तांना तुम्ही अधूनमधून दर्शन देत जा. तेव्हा रामरायाने आश्वासन दिले की जो कोणी रामनामाच्या त्रयोदशाक्षरी मंत्राचा तेरा कोटी जप करेल त्याला रामराय हमखास दर्शन देतील.

'आज्ञेप्रमाणे परमार्थ। केला जाण म्यां यथार्थ ।।१।।
आता देहाचा कंटाळा। आला असे जी दयाळा ।।२।।
आहे येकचि मागणे। कृपा करोनिया देणे ।।३।।
ज्यासी दर्शनाची इच्छा। त्याची पुरवावी आस्था ।।४।।
ऐक सखया वचन। त्यासी देईन दर्शन ।।५।।
तेरा अक्षरिया मंत्राचा। जप करील जो साचा ।।६।।

त्याची संख्या तेरा कोटी। होता भेटेन मी जगजेठी ।।७।।'

समर्थांनी आपल्या देहत्यागाची पूर्वसूचना शिष्यमंडळींना पंधरा दिवस आधीच दिली होती. त्यामुळे त्यांच्या अखेरच्या दर्शनासाठी सज्जनगडावर हजारो शिष्यगण जमले होते. समर्थांची आता कोणतीही इच्छा शिल्लक राहिलेली नव्हती. त्यांनी देह ठेवला त्या आधी काही दिवसच मराठ्यांचे साम्राज्य नष्ट करण्यासाठी औरंगजेब सात लाख फौज घेऊन महाराष्ट्रात आला होता. भावी काळ अत्यंत कठीण आहे याची समर्थांना कल्पना होती. देह ठेवण्यापूर्वी रामाच्या दर्शनासाठी ते एकदा चाफळला आले. त्यावेळी त्यांनी रामरायाला प्रार्थना केली-

'कल्याण करी देवराया। जनहीत विवरी ।।धृ।।

तळमळ तळमळ होतचि आहे। हे जन हाती धरी ।।१।।

अपराधी जन चुकतचि गेले । तुझा तुचि सावरी ।।२।।

कठीण त्यावरी कठीणचि जाले। आता न दिसे उरी ।।३।।

कोठे जावे काय करावे। आरंभिली बोहरी ।।४।।

दास म्हणे आम्ही केले पावलो । दयेसी नाही सरी ।।५।।

समर्थांनी जीवनाची कृतार्थता अनुभवली. देह ठेवताना मनातील विश्वाची चिंता मनात कायम होती. म्हणून त्यांनी रामरायाला साकडे घातले. औरंगजेबच्या आक्रमणामुळे बोहरी म्हणजे सर्वनाश सुरू झाल्याची जणू त्यांना सूचना मिळाली होती. हे चुकणारे अपराधी जन म्हणजे रायगडावर सिंहासनासाठी आपापसात संघर्ष करणारे स्वकीय तर नव्हेत ना? पण आता समर्थांची जनसेवेची उर्मी संपली होती. आता त्यांना त्यांच्या मूळ स्वरूपाची आठवण झाली होती. चाफळच्या रामाला ते म्हणतात-

'माझी निस्पृहता गेली तुझे पाई। ती मज परत देई रामराया।

न लगे संप्रदाय न लगे वैभव। माझा अंतर्भाव उच्चाटिला।।

समर्थ सज्जनगडावर परतले.

देह ठेवताना शिष्य मंडळी आता समर्थांचा कायमचा वियोग होणार म्हणून शोक करू लागली तेव्हा समर्थांनी त्यांना उपदेश केला-

'माझी काया आणि वाणी। गेली म्हणाल अंत:करणी।

परी मी आहे जगज्जीवनी। निरंतर।।१।।

आत्माराम दासबोध। माझे स्वरूप स्वत:सिद्ध।

असता न करावा खेद। भक्तजनी।।२।।

नका करू खटपट। पहा माझा ग्रंथ नीट।

जेणे सायोज्यतेची वाट। गवसेल की।।३।।'

संत वाङ्मय रूपाने शिल्लक राहतात. मराठी साहित्य संस्कृती मंडळाने समर्थांच्या वाङ्मय मूर्तीची पूजा माझ्याकडून करवून घेतली, ती सेवा श्रीराम चरणी अर्पण.



# संदर्भ ग्रंथ


१. महाराष्ट्र राज्य संस्कृति-कोश -सं. महादेवशास्त्री जोशी
२. समर्थ रामदास समग्र साहित्य -सं. डॉ. म. रा. जोशी
३. सार्थ दासबोध -के. वि. बेलसरे
४. सार्थ दासबोध -ल. रा. पांगारकर
६. रामदासांची काव्यसृष्टी -डॉ. रा. वा. चिटणीस
७. समर्थ रामदासांचे स्तोत्र वाङ्मय -डॉ. र. रा. गोसावी
८. समर्थ रामदासांचे संगीत चिंतन -डॉ. कमलाकर परळीकर
९. समर्थांची करूणाष्टके -ले. सुनील चिंचोलकर
१०. दासबोध विवरण भाग १ ते ६ -ले. सुनील चिंचोलकर
११. मनोबोध विवरण -स्वामी वरदानंद भारती
१२. संत तुकाराम महाराजांचा अभंगगाथा -सं. डॉ. अशोक कामत
१३. समर्थ रामदासांचा अभंगगाथा -सं. चंद्रशेखर आठवले
१४. सामर्थ्ययोगी रामदास -प्रा. प्रभाकर पुजारी
१५. श्री समर्थांचा जुना दासबोध -श्री. दत्ताबुवा रामदासी
१६. श्री समर्थ हृदय -कै. शंकर श्रीकृष्ण देव
१७. समर्थांचे व्यवस्थापन -सुनील चिंचोलकर
१८. मुसलमानी अष्टके -डॉ. इंदुताई लिमये
१९. पत्र समर्थांचे -सुनील चिंचोलकर
२०. सार्थ आत्माराम -के. वि. बेलसरे
२१. चिंता करितो विश्वाची -ले. सुनील चिंचोलकर

# महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ

## महाराष्ट्राचे शिल्पकार योजनअंतर्गत मालिकेतील चरित्रग्रंथ

| | | |
|---|---|---|
| १) एस. एम. जोशी | श्री. ग. प्र. प्रधान | रु. ४०/- |
| २) साने गुरुजी | श्री. राजा मंगळवेढेकर | रु. ४०/- |
| ३) दादा धर्माधिकारी | श्रीमती तारा धर्माधिकारी | रु. ४०/- |
| ४) क्रांतिसिंह नाना पाटील | श्री. भारत पाटणकर | रु. ४०/- |
| ५) डॉ. विठ्ठलराव विखेपाटील | श्री. शिवाजी सावंत | रु. ३५/- |
| ६) शंकरराव किर्लोस्कर | श्रीमती शांता किर्लोस्कर | रु. ४०/- |
| ७) मामासाहेब जगदाळे | श्री. व. न. इंगळे | रु. ४५/- |
| ८) तंट्या भिल्ल | श्री. बाबा भांड | रु. ४५/- |
| ९) यशवंतराव चव्हाण | श्री. विठ्ठलराव पाटील | रु. ४०/- |
| १०) दादासाहेब फाळके | श्री. बापू वाटवे | रु. ३५/- |
| ११) ताराबाई शिंदे | श्री. इंद्रजित भालेराव | रु. २५/- |
| १२) तेजस्विनी अहिल्याबाई होळकर | सौ. विजया जहागीरदार | रु. ४५/- |
| १३) तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी | डॉ. अरुंधती खंडकर | रु. ४०/- |
| १४) स्वातंत्र्यवीर सावरकर | श्री. सुधाकर देशपांडे | रु. ३६/- |
| १५) बॅ. राजाभाऊ खोब्रागडे | श्री. व्ही. डी. मेश्राम | रु. ३५/- |
| १६) स्वामी रामानंद तीर्थ | श्री. प्रकाश मेदककर | रु. ४५/- |
| १७) पठ्ठे बापूराव | श्री. चंद्रकुमार नलगे | रु. ४५/- |
| १८) भाई उद्धवराव पाटील | श्री. व. न. इंगळे | रु. ५५/- |
| १९) धोंडो केशव कर्वे | डॉ. न. म. जोशी | रु. ४०/- |
| २०) लोकहितवादी | डॉ. निर्मलकुमार फडकुले | रु. ५०/- |
| २१) यदुनाथ थत्ते | डॉ. मु. ब. शहा | रु. ४०/- |

| | | |
|---|---|---|
| २२) गोविंदभाई श्रॉफ | डॉ. विजय दिवाण | रु. ४५/- |
| २३) लोककवी शाहीर रामजोशी | श्री. शिरीष गंधे | रु. ४५/- |
| २४) वसंतराव नाईक | डॉ. उत्तम रुद्रवार | रु. ३५/- |
| २५) महात्मा फुले | श्री. श्रीराम गुंदेकर | रु. ४०/- |
| २६) स्वातंत्र्यसेनानी तुळशीदास जाधव | श्री. व्यंकटेश कामतकर | रु. ४६/- |
| २७) ना. ग. गोरे | श्री. ग. प्र. प्रधान | रु. ३५/- |
| २८) शंकरराव चव्हाण | डॉ. सुरेश सावंत | रु. ४५/- |
| २९) पंडिता रमाबाई | डॉ. सिसिलिया कार्व्हालो | रु. ४५/- |
| ३०) बॅ. नाथ पै | जयानंद मठकर | रु. ३५/- |
| ३१) विनोबा भावे | प्रा. किसन चोपडे | रु. ४६/- |

## *मंडळाची प्रकाशने मिळण्याची ठिकाणे*

सर्व शासकीय ग्रंथ भांडार
मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद व
महाराष्ट्रातील प्रमुख ग्रंथविक्रेते

## *अधिक माहिती/चौकशीसाठी*

सचिव,
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ,
पु. ल. देशपांडे कला अकादमी,
दुसरा मजला, रवींद्र नाट्य मंदिर इमारत,
सयानी मार्ग, प्रभादेवी, मुंबई-४०० ०१४
दूरध्वनी - २४२२६१५६/२४३२५९२९

# महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाची प्रकाशने

| | | |
|---|---|---|
| १) महाराष्ट्राचा इतिहास प्रागैतिहासिक महाराष्ट्र (खंड पहिला भाग-१) | शां. भा. देव | रु. १२७/- |
| २) महाराष्ट्राचा इतिहास (मध्ययुगीन कालखंड भाग-१) | संपादक गो. त्र्यं. कुलकर्णी | रु. १४५/- |
| ३) मध्ययुगीन महाराष्ट्र (सामाजिक आणि सांस्कृतिक जीवन) | प्रा. म. श्री. माटे | रु. ७५/- |
| ४) समाजशास्त्रीय विचारातील प्रमुख प्रवाह (भाग पहिला) | अनुवादक हेमकांत बळकुंदी | रु. २९५/- |
| ५) पं. जवाहरलाल नेहरू व्यक्ती आणि कार्य | संपादक बा. ह. कल्याणकर | रु. १४०/- |
| ६) भारताचा स्वातंत्र्यलढा | डॉ. वा. ना. कुबेर | रु. १०९/- |
| ७) मराठी वाङ्मयकोश खंड-४ | समन्वय संपादक डॉ. विजया राजाध्यक्ष | रु. ३२०/- |
| ८) दादासाहेब गायकवाड काल आणि कर्तृत्व | संपादक मंडळ | रु. ६०/- |
| ९) भारतातील आदिवासी वंश | प्रा. वि. श्री. कुलकर्णी | रु. १२५/- |
| १०) खानदेशातील कृषक जीवन | डॉ. रमेश सूर्यवंशी | रु. ६०/- |

| | | |
|---|---|---|
| ११) लैंगिक नीती आणि समाज | श्रीमती शकुंतला क्षीरसागर | रु. १४५/- |
| १२) मराठी वाङ्मयकोश खंड २, भाग - १ | डॉ. गो. म. कुलकर्णी | रु. १३०/- |
| १३) महाराष्ट्राचा इतिहास मराठा कालखंड, भाग-१ (शिवकाल) | डॉ. वि. गो. खोबरेकर | रु. २७५/- |

## *मंडळाची प्रकाशने मिळण्याची ठिकाणे*

सर्व शासकीय ग्रंथ भांडार
मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद व
महाराष्ट्रातील प्रमुख ग्रंथविक्रेते

## *अधिक माहिती/चौकशीसाठी*

सचिव,
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ,
पु. ल. देशपांडे कला अकादमी,
दुसरा मजला, रवींद्र नाट्य मंदिर इमारत,
सयानी मार्ग, प्रभादेवी, मुंबई-४०० ०१४
दूरध्वनी - २४२२६१५६/२४३२५९२९